॥ ॐ श्रीपरमात्मने नमः ॥

# अथ सप्तमोऽध्यायः

## अवतरणिका

*श्रीभगवंतांनी सहाव्या अध्यायाच्या सेहेचाळीसाव्या श्लोकात योग्याचे माहात्म्य सांगितले आणि सत्तेचाळीसाव्या श्लोकांत म्हटले की, योगीलोकांतही जे माझ्या ठिकाणी श्रद्धा-प्रेम ठेवून माझे भजन करत असतात, ते भक्त सर्वात श्रेष्ठ असतात. भक्तांना ज्यावेळी भगवंताचे स्मरण होत असते त्यावेळी ते त्यांच्यात तल्लीन होतात—मस्त होतात. त्याचप्रमाणे भगवंतासमोर जेव्हा भक्तांचा विशेष प्रसंग येतो, तेव्हा भगवंतसुद्धा त्यात मस्त होतात. याच मस्तीच्या भरात भगवंत अर्जुनाने न विचारताही स्वतः सातव्या अध्यायाचा विषय प्रारंभ करतात.*

*जसे भगवंताचा विषय निघाला तर त्यात भक्त मस्त होतो, त्याला दुसरी कोणती गोष्ट आवडतच नाही, तसेच मागील अध्यायाच्या अंती भक्ताचा विषय निघाला तर भगवान्‌ही मस्त झाले, दुसऱ्या सर्व गोष्टी विसरून गेले आणि त्यांच्या अंतःकरणात भक्तीचा विषय सांगण्याचा उत्साह निर्माण झाला. त्यांनी अर्जुनाकडून प्रश्न नसतानाही आपल्या प्रसन्नतेने भक्तीचा विशेष विचार सांगणे सुरू केले!*

*श्रीभगवानुवाच*

**मयासक्तमनाः पार्थ योगं युञ्जन्मदाश्रयः।**
**असंशयं समग्रं मां यथा ज्ञास्यसि तच्छृणु॥ १ ॥**

श्रीभगवान् म्हणाले

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **पार्थ** | = हे पृथानंदन! | **योगम्** | = योगाचा | **असंशयम्** | = ज्या प्रकाराने |
| **मयि** | = माझ्यात | **युञ्जन्** | = अभ्यास करीत | **ज्ञास्यसि** | = जाणशील, |
| **आसक्तमनाः** | = आसक्त मनाचा, | **माम्** | = (तू) माझ्या | **तत्** | = (त्या प्रकाराने) ते |
| **मदाश्रयः** | = माझ्या आश्रित होऊन | **समग्रम्** | = समग्ररूपाला | **शृणु** | = ऐक |

*व्याख्या*— **मय्यासक्तमनाः**—माझ्या ठिकाणी ज्याचे मन आसक्त झाले आहे अर्थात् अधिक स्नेहामुळे ज्याचे मन स्वाभाविकच माझ्या ठिकाणी लागले आहे, चिकटले आहे; त्याला माझे स्मरण करावे लागत नाही तर स्वाभाविकच माझी आठवण त्याला राहत असते आणि माझा विसर कधी पडतच नाही—असा तू माझ्या ठिकाणी मन लावणारा हो.

ज्याचे उत्पत्ति-विनाशशील वस्तूविषयी आणि शब्द, स्पर्श, रूप, रस आणि गंध या विषयांचे आकर्षण समाप्त झाले आहे. ज्याला या लोकात शरीराचा आराम, आदर-सत्कार आणि नावाच्या मोठेपणाविषयी तसेच परलोकाच्या भोगाविषयी किंचित्‌मात्रही ओढ, आसक्ती अथवा प्रियता राहिलेली नाही, तर केवळ माझ्याकडेच त्याचा ओढा आहे अशा पुरुषाला "**मय्यासक्तमनाः**" म्हणतात.

साधकाने भगवंतात मन कसे लावावे, जेणेकरून तो "**मय्यासक्तमनाः**" होईल—यासाठी दोन उपाय सांगितले जातात—

(१) साधक जेव्हा खऱ्या आणि शुद्ध भावनेने भगवंतासाठीच जप-ध्यान करावयास बसतो तेव्हा भगवान् त्याला आपले भजन मानतात. जसे एखादा श्रीमंत माणूस एखाद्या नोकराला म्हणाला की, "तू या ठिकाणी बसून रहा, काम निघाल्यावर तुला सांगितले जाइल" एखाद्या दिवशी त्या नोकराला मालकाने काही काम सांगितले नाही. तो नोकर दिवसभर रिकामा बसून राहिला आणि सायंकाळी त्याने मालकाला मजूरी मागितली तेव्हा मालक म्हणाला "तू काही कामच केले नाहीस तर मग पैसे कशाचे मागतोस?" त्यावेळी तो नोकर म्हणाला "आपल्या आज्ञेनुसार मी इथे

बसून राहिलो त्याचे पैसे मागत आहे.'' अशा प्रकारे जर एका मनुष्याला केवळ बसण्याबद्दलचेही पैसे मिळतात, तर जो मनुष्य केवळ भगवंताच्या ठिकाणी मन लावण्यासाठी शुद्ध भावनेने बसतो, तर त्याचे बसणे भगवान काय निरर्थक समजतील? तात्पर्य, जो भगवंताच्या ठिकाणी मन लावण्यासाठी, भगवंताचा आश्रय घेऊन, भगवंताच्याच भरवशावर बसतो, तो भगवंताच्या कृपेने भगवंताच्या ठिकाणी मन लावणारा होतो.

(२) भगवान् जर सर्व ठिकाणी आहेत तर येथेही आहेत, कारण जर येथे नसते तर भगवान् सर्व ठिकाणी आहेत, हे म्हणता आले नसते. भगवान् सर्व काळात आहेत तर आत्ताही आहेत. जर आत्ता नसते तर भगवान् सर्व काळात आहेत, असे म्हणता आले नसते. भगवान् सर्वांमध्ये आहेत, तर माझ्यातही आहेत. जर माझ्यात नसते तर भगवान् सर्वांमध्ये आहेत, हे म्हणता आले नसते. भगवान् सर्वांचे आहेत तर माझेही आहेत, कारण माझे नसते तर भगवान् सर्वांचे आहेत हे म्हणता आले नसते. म्हणून भगवान् येथे आहेत, आत्ता आहेत, आपल्यात आहेत आणि आपले आहेत. कोणताही देश, काल, वस्तू, व्यक्ती, परिस्थिती, घटना आणि क्रिया याहून ते रहित नाहीत. त्याहून रहित होणे शक्यही नाही. ह्या गोष्टीला दृढतेने मानून, भगवन्नामात, प्राणात, मनात, बुद्धीत, शरीरात, शरीराच्या कणाकणात परमात्मा आहेत या भावनेची जागृती ठेवून साधकाने नाम-जप केला तर साधक फारच लवकर भगवंतात मन लावणारा होऊ शकतो.

**मदाश्रयः**—ज्याला केवळ माझीच आशा आहे, माझाच भरवसा आहे, माझाच आधार आहे, माझाच विश्वास आहे आणि जो संपूर्णपणे माझ्याच आश्रयाने राहतो तो ''मदाश्रयः'' आहे.

कोणाचा ना कोणाचा आश्रय घेण्याचा या जीवाचा स्वभाव आहे. परमात्म्याचा अंश असल्याने हा जीव आपल्या अंशीला शोधत असतो. परंतु जोपर्यंत ध्येयात, उद्देशात परमात्मा नसतात तोपर्यंत हा शरीराशी संबंध प्रस्थापित करतो आणि शरीर ज्याचा अंश आहे, त्या संसाराकडे ओढला जातो. तो असे समजतो की, यापासूनच मला काही मिळेल आणि यामुळेच मी निश्चिंत होईल, जे काही होईल ते संसारापासूनच होईल. परंतु जेव्हा तो भगवंतालाच सर्वतोपरी मानतो तेव्हा तो भगवंताच्या ठिकाणी आसक्त होतो आणि भगवंताचाच आश्रय घेतो.

संसाराचा अर्थात् धन, संपत्ती, वैभव, विद्या, बुद्धी, योग्यता, कुटुंब इत्यादीचा जो आश्रय आहे, तो नाशवान आहे, समाप्त होणारा आहे, स्थिर राहणारा नाही. तो नित्य राहणारा नाही आणि कायमची पूर्ती आणि तृप्ती करणाराही नाही. परंतु भगवंताचा आश्रय कधी किंचित्मात्रही कमी होणारा नाही. कारण भगवंताचा आश्रय पूर्वीही होता, आत्ता-ही आहे आणि पुढेही राहील. म्हणून आश्रय केवळ भगवंताचाच घेतला पाहिजे. केवळ भगवंताचाच आश्रय, अवलंबन, आधार, सहारा असावा. याचेच वाचक येथे **''मदाश्रयः''** पद आहे.

भगवान् म्हणतात की, मनही माझ्या ठिकाणी आसक्त असले पाहिजे आणि आश्रयही माझाच असावा. मन प्रेमाने आसक्त होते आणि आत्मीयतेने प्रेम निर्माण होते. मोठ्यांचा आणि सर्वसमर्थांचा आश्रय घेतला जातो. सर्वसमर्थ तर आपले प्रभूच आहेत. म्हणून त्यांचाच आश्रय घ्यावयाचा आहे आणि त्यांच्या प्रत्येक विधानामध्ये प्रसन्न रहावयाचे आहे की, माझ्या मनाच्या विरुद्ध विधान तयार करून प्रभू माझी किती काळजी घेतात, माझ्याकडे किती लक्ष ठेवतात की; माझ्या सम्मतीशिवायच विधान तयार करतात. अशा माझ्या दयाळू प्रभूची माझ्याशी किती आत्मीयता आहे. म्हणून मला कोणत्याही वस्तू, व्यक्ती, परिस्थिती इत्यादीची किंचित्मात्रही आवश्यकता नाही. अशा प्रकारे भगवंताच्या आश्रित राहणेच **''मदाश्रयः''** होणे आहे.

**योगं युञ्जन्**—भगवंताशी जो अखंड स्वत:सिद्ध संबंध आहे, त्या संबंधाला मानून तसेच सिद्धी-असिद्धीत सम राहून साधक जप, ध्यान, कीर्तन (नामस्मरण) करण्यात, भगवंताच्या लीला आणि स्वरूपाचे चिंतन करण्यात स्वाभाविकच अटळ भावाने रत राहत असतो. त्याचा प्रयत्न स्वाभाविकच भगवंताच्या अनुकूल होत असतो. हेच **''योगं युञ्जन्''** म्हणण्याचे तात्पर्य आहे.

जेव्हा साधक भगवंतातच आसक्त मन असणारा आणि भगवंताचाच आश्रित होईल, तेव्हा तो कोणता अभ्यास करेल? कोणता योग करेल? तो भगवत्संबंधी अथवा संसारसंबंधी जे काही कार्य करत राहील, तो सर्व योगाचाच अभ्यास होईल. तात्पर्य, जेणेकरून परमात्म्याचा संबंध होईल ते (लौकिक अथवा पारमार्थिक) काम करत असतो आणि ज्यामुळे परमात्म्याचा वियोग होईल ते काम करत नसतो.

**असंशयं समग्रं माम्**—ज्याचे मन भगवंताचे ठिकाणी आसक्त झाले आहे, जो संपूर्णपणे भगवंताच्या आश्रित झाला आहे आणि ज्याने भगवंताच्या संबंधाला स्वीकार केले आहे. असा पुरुष भगवंताच्या समग्ररूपाला जाणतो अर्थात् सगुण-

निर्गुण, साकार-निराकार, अवतार-अवतारी आणि शिव, गणेश, सूर्य, विष्णू इत्यादी जितकी रूपे आहेत, त्या सर्वांना तो जाणतो.

भगवान् आपल्या भक्ताची गोष्ट सागंत असताना कंटाळत नाहीत आणि म्हणतात की, ज्ञानमार्गाने जाणारा तर मला जाणू शकतो आणि प्राप्त करू शकतो. परंतु भक्तीने तर माझा भक्त समग्ररूपाने जाणू शकतो आणि इष्टाचे अर्थात् ज्या रूपाने माझी उपासना करत असतो त्या रूपाचे दर्शनही करू शकतो.

**यथा ज्ञास्यसि तच्छृणु,**—येथे "**यथा***" पदाने प्रकार दाखविला गेला आहे की, तू ज्या प्रकाराने जाणू शकशील, तो प्रकारही सांगेन. आणि "तत्†" पदाने दाखविले गेले आहे की, ज्या तत्त्वाला तू जाणू शकतोस, त्याचे मी वर्णन करतो, तू ऐक.

सहाव्या अध्यायाच्या सत्तेचाळीसाव्या श्लोकात "**श्रद्धावान् भजते यो मां स मे युक्ततमो मतः**" पदांत प्रथम पुरुषी (तो) चा प्रयोग करून सामान्यपणे सांगितले होते आणि येथे सातवा अध्याय आरंभ करताना "**यथा ज्ञास्यसि तच्छृणु**" पदांत मध्यम पुरुषी (तू) चा प्रयोग करून अर्जुनाला विशेषत्वाने सांगत आहेत की, तू ज्या प्रकाराने माझ्या संपूर्ण रूपाला जाणून घेशील तो प्रकार तू माझ्याकडून ऐक.

यापूर्वीच्या सहा अध्यायांत भगवंतासाठी "समग्र" शब्द आला नाही. चौथ्या अध्यायाच्या तेवीसाव्या श्लोकात "**यज्ञायाचरतः कर्म समग्रं प्रविलीयते**" पदामध्ये कर्माच्या विशेषणाच्या रूपाने "समग्र" शब्द आला आहे आणि येथे "समग्र" शब्द भगवंताच्या विशेषणाच्या रूपात आला आहे. "समग्र" शब्दात भगवंताचे तात्त्विक स्वरूप सर्वचे सर्व येते, शिल्लक कांहीही राहत नाही.

## विशेष गोष्ट

(१) या श्लोकात "आसक्ती केवळ माझ्यातच असावी, आश्रय देखील माझाच असावा, मग योगाचा अभ्यास केला तर माझ्या समग्ररूपाला जाणून घेशील" असे म्हणण्यात भगवंताचे तात्पर्य हे आहे की, जर मनुष्याची आसक्ती भोगामध्ये असेल आणि आश्रय रुपये-पैसे, कुटुंब इत्यादिंचा असेल तर कर्मयोग, ज्ञानयोग, ध्यानयोग इत्यादी कोणत्याही योगाचा अभ्यास केला तरी मला तो जाणू शकत नाही. माझ्या समग्ररूपाला जाणण्यासाठी तर माझ्या ठिकाणीच प्रेम असावे लागते आणि माझाच आश्रय असावा लागतो. माझ्यापासून कोणत्याही कार्याच्या पूर्तीची इच्छा नसली पाहिजे. असे झाले पाहिजे आणि असे होता कामा नये—या कामनेचा त्याग करून, भगवान् जे करू इच्छितात तेच झाले पाहिजे आणि भगवान् जे करू इच्छित नाहीत ते होता कामा नये, या भावनेने जो केवळ माझा आश्रय घेतो तो माझ्या समग्ररूपाला जाणतो. म्हणून भगवान् अर्जुनाला म्हणतात की, तू "**मय्यासक्तमनाः**", आणि "**मदाश्रयः**" हो.

(२) परमात्म्याशी वास्तविक संबंधाचे नाव "**योगम्**" आहे आणि या संबंधाला अखंडभावनेने मानण्याचे नाव "**युञ्जन्**" आहे. तात्पर्य मन, बुद्धी इंद्रिये इत्यादीशी संबंध मानून आपल्या ठिकाणी "मी" रूपाने जे एक व्यक्तित्व मानून घेतले आहे त्याला न मानता परमात्म्याशी जी आपली वास्तविक अभिन्नता असते, त्याचा अनुभव करीत रहावा.

वास्तविक "**योगं युञ्जन्**" ची इतकी आवश्यकता नाही, जितकी आवश्यकता संसाराची आसक्ती आणि आश्रय त्याग करण्याची आहे. संसाराची आसक्ती आणि आश्रय यांचा त्याग केल्यास परमात्म्याचे चिंतन स्वतः स्वाभाविक होत राहील आणि संपूर्ण क्रिया निष्कामभावनेने होऊ लागतील. मग भगवंताला जाणण्यासाठी कोणताही अभ्यास करावा लागणार नाही. याचे तात्पर्य असे आहे की, ज्याचा संसाराकडे ओढा आहे आणि ज्याच्या अंतःकरणात उत्पत्ति-विनाशशील वस्तूंचे महत्त्व बसलेले आहे तो परमात्म्याच्या वास्तविक स्वरूपाला जाणू शकत नाही. कारण त्याची आसक्ती, कामना, महत्ता संसारात असते ज्यामुळे संसारात परमात्मा परिपूर्ण असूनही तो त्यांना जाणू शकत नाही.

मनुष्याची जेव्हा समाजातल्या एखाद्या थोर व्यक्तिशी आत्मीयता होते, तेव्हा त्याला एक प्रसन्नता होते. त्याच-प्रमाणे जेव्हा आपले नित्य हितैषी आणि आपले मुख्य अंशी भगवंताशी आत्मीयता जागृत होते तेव्हा निरंतर प्रसन्नता प्राप्त होऊन एक अलौकिक, विलक्षण प्रेम प्रगट होत असते. मग साधक स्वाभाविकच भगवंताचे ठिकाणी मन लावणारा आणि भगवंताच्या आश्रित होऊन जातो.

## शरणागतीचे उपाय

आश्रय, अवलंबन, अधीनता, प्रपत्ती आणि आधार हे सर्व शब्द "शरणागती" चेच वाचक असूनही त्यांना प्रत्येकाला आपला वेगवेगळा अर्थ आहे जसे—

* स्थूलपासून सूक्ष्मपर्यंत वर्णन करणे (जसे भूमीपेक्षा जल सूक्ष्म आहे, जलापेक्षा अग्नी सूक्ष्म आहे, अग्नीपेक्षा वायू सूक्ष्म आहे इत्यादी) हे "यथा" म्हणण्याचे तात्पर्य आहे. या "यथा" अर्थात् प्रकाराचे वर्णन याच अध्यायाच्या चौथ्यापासून सातव्या श्लोकापर्यंत झाले आहे.

† जे काही कार्य (संसार) दिसत असते त्यात कारणरूपाने भगवंतच आहेत. हे "तत्" म्हणण्याचे तात्पर्य आहे. याचे वर्णन याच अध्यायाच्या आठव्यापासून बाराव्या श्लोकापर्यंत झाले आहे.

**( १ ) आश्रय**—जसे आपण पृथ्वीचा आधार घेतल्याशिवाय जगूच शकत नाही आणि उठणे, बसणे इत्यादी काहीच करू शकत नाही, तसेच प्रभूच्या आधाराशिवाय आपण जिवंत राहू शकत नाही. जगणे आणि काही करणे प्रभूच्या आधारानेच होत असते यालाच "**आश्रय**" म्हणतात.

**( २ ) अवलम्बन**—जसे एखाद्याचे हाताचे हाड मोडले तर डॉक्टर त्याच्यावर पट्टी बांधून त्याला गळ्याच्या आधाराने लटकवितो तेव्हा तो हात गळ्याच्या अवलंबित होतो, तसेच संसारापासून निराश आणि अनाश्रित होऊन भगवंताच्या गळ्यात पडणे अर्थात् भगवंताला घट्ट पकडणे याचे नाव "**अवलम्बन**" आहे.

**( ३ ) अधीनता**—अधीनता दोन रीतीने होत असते. एक कोणी एखादा आपल्याला जबरीने अधीन करून घेतो अथवा पकडतो. दुसरे आपण आपल्याकडून एखाद्याच्या अधीन होऊन जाणे अथवा त्याचे दास होणे तसेच, आपले काहीही प्रयोजन न ठेवता अर्थात् केवळ भगवंतालाच स्वीकारून अनन्यभावाने सर्वस्वाने भगवंताचे दास होणे आणि केवळ भगवंतालाच आपले स्वामी मानणे, ही "**अधीनता**" आहे.

**( ४ ) प्रपत्ति**—जसे कोणी एखादा समर्थाच्या चरणावर साष्टांग दंडवत घालतो, तसेच संसारापासून संपूर्णपणे निराश होऊन भगवंताला शरण होणे "**प्रपत्ति**" (प्रपन्नता) आहे.

**( ५ ) आधार**—जसे पाण्यात बुडत असलेल्या व्यक्तीला एखाद्या वृक्षाचा, लतेचा, दोराचा आधार मिळावा, तसेच संसारात वारंवार जन्म-मरणात बुडण्याच्या भयाने, भगवंताचा आश्रय घेणे "**आधार**" आहे.

अशा प्रकारे उपर्युक्त सर्व शब्दात केवळ शरणागतीचा भाव प्रगट होतो. जेव्हा भगवंतातच आसक्ती होते आणि भगवंताचाच आश्रय घेतला जातो अर्थात् भगवंताचेच ठिकाणी मन लागते आणि बुद्धी भगवंताचेच ठिकाणी चिकटून राहते तेव्हाच शरणागती होते. जर मनुष्य मन-बुद्धीसहित स्वतः भगवंताच्या आश्रित (समर्पित) झाला तर शरणागतीचे उपर्युक्त सर्वचे सर्व भाव त्यात येतात.

मन आणि बुद्धीला आपले न मानता "हे भगवंताचेच आहेत" असे दृढतेने मानून घेतल्यास साधक "**मय्यासक्तमनाः**" आणि "**मदाश्रयः**" होतो. सांसारिक सर्व वस्तू प्रत्येक क्षणाला प्रलयाकडे जात आहेत आणि कोणत्याही वस्तूशी आपला नित्य संबंध नाहीच—हा सर्वांचा अनुभव आहे. जर या अनुभवाला महत्त्व दिले गेले अर्थात् नाश होणाऱ्या संबंधाला आपले समजले नाही तर आपला कल्याणाचा उद्देश असल्याने भगवंताची शरणागती आपोआप होऊन जाईल. कारण हा स्वतःच भगवंताचा आहे. संसाराशी संबंध केवळ मानलेला आहे (वास्तविक संबंध नाहीच) आणि भगवंतापासून विमुखता झालेली आहे (वास्तविक विमुखता नाहीच). म्हणून मानलेल्या संबंधाचा त्याग झाल्यास भगवंताशी जो स्वतःसिद्ध संबंध आहे तो प्रगट होत असतो.

**परिशिष्ट भाव**—ज्याचे मन स्वाभाविकच भगवंताकडे आकर्षित झाले आहे, जो भगवंताच्या सर्वथा आश्रित झाला आहे आणि ज्याने भगवंताशी आपल्या स्वतःसिद्ध नित्ययोगाचा (आत्मीय संबंधाचा) स्वीकार केला आहे, तो भक्त भगवंताच्या समग्ररूपाला जाणतो. सर्व काही भगवंतच आहेत—हे भगवंताचे समग्ररूप आहे.

'**मय्यासक्तमनाः**' यात प्रेमाची आणि '**मदाश्रयः**' यात श्रद्धेची मुख्यता आहे.

'**समग्रं माम्**'—यात '**समग्रम्**' (समग्ररूप) विशेषण आहे आणि '**माम्**' (भगवान्) विशेष्य आहेत. भक्ताचा संबंध विशेषणाबरोबर नसून विशेष्याबरोबर असतो.

सहाव्या अध्यायाच्या अंती '**श्रद्धावान्भजते यो माम्**' पदांमध्ये आलेल्या '**माम्**' चे काय स्वरूप आहे—हे, भगवान् येथे स्पष्ट करतात की, ते '**माम्**' माझे समग्ररूप आहे.

'**यथा ज्ञास्यसि तच्छृणु**'—त्या समग्ररूपाचे वर्णन मी अशाप्रकारे, ढंग, युक्ती, शैली यांनी करेल, ज्यामुळे तू मला सुगमतापूर्वक यथार्थरूपाने जाणशील.

अर्जुनाने मागील अध्यायात आपला संशय प्रकट केला होता—'**एतन्मे संशयं कृष्ण**' (६ । ३९), म्हणून भगवान् म्हणतात की, आता मी तीच गोष्ट सांगेन, ज्यात कोणता संशय शिल्लक राहणार नाही.

***संबंध**—पहिल्या श्लोकात भगवंतांनी अर्जुनाला म्हटले होते की, तू माझ्या समग्ररूपाला कसा जाणशील ते ऐक. आता भगवान् पुढील श्लोकात ते ऐकविण्याची प्रतिज्ञा करतात.*

**ज्ञानं तेऽहं सविज्ञानमिदं वक्ष्याम्यशेषतः ।**
**यज्ज्ञात्वा नेह भूयोऽन्यज्ज्ञातव्यमवशिष्यते ॥ २ ॥**

| | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|
| **ते** | = तुझ्यासाठी | **अशेषतः** | = संपूर्णपणे | **इह** | = याविषयात |
| **अहम्** | = मी | **वक्ष्यामि** | = सांगेन, | **ज्ञातव्यम्** | = जाणण्यायोग्य |
| **इदम्** | = हे | **यत्** | = (ज्याला) जे | **अन्यत्** | = दुसरे (काहीही) |
| **सविज्ञानम्** | = विज्ञानासहित | **ज्ञात्वा** | = जाणल्यावर | **न, अवशिष्यते** | = शिल्लक राहणार नाही. |
| **ज्ञानम्** | = ज्ञान | **भूयः** | = मग | | |

*व्याख्या*—**ज्ञानं तेऽहं सविज्ञानमिदं वक्ष्याम्यशेषतः**— भगवान् म्हणतात की, हे बंधू अर्जुन! आता मी विज्ञानासहित ज्ञान सांगेन*, तुला सांगेन आणि मी स्वतः सांगेन तसेच संपूर्णपणे सांगेन. तसे पाहिले तर प्रत्येक मनुष्य आपल्या गुरूंपासून माझ्या स्वरूपाविषयी ऐकत असतो आणि त्यापासून त्याला लाभही होत असतो परंतु तुला तर मी स्वतःच सांगत आहे. स्वतःकोण? जो समग्रपरमात्मा आहे तो मी स्वतः! मी स्वतः माझ्या स्वरूपाचे जसे वर्णन करू शकतो, तसे दुसरे कोणी वर्णन करू शकत नाहीत. कारण ते तर ऐकून आणि आपल्या बुद्धीनुसार विचार करूनच सांगतात†. त्यांची बुद्धी समष्टी बुद्धीचा एक लहानसा अंश असते. ती किती जाणू शेकल? ते तर पूर्वी अज्ञानी असून नंतर ज्ञाते होतात, परंतु मी तर अखंड प्रगट ज्ञानी आहे. माझ्यात कधीही अज्ञपणा नसतो, कधी नव्हता, कधी होणार नाही आणि कधी होणे शक्यही नाही. म्हणून मी तुला त्या तत्त्वाचे वर्णन करून सांगेन, जे जाणून घेतल्यावर आणखी काही जाणून घ्यावयाचे शिल्लक राहणार नाही.

दहाव्या अध्यायाच्या सोळाव्या श्लेकात अर्जुन म्हणतात की, आपण आपल्या सर्वच्या सर्व विभूती सांगण्यास समर्थ आहात-''**वक्तुमर्हस्यशेषेण दिव्या ह्यात्मविभूतयः**'' त्यावेळी भगवान् उत्तरात म्हणतात की, माझ्या विस्ताराचा अंत नाही, म्हणून मुख्य मुख्य सांगेन—''**प्राधान्यतः कुरुश्रेष्ठ नास्त्यंतो विस्तरस्य मे**'' (१०।१९) मग शेवटी म्हणतात की, माझ्या विभूतींचा अन्त नाही—''**नान्तोऽस्ति मम दिव्यानां विभूतीनां परन्तप**'' (१०।४०). येथे (७।२ मध्ये) भगवान् म्हणतात की, मी विज्ञानसहित ज्ञान संपूर्णपणे सांगेन, शिल्लक काहीही ठेवणार नाही—''**अशेषतः**''. याचे तात्पर्य हे समाजावे की, मी तत्त्वाने सांगेन. तत्त्वाच्या दृष्टिकोनातून सांगितल्यावर सांगणे, जाणणे काहीही शिल्लक राहणार नाही.

दहाव्या अध्यायात विभूती आणि योगाविषयी असा उल्लेख आला आहे की, भगवंताच्या विभूतींचा आणि योगाचा अंत लागत नाही. अभिप्राय असा आहे की, विभूतींचा अर्थात् भगवंताच्या ज्या वेगवेगळ्या शक्ती आहेत त्यांचा आणि भगवंताच्या योगाचा अर्थात् सामर्थ्य, ऐश्वर्य यांचा अंत लागत नाही.

रामचरित मानसमध्ये म्हटले आहे—

**निर्गुन रूप सुलभ अति सगुन जान नहिं कोइ।**
**सुगम अगम नाना चरित सुनि मुनि मन भ्रम होई॥**
(उत्तर० ७३ ख)

तात्पर्य सगुण भगवंताचा जो प्रभाव आहे, ऐश्वर्य आहे, त्याचा अंत लागत नाही. जर अंतच लागत नाही तर त्याला जाणून घेणे बुद्धीच्या आवाक्याबाहेरचे काम आहे. परंतु जे वास्तविक तत्त्व असते त्याला मनुष्य सुगमतेने समजू शकतो. जसे सोन्याचे दागिने किती होतात? याला मनुष्य जाणू शकत नाही. कारण दागिन्याचा अंत नाही परंतु त्या दागिन्यात तत्त्वाच्या दृष्टिने एक सोनेच आहे, याला तर मनुष्य जाणूच शकतो. तसेच परमात्म्याच्या संपूर्ण विभूतीं आणि सामर्थ्याला कोणीही जाणू शकत नाही. परंतु त्या सर्वात तत्त्वाच्या दृष्टीने एक परमात्माच आहेत याला तर मनुष्य तत्त्वाने जाणूच शकतो. परमात्म्याला तत्त्वाने जाणल्यावर त्याची समज तत्त्वाच्या दृष्टीने परिपूर्ण होत असते, अपूर्ण राहत नाही. जसे एखाद्याने म्हटले की, ''मी पाणी प्यालो'' तर याचा अर्थ असा नाही की, संसारात पाणी शिल्लकच राहिले नाही. म्हणून पाणी प्याल्याने पाण्याचा अंत झालेला नसतो, तर आपल्या तहानेचा अंत झालेला असतो. त्याचप्रमाणे परमात्मतत्त्वाला तत्त्वाने समजून घेतल्यावर परमात्मतत्त्वाच्या ज्ञानाचा अंत झालेला नसतो तर आपली स्वतःची जी समज असते,

* मी ''विज्ञानासहित ज्ञान'' संपूर्णपणे सांगेन यात विज्ञान ज्ञानाचे विशेषण आहे. विशेषण विशेष्याचे वैशिष्ट्य दाखविणारे असते. या दृष्टीने विशेष्य व्यापक झाले आणि विशेषण व्याप्य झाले अर्थात् ज्ञान (विशेष्य) मोठे झाले आणि विज्ञान (विशेषण) लहान झाले. परंतु विज्ञानाने ज्ञानाची विशेषता दाखविली—या दृष्टीने विज्ञान मोठे अर्थात् श्रेष्ठ झाले. येथे हा संसार भगवंतापासूनच उत्पन्न होतो आणि भगवंतामध्येच लीन होतो—असे मानणे ज्ञान आहे आणि सर्व काही भगवंतच आहेत, भगवंतच सर्व काही बनलेले आहेत, भगवंताशिवाय काही नाहीच—असा अनुभव होणे विज्ञान आहे. यात ज्ञान सामान्य झाले आणि विज्ञान विशेष झाले.

†जसे एखादा वर्णन करत असतो तर वर्णन करणाऱ्याचा जो स्वतःचा अनुभव असतो तो बुद्धीत पूर्ण उतरत नाही, बुद्धीत जितका उतरतो तितका मनात येत नाही आणि जितका मनात येतो तितका सांगण्यात येत नाही. अशा प्रकारे जर त्याचा स्वतःचा अनुभवही पूर्ण सांगण्यात येत नाही अर्थात् तो स्वतःच्या अनुभवालाही पूर्णपणे प्रगट करू शकत नाही, तर मग भगवंताप्रमाणे कसा सांगू शकतो?

जिज्ञासा असते, ती पूर्ण झालेली असते. तिचा अंत होत असतो, तिच्यात केवळ परमात्मतत्त्वच राहिलेले असते.

दहाव्या अध्यायाच्या दुसऱ्या श्लोकात भगवंतांनी म्हटले आहे की, माझ्या प्रगट होण्याला देवता आणि महर्षी जाणत नाहीत आणि तीसऱ्या श्लोकात म्हटले आहे की, जो मला अज आणि अनादी असे जाणतो तो मनुष्यामध्ये मोहरहित आहे आणि तो संपूर्ण पापापासून मुक्त होतो. तेव्हा ज्याला देवता आणि महर्षी जाणत नाहीत त्याला मनुष्य जाणेल हे कसे काय शक्य आहे ? भगवान अज आणि अनादी आहेत असे दृढतेने मानणेच जाणणे आहे. मनुष्य भगवंताला अज आणि अनादी मानूच शकतो. परंतु जसे बालक आपल्या आईच्या लग्नाची वरात पाहू शकत नाही, तसेच सर्व प्राण्यांचा आदि तसेच स्वयं अनादी अशा भगवंताला देवता, ऋषी, महर्षी, तत्त्वज्ञ, जीवन्मुक्त इत्यादी जाणू शकत नाहीत. त्याच-प्रमाणे भगवंताचे अवतार घेणे, लीला, ऐश्वर्य यांना कोणीही जाणू शकत नाही. कारण ते अपार आहेत, अगाध आहेत, अनंत आहेत. परंतु त्यांना तत्त्वाच्या दृष्टीने तर जाणूच शकतो.

परमात्मतत्त्वाला जाणण्यासाठी ज्ञानयोगात जाणण्याची प्रधानता असते आणि भक्तियोगात मानण्याची प्रधानता असते. जी वास्तविक मान्यता असते ती फार दृढ असते तिच्यात कोणीही ढवळाढवळ करू शकत नाही अर्थात् मानणारा जोपर्यंत आपल्या मान्यतेचा त्याग करत नाही तो-पर्यंत त्याच्या मान्यतेला कोणी दुसरा सोडवू शकत नाही. ज्याप्रमाणे मनुष्याने संसार आणि संसाराच्या पदार्थांना आपल्यासाठी उपयोगी मानले आहे तर ही मान्यता स्वत: सोडल्याशिवाय दुसरा कोणीही सोडवू शकत नाही. परंतु आपण हे जाणून घेतले की, हे सर्व पदार्थ उत्पन्न आणि नष्ट होणारे आहेत तर या मान्यतेचा मनुष्य त्याग करू शकतो, कारण ही मान्यता असत्य आहे, खोटी आहे. जर असत्य मान्यतेलाही दुसरा कोणी सोडवू शकत नाही तर जे वास्तविक परमात्मा सर्वांचे मूळ आहेत त्यांना एखाद्याने मानले तर ही मान्यता कशी सुटू शकेल? कारण ही मान्यता सत्य आहे. ही यथार्थ मान्यता ज्ञानापेक्षा कमी नाही तर ज्ञानाप्रमाणेच दृढ आहे.

भक्तिमार्गात मानणेच मुख्य असते. जसे दहाव्या अध्यायाच्या पहिल्या श्लोकात भगवंतांनी अर्जुनाला म्हटले आहे की, ''हे महाबाहो अर्जुन! मी तुझ्या हितासाठी सर्वश्रेष्ठ वचन सांगत आहे ते तू ऐक अर्थात् तू या माझ्या वचनाला मान'' त्या ठिकाणी भक्तीचे प्रकरण आहे म्हणून तेथे मानण्याचा विचार सांगतात. ज्ञानमार्गात जाणणे मुख्य असते. जसे चौदाव्या अध्यायात पहिल्या श्लोकात भगवंतांनी म्हटले आहे की, ''मी ज्ञानामध्ये उत्तम ज्ञान आणि सर्वोत्कृष्ट ज्ञान तुला पुन्हा सांगत आहे. ज्याला जाणल्याने सर्वचे सर्व मुनी परमसिद्धीला प्राप्त झाले आहेत.'' त्या ठिकाणी ज्ञानाचे प्रकरण आहे म्हणून तेथे जाणण्यासाठी सांगतात. भक्तिमार्गात मनुष्य मानून जाणतो आणि ज्ञानमार्गात जाणून मानतो. म्हणून पूर्ण झाल्यावर दोन्हींची एकता होत असते.

## ज्ञान आणि विज्ञानासंबंधी विशेष संकेत

संसार भगवंतापासूनच उत्पन्न होतो आणि त्यांचेच ठिकाणी लीन होतो. म्हणून भगवान् या संसाराचे महाकारण आहेत, असे मानणे ''ज्ञान'' आहे. भगवंताशिवाय आणखी कोणती वस्तूच नाही, सर्व काही भगवंतच आहेत, स्वत: भगवान्च सर्व काही बनले आहेत, असा अनुभव होणे ''विज्ञान'' आहे.

अपरा आणि परा प्रकृती माझी आहे, यांच्या संयोगापासून संपूर्ण प्राण्यांची उत्पत्ती होत असते आणि मी या संपूर्ण जगताचे महाकारण आहे (७।४-६) असे म्हणून भगवंताने ''ज्ञान'' सांगितले. माझ्याशिवाय दुसरे कोणी नाहीच. सुताच्या दोरीमध्ये त्याच सुतापासून तयार झालेल्या मण्याप्रमाणे सर्व काही माझ्यातच ओतप्रोत आहे (७।७) असे म्हणून भगवंतांनी ''विज्ञान'' सांगितले.

पाण्यातील रस, चंद्र-सूर्याची प्रभा, मीच आहे इत्यादी, संपूर्ण भूतांचे सनातन बीज मीच आहे. सात्त्विक, राजस, तामस भाव माझ्यापासूनच उत्पन्न होतात (७।८-१२) असे म्हणून ''ज्ञान'' सांगितले. हे माझ्यात आणि मी यांच्यात नाही अर्थात् सर्व काही मीच मी आहे, कारण यांची स्वतंत्र सत्ता नाही (७।१२) असे म्हणून ''विज्ञान'' सांगितले.

जो माझ्याशिवाय गुणांची सत्ता वेगळी मानतो तो मोहित होत असतो. परंतु जो गुणामुळे मोहित न होता अर्थात् हे गुण भगवंतापासूनच उत्पन्न होतात आणि भगवंतातच लीन होतात, असे मानून मला शरण होतो तो गुणमयी माया तरून जातो. असे मला शरण येणारे चार प्रकारचे भक्त असतात. अर्थार्थी, आर्त, जिज्ञासू आणि ज्ञानी (प्रेमी). हे सर्व उदार आहेत परंतु ज्ञानी अर्थात् प्रेमी मला अत्यंत प्रिय आहे आणि माझा आत्माच आहे (७। १३-१८) असे म्हणून ''ज्ञान'' सांगितले. ज्याला ''सर्व काही वासुदेवच आहे'' असा अनुभव येत असतो तो महात्मा अत्यंत दुर्लभ आहे (७। १९) असे म्हणून ''विज्ञान'' सांगितले.

मला न मानता जे कामनेमुळे देवतांना शरण जातात, त्यांना नाश होणारे फल (जन्म-मरण) मिळत असते आणि

जे मला शरण येतात त्यांना मी प्राप्त होतो. जे मला अज, अविनाशी जाणत नाहीत त्यांच्यासमोर मी प्रगट होत नाही. मी भूत, भविष्य, वर्तमान—तिन्ही काळांना आणि त्यांत राहणाऱ्या संपूर्ण प्राण्यांना जाणत असतो, परंतु मला कोणीही जाणत नाही. जे द्वन्द्वमोहापासून मोहित होत असतात ते वारंवार जन्म-मरणाला प्राप्त होतात. जे एक निश्चय करून माझ्या भजनात लागतात, त्यांची पापे नष्ट होत असतात तसेच ते निर्द्वन्द्व होत असतात. (७। २०-२८). असे सांगून ''ज्ञान'' सांगितले. जे माझा आश्रय घेतात, ते ब्रह्म, अध्यात्म, कर्म, आधिभूत, आधिदैव आणि आधियज्ञ यांना जाणतात अर्थात् चर-अचर सर्व काही मीच आहे. असा त्यांना अनुभव येतो (७। २९-३०) असे म्हणून ''विज्ञान'' सांगितले.

''**यज्ज्ञात्वा नेह भूयोऽन्यज्ज्ञातव्यमवशिष्यते**''— विज्ञानासहित ज्ञानाला जाणल्यानंतर जाणणे शिल्लक राहत नाही. तात्पर्य माझ्याशिवाय संसाराचे मूळ दुसरे कोणीच नाही केवळ मीच आहे—''**मत्तःपरतरं नान्यत्किञ्चिदस्ति धनञ्जय**'' (७। ७) आणि तत्त्वाच्या दृष्टीने सर्व काही वासुदेवच आहे ''**वासुदेवः सर्वम्**'' (७।१९) आणि दुसरे कोणी नाहीच असे जाणून घेतले तर जाणणे कसे शिल्लक राहील ? कारण याच्याशिवाय दुसरे काही जाणण्यायोग्य नाहीच. जर एका परमात्म्याला न जाणता संसाराच्या पुष्कळशा विद्यांना जाणूनही घेतले तरी वास्तविक काहीच जाणले नाही. केवळ कोरडे परिश्रमच केले असे होते.

''जाणणे काहीही शिल्लक राहत नाही'' याचे तात्पर्य इंद्रिय, मन, बुद्धीने जो परमात्म्याला जाणत असतो ते वास्तविक पूर्ण जाणणे नव्हे. कारण हे इंद्रिय, मन आणि बुद्धी प्राकृत आहेत. म्हणून हे प्रकृतीहून अतीत असलेल्या तत्त्वाला जाणू शकत नाहीत. स्वयं जेव्हा परमात्म्याला शरण जातो तेव्हा स्वयंच परमात्म्याला जाणतो. म्हणून परमात्म्याला स्वयंनेच जाणले जाऊ शकते मन, बुद्धी इत्यादीनी नव्हे.

**परिशिष्ट भाव**—परा तसेच अपरा प्रकृतीची स्वतंत्र सत्ता नाही—हे 'ज्ञान' आहे आणि परा-अपरा सर्व काही भगवान्‌च आहेत—हे 'विज्ञान' आहे. म्हणून अहम् सहित सर्व काही भगवान्‌च आहेत—हेच विज्ञानासहित ज्ञान आहे.

'**ज्ञातव्यम्**'—जे अवश्य जाणले पाहिजे आणि जे जाणले जाऊ शकते, त्याला 'ज्ञातव्य' म्हणतात.

विज्ञानासहित ज्ञानाला अर्थात् भगवंताच्या समग्ररूपाला जाणल्यावर मग जाणण्यायोग्य काहीही शिल्लक राहत नाही अर्थात् जो यथार्थ तत्त्व जाणू इच्छितो त्याच्यासाठी जाणणे काहीही शिल्लक राहत नाही. कारण, जर एका भगवंताशिवाय किंचिन्मात्रही काही नाहीच (गीता ७। ७), तर मग जाणण्यायोग्य काय शिल्लक राहील?

येथे कोणी म्हणू शकतो की, 'विज्ञानासहित ज्ञान' म्हटल्याने ज्ञानाची मुख्यता आणि विज्ञानाची गौणता झाली? परंतु वास्तविक अशी गोष्ट नाही. केवळ 'ज्ञानाने' मुक्ती तर होते. परंतु प्रेमाचा अनंत आनंद तेव्हाच मिळतो, जेव्हा त्याच्याबरोबर विज्ञानही असते. 'ज्ञान' धनाप्रमाणे आहे आणि 'विज्ञान' आकर्षण आहे. जसे धनाच्या आकर्षणात जे सुख आहे, ते धनात नाही, तसेच 'विज्ञानात' (भक्तीत) जो आनंद आहे, तो 'ज्ञानात' नाही. 'ज्ञानात' तर अखंड रस आहे, परंतु 'विज्ञानात' प्रतिक्षण वर्धमान रस आहे. म्हणून 'विज्ञानासहित ज्ञान' सांगण्यात भगवंताचा उद्देश मुख्यरूपाने 'विज्ञाना' कडेच आहे आणि त्यालाच भगवान् श्रेष्ठ सांगू इच्छितात, कारण 'विज्ञान' समग्रतेचे वाचक आहे.

***संबंध**—भगवंतांनी दुसऱ्या श्लोकात हे सांगितले की, मी विज्ञानासहित ज्ञान संपूर्णपणे सांगेन, जेणेकरून काहीही जाणण्याचे शिल्लक राहत नाही. जर जाणणे शिल्लक राहतच नाही तर मग सर्व मनुष्य त्या तत्त्वाला का जाणून घेत नाहीत. याच्या उत्तरात पुढील श्लोक सांगतात.*

## मनुष्याणां सहस्रेषु कश्चिद्यतति सिद्धये।
## यततामपि सिद्धानां कश्चिन्मां वेत्ति तत्त्वतः ॥ ३ ॥

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **सहस्रेषु** | = हजारो | **यतति** | = प्रयत्न करतो (आणि) | **कश्चित् अपि** | = कोणी एखादाच |
| **मनुष्याणाम्** | = मनुष्यांमध्ये | **यतताम्** | = (त्या) प्रयत्न करणाऱ्या | **माम्** | = मला |
| **कश्चित्** | = कोणी (एक) | **सिद्धानाम्** | = सिद्धांमध्ये (मुक्त पुरुषांमध्ये) | **तत्त्वतः** | = यथार्थरूपाने |
| **सिद्धये** | = सिद्धीसाठी (कल्याणासाठी) | | | **वेत्ति** | = जाणतो. |

*व्याख्या*— **मनुष्याणां सहस्रेषु कश्चिद्यतति सिद्धये***—हजारो मनुष्यांमध्ये कोणी एखादाच मनुष्य माझ्या प्राप्तीसाठी प्रयत्न करतो. तात्पर्य ज्यांचे ठिकाणी मनुष्यता आहे अर्थात् ज्यांचे ठिकाणी पशूंप्रमाणे केवळ खाणे-पिणे, ऐश-आराम करणे नसते तेच वास्तविक मानव आहेत. त्या मानवामध्येही जे नीती आणि धर्माने चालणारे असतात असे मानव हजारो आहेत. त्या हजारो माणसांमध्येही कोणी एखादाच मनुष्य सिद्धी-साठी† प्रयत्न करतो अर्थात् ज्यापेक्षा मोठा कोणताही लाभ नाही, ज्यात दु:खाचा लवलेशही नाही आणि आनंदाची थोडीही उणीव नाही. उणीवेची शक्यताच नाही—अशा स्वत: सिद्ध नित्यतत्त्वाच्या प्राप्तीसाठी प्रयत्न करत असतो.

जो, परलोकाच्या स्वर्ग इत्यादीच्या प्राप्तीची इच्छा करत नाही आणि या लोकात धन, मान, भोग, कीर्ती इत्यादींची इच्छा ठेवत नाही अर्थात् जो उत्पत्ति-विनाशशील वस्तूंमध्ये अडकून पडत नाही आणि भोगलेल्या भोगांचे तसेच मान-प्रतिष्ठा, आदर-सत्कार इत्यादींचे संस्कार असल्याने त्या विषयांचा संग झाल्यावर, त्याविषयाविषयी रुची असतानाही जो आपली मान्यता, उद्देश, विचार, सिद्धांत इत्यादीपासून विचलित होत नाही. असा कोणी एखादाच पुरुष सिद्धीसाठी प्रयत्न करत असतो. यावरुन सिद्ध होते की, परमात्मप्राप्तीरूपी सिद्धीसाठी प्रयत्न करणारे अर्थात् दृढतेने तिकडे मन लावणारे लोक फारच थोडे असतात.

परमात्मप्राप्तीकडे मन न लागण्याचे कारण भोग आणि संग्रहाविषयी धडपड करणे, हे आहे. सांसारिक भोग-पदार्थांत केवळ आरंभीच सुख दिसते. मनुष्य प्राय: तात्काळ सुख प्राप्ती करून देणाऱ्या साधनेतच लागतात. त्यांचा परिणाम काय होईल? याचा विचारच ते करत नाहीत. जर ते भोग आणि ऐश्वर्य यांच्या परिणामावर विचार करू लागतील की, "भोग आणि संग्रहाच्या शेवटी काहीही मिळणार नाही, रिकामे राहू आणि त्यांच्या प्राप्तीसाठी केल्या गेलेल्या पापकर्माच्या फलस्वरूपी चौऱ्यांशी लाख योनीत भ्रमण तसेच नरकांच्या रूपात दु:खच दु:ख मिळेल" तेव्हा ते परमात्मप्राप्तीच्या साधनेमध्ये लागतील. दुसरे कारण हे आहे की, बहुतेक लोक सांसारिक भोगातच लागलेले असतात. त्यापैकी काही लोक संसाराच्या भोगापासून परावृत्तही होतात परंतु ते परलोकाच्या स्वर्ग इत्यादी भोगभूमीच्या प्राप्तीत लागतात. परंतु आपले कल्याण व्हावे, परमात्म्याची प्राप्ती व्हावी, असा दृढतेने विचार करून परमात्म्याकडे लागणारे लोक फारच कमी असतात. इतिहासाकडे जरी पाहिले तरी सकामभावनेने तपश्चर्या इत्यादी साधन करणाऱ्यांचीच चरित्रे विशेषरूपाने पहावयास मिळतात. कल्याणासाठी तत्परतेने साधन करणाऱ्यांची चरित्रे फारच कमी मिळतात.

वास्तविक पाहिले तर, परमात्म्याची प्राप्ती कठीण अथवा दुर्लभ नाही. तर इकडे खऱ्या अर्थाने, अंत:करणापासून तत्परतेने लागणारे फारच कमी आहेत. इकडे दृढतेने न लागण्यात, संयोगजन्य सुखाकडे आकृष्ट होणे आणि परमात्मतत्त्वाच्या प्राप्तीसाठी भविष्याची आशा‡ ठेवणे हेच प्रधान कारण आहे.

बहुतेक लोक या (तीसऱ्या) श्लोकाला तत्त्वाची कठीणता दाखविणारा मानतात. परंतु वास्तविक हा श्लोक

---

* संख्यावाचक शब्दाला एखाद्याचे विशेषण दाखविले तर त्या शब्दात एकवचनच असते. जर त्याच्या योगात षष्ठी केली तर संख्यावाचक शब्दात तीन वचन होतात. येथे "मनुष्याणाम्" पदात सहस्र संख्याच्या योगात षष्ठी झाली आहे आणि "सहस्राणि" पदात निर्धारण अर्थात् सप्तमीचे बहुवचन झाले आहे. म्हणून "मनुष्याणां सहस्रेषु कश्चिद्यतति सिद्धये" पदांचा अर्थ झाला "मनुष्याणां सहस्राणि भगवति रुचिं कुर्वन्ति सहस्रेषु कश्चित् सिद्धये यतति च," "हजारो मनुष्य भगवंताचे ठिकाणी रुची ठेवतात, परंतु त्या हजारोंपैकी कोणी एखादा सिद्धीसाठी प्रयत्न करतो."

† स्वर्ग इत्यादी लोकांची आणि अणिमा, महिमा, गरिमा इत्यादी सिद्धींची प्राप्ती वास्तविक सिद्धी नाहीच उलट ती तर असिद्धीच आहे. कारण ती पतन करणारी अर्थात् वारंवार जन्म-मरण देणारी आहे. (९।२१) म्हणून येथे परमात्म्याच्या प्राप्तीलाच सिद्धी म्हटले गेले आहे.

‡ परमात्मा सर्व देशात, सर्व कालात, संपूर्ण व्यक्तींत, सर्व वस्तूंत, सर्व घटनांत, सर्व परिस्थितींत आणि संपूर्ण क्रियांत स्वत: परिपूर्णरूपाने विद्यमान आहेत. म्हणून त्यांच्या प्राप्तीत भविष्याचे कोणतेही कारणच नाही. परमात्मतत्त्व कर्मजन्य नाही. जी वस्तू कर्मजन्य असते, ती भविष्यात मिळत असते. कारण जी वस्तू कर्मजन्य असते ती उत्पत्ति-विनाशशील असते आणि त्यात देश, कालाचे व्यवधान राहते. म्हणून त्याच्याचसाठी भविष्य असते. मनुष्याने हा विचार करावा की, परमात्मा सर्व देशात आहेत तर येथेही आहेत, जर येथे आहेत तर कुठे जाण्याची आवश्यकता नाही. परमात्मा सर्वकाळात आहेत तर आत्ताही आहेत. जर आत्ता आहेत तर भविष्यकाळ कशासाठी? परमात्मा सर्वांत आहेत तर माझ्यातही आहेत. जर माझ्यात आहेत तर दुसऱ्या ठिकाणी शोधण्याची पराधीनता नाही. परमात्मा सर्वांचे आहेत तर माझेही आहेत. जर माझे आहेत तर मला अत्यंत प्रिय असले पाहिजेत. कारण आपली वस्तू सर्वांना अतिशय प्रिय असते. त्याचबरोबर परमात्मा सर्वोत्कृष्ट आहेत अर्थात् त्यांच्यापेक्षा श्रेष्ठ कोणी नाहीच—असा विश्वास झाल्यावर आपोआपच मन आकृष्ट होईल.

उपर्युक्त गोष्टीवर दृढ विश्वास झाला तर परमात्म्याची आशा भविष्यावर अवलंबून राहणार नाही तर परमात्म्याला तात्काळ प्राप्त करण्याची उत्कंठा प्राप्त होत असते.

तत्त्वाच्या कठीणतेचा विषय नव्हे. कारण परमात्मतत्त्वाची प्राप्ती कठीण नसते तर तत्त्वप्राप्तीची उत्कट अभिलाषा होणे आणि अभिलाषेच्या पूर्तीसाठी तत्त्वज्ञ जीवन्मुक्त महापुरुषांची संगती मिळणे दुर्लभ आहे, कठीण आहे. येथे भगवान् अर्जुनाला म्हणतात की, ''मी सांगेन आणि तू जाणशील'' तेव्हा अर्जुनासारखा आपल्या कल्याणाविषयी प्रश्न करणारा आणि भगवंतासारखे सर्वज्ञ सांगणारे मिळणे दुर्लभ आहे. वास्तविक पाहिले तर केवळ उत्कट अभिलाषा होणेच दुर्लभ आहे. कारण अभिलाषा उत्पन्न झाली असता त्याला जाणून देण्याची जबाबदारी भगवंतावर येते.

येथे **''तत्त्वतः''** म्हणण्याचे तात्पर्य तो माझ्या सगुण-निर्गुण, साकार-निराकर, शिव, शक्ती, गणेश, सूर्य, विष्णू इत्यादी रूपात प्रगट होणाऱ्या आणि वेळोवेळी निरनिराळे अवतार घेणाऱ्या मला तत्त्वाने जाणून घेतो अर्थात् त्याच्या जाणण्यात थोडाही संशय राहत नाही आणि त्याच्या अनुभवात एका परमात्मतत्त्वाशिवाय संसाराची थोडीही सत्ता राहत नाही.

**परिशिष्ट भाव**—कर्मयोग, ज्ञानयोग, ध्यानयोग इत्यादी जितकी साधने आहेत, त्या साधनांनी (प्रयत्न करून) जे सिद्ध झाले आहेत, अशा जीवन्मुक्त ज्ञानी महापुरुषांमध्येही 'सर्व काही भगवान्च आहेत'—अशाप्रकारे भगवंताच्या समग्ररूपाचा यथार्थरूपाने अनुभव करणारे प्रेमी भक्त दुर्लभ आहेत.* (गीता ७। १९)

**'यततामपि सिद्धानाम्'**—ते सिद्ध अर्थात् जीवन्मुक्त पुरुष आपल्या स्थितीत (मुक्तावस्थेत) असंतुष्ट आहेत आणि त्यांच्या अंत:करणात परमप्रेम (अनंतरस) प्राप्त करण्याची उत्कंठा आहे, भूक आहे. म्हणून ब्रह्मसूत्रात आले आहे—**'मुक्तोपसृप्यव्यपदेशात्'** (१। ३। २) 'त्या प्रेमस्वरूप भगवंताला मुक्त पुरुषांसाठीही प्राप्तव्य सांगितले गेले आहे.' कारण हे आहे की, मुक्त झाल्यावर नाशवान् रसाची कामना तर नाहीशी होते, परंतु अनंतरसाची भूक शमन होत नाही. ती भूक भगवंताच्या कृपेनेच जागृत होते. तात्पर्य हे आहे की, जे भगवंतावर श्रद्धा-विश्वास ठेवून साधन करतात, ज्यांच्या अंत:करणात भक्तीचे संस्कार आहेत, त्यांना भगवान् ज्ञानात संतुष्ट राहू देत नाहीत, त्यात टिकू देत नाहीत आणि त्यांच्या मुक्तीच्या रसाला नीरस करतात.

सिद्ध (मुक्त) तर कर्मयोगी, ज्ञानयोगी, ध्यानयोगी इत्यादी सर्वच होऊ शकतात, परंतु भगवंताच्या समग्ररूपाला जाणणारे सर्व होऊ शकत नाहीत. म्हणून **'यततामपि सिद्धानाम्'** पदांचे तात्पर्य हे आहे की, ते प्रयत्न करून आपल्या पद्धतीने सिद्ध तर झाले परंतु माझ्या स्वरूपाला जाणू शकले नाहीत. कारण माझ्या समग्ररूपाला पराभक्तीनेच जाणले जाऊ शकते—**'भक्त्या मामभिजानाति यावान्यश्चास्मि तत्त्वतः'** (गीता १८। ५५).

**'कश्चिन्मां वेत्ति तत्त्वतः'**—येथे **'माम्'** पद समग्र परमात्म्याचे वाचक आहे. भगवंताच्या समग्ररूपाला भगवंताच्या कृपेनेच जाणले जाऊ शकते, विचाराने नव्हे. (गीता १०। ११) अर्जुनानेही गीता ऐकल्यानंतर भगवंताना म्हटले की, तुमच्या कृपेनेच माझा मोह नष्ट झाला आणि स्मृती प्राप्त झाली—**'नष्टो मोहः स्मृतिर्लब्धा त्वत्प्रसादान्मयाच्युत'** (१८। ७३) जसे दूध पाजताना गाय आपल्या वासराला स्नेहपूर्वक चाटते त्यामुळे वासराची जी पुष्टी होते, ती केवळ दूध पिण्याने होत नाही. तसेच भगवंताच्या कृपेने जे ज्ञान होते, ते आपल्या विचाराने होत नाही. कारण विचारात स्वयंची सत्ता राहते.

केवळ निर्गुणाला जाणणारा परमात्म्याला तत्त्वाने जाणत नाही, तर सगुण-निर्गुण दोन्हींचा (समग्राला) जाणणाराच परमात्म्याला तत्त्वाने जाणतो.

कर्मयोगाने 'शान्तआनन्द' (शांती) प्राप्त होतो. कारण संसाराशी संबंध झाल्यानेच अशांती होते. कर्मयोगाने संसाराचा संबंध-विच्छेद झाल्याने शांती प्राप्त होते—**'त्यागाच्छान्तिरनन्तरम्'**। (१२। १२) ज्ञानयोगाने 'अखंडआनंद' प्राप्त होतो. अखंड आनन्दाला 'निजानन्द' ही म्हणतात. कारण हा आपल्या स्वरूपाचा आनंद आहे. निजानंदात जीवाने ब्रह्माशी साधर्म्य होते अर्थात् जसे ब्रह्म सत्-चित-आनन्दस्वरूप आहे, तसाच जीवसुद्धा सत्-चित्-आनंदस्वरूप होतो—**'मम साधर्म्यमागताः'** (गीता १४। २) जरी निजानंदाची प्राप्ती झाल्यावर साधकात कोणती उणीव राहत नाही, तरीही ज्याच्या अंत:करणात भक्तीचे संस्कार आहेत आणि भगवंताच्या कृपेचा आश्रय आहे, त्याला निजानंदात संतोष होत नाही.† त्याच्या अंत:करणात 'अनन्तआनन्द'

---

* धर्मसील बिरक्त अरु ग्यानी। जीवनमुक्त ब्रह्म पर प्रानी॥
सब ते सो दुर्लभ सुरराया। राम भगति रत गत मद माया॥

(मानस, उत्तर० ५४। ३-४)

† जो मुक्त होतो, त्याला तर स्वाभाविकच संतोष होतो, परंतु ज्याच्या अंत:करणात भक्तीचे संस्कार आहेत, त्याला संतोष होत नाही. कारण भक्तीचे संस्कार असणाऱ्यावर भगवान् विशेष कृपा करतात आणि त्याला कुठे थांबू देत नाहीत.

याची भूक राहते. म्हणून भक्तीयोगाने 'अनन्तआनन्द' याची प्राप्ती होते. निजानन्द तर अंशाचा (स्वरूपाचा) आनन्द आहे, परंतु अनन्तआनन्द हा अंशीचा (भगवंताचा) आनन्द आहे. असा सिद्धान्त आहे की, वस्तूच्या आकर्षणात जे सुख होते, ते सुख वस्तूच्या ज्ञानात होत नाही. जसे रुपयांच्या लोभात जे सुख प्राप्त होते ते रुपयांचे ज्ञान होण्याने प्राप्त होत नाही. रूपयांचे ज्ञान झाल्यावर त्यांचा विनियोग करणे तर कळेल, परंतु विशेष आकर्षण होणार नाही. 'आणखी मिळावे, आणखी मिळावे'—हे आकर्षण तर लोभ झाल्यानेच होईल. रुपयांचे सुख तर लोभरूप दोषामुळेच दिसते, वास्तविक नाहीच. परंतु भगवंताचा आनन्द निर्दोष प्रेमामुळे आहे, जो वास्तविक आहे. कारण भगवंताचाच अंश असल्याने जीवात अंशीचे (भगवंताचे) आकर्षण सहज आहे. हा सिद्धान्त आहे की, अंशाचे अंशीकडे स्वाभाविक आकर्षण असते. जसे—पृथ्वीचा अंश असल्यामुळे वर फेकलेला दगड आपोआप पृथ्वीकडे खेचला जातो. अग्नी आपोआप सूर्याकडे (वर) ओढला जातो,* नद्या आपोआप समुद्राकडे खेचल्या जातात, इत्यादी.

***संबंध***—*दुसऱ्या श्लोकात भगवंतांनी ज्ञान-विज्ञान सांगण्याची प्रतिज्ञा केली होती. त्या प्रतिज्ञेनुसार आता भगवान् ज्ञान-विज्ञान सांगण्याचा उपक्रम करत आहेत.*

**भूमिरापोऽनलो वायुः खं मनो बुद्धिरेव च।**
**अहङ्कार इतीयं मे भिन्ना प्रकृतिरष्टधा॥ ४॥†**
**अपरेयमितस्त्वन्यां प्रकृतिं विद्धि मे पराम्।**
**जीवभूतां महाबाहो ययेदं धार्यते जगत्॥ ५॥**

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **भूमिः** | = पृथ्वी, | **इति** | = अशाप्रकारे | | प्रकृतीपासून |
| **आपः** | = जल, | **इयम्** | = ही | **अन्याम्** | = भिन्न |
| **अनलः** | = तेज, | **अष्टधा** | = आठ प्रकारची | **जीवभूताम्** | = जीवरूप बनलेल्या |
| **वायुः** | = वायू, | **भिन्ना** | = भेद असणारी | **मे** | = माझ्या |
| **खम्** | = अकाश (—हे पंचमहाभूत) | **मे** | = माझी | **पराम्** | = परा- |
| | | **इयम** | = ही | **प्रकृतिम्** | = प्रकृतीला |
| **च** | = आणि | **अपरा** | = अपरा | **विद्धी** | = जाण, |
| **मनः** | = मन, | **प्रकृतिः** | = प्रकृती आहे | **यया** | = जिच्याद्वारा |
| **बुद्धिः** | = बुद्धी | **तु** | = आणि | **इदम्** | = हे |
| **एव** | = आणि | **महाबाहो** | = हे महाबाहो! | **जगत्** | = जगत् |
| **अहङ्कारः** | = अहंकार— | **इतः** | = या अपरा- | **धार्यते** | = धारण केले जाते. |

***व्याख्या***—**भूमिरापोऽनलो वायुः ....विद्धि मे पराम्**—परमात्मा सर्वांचे कारण आहेत. ते प्रकृतीचा स्वीकार करून सृष्टीची रचना करतात.‡ ज्या प्रकृतीचा स्वीकार करून सृष्टीची रचना करतात तिचे नाव "अपरा-प्रकृति" आहे आणि त्यांचा अंश जो जीव आहे त्याला भगवान् "परा-प्रकृति" म्हणतात. अपरा-प्रकृती निकृष्ट, जड आणि परिवर्तनशील आहे आणि परा-प्रकृती श्रेष्ठ, चेतन आणि परिवर्तनरहित आहे.

प्रत्येक मनुष्याचा भिन्न भिन्न स्वभाव असतो. ज्याप्रमाणे स्वभावाला मनुष्यापासून वेगळे करता येणे शक्य नाही त्या-

* येथे अशी शंका येऊ शकते की, रात्री सूर्य राहत नाही, तरीही अग्नी रात्री-वर का जातो? याचे समाधान असे आहे की, रात्र असो अथवा दिवस, सूर्य कुठेही असो तो नेहमी पृथ्वीच्या वरच राहतो. म्हणून जसे भारताचे लोक सूर्याला पृथ्वीच्या वर पाहतात, तसेच (पृथ्वी मंडलावर भारतापासून जवळ जवळ विपरीत दिशेत स्थित असलेले) अमेरिकेचे लोकसुद्धा सूर्याला वरच पाहतात.

† जे परिवर्तनशील आहे कधी एकरूप राहत नाही त्या जडाचेच भगवंताने अत्यंत सूक्ष्मरूपाने "क्षर" नावाने वर्णन केले आहे "क्षर:सर्वाणि भूतानि" (१५।१६). मग "भूमिरापोऽनलो वायुः ....... प्रकृतिरष्टधा" (७।४) या श्लोकात त्यालाच आठ प्रकारची "अपरा प्रकृति" च्या नावाने म्हटले आहे आणि मग "महाभूतान्यहंकारः ......पंञ्च चेन्द्रियगोचराः" (१३।५). या श्लोकात विस्तारपूर्वक चोवीस भेद सांगितले आहेत.

‡ कोठे तर प्रकृतीच्या साहाय्याने भगवान् रचना करतात (९।८) आणि कोठे भगवंताच्या अध्यक्षतेत प्रकृती रचना करते (९।१०) या दोन्हीही रीतीने गीतेत संसाराच्या रचनेचे वर्णन येते.

प्रमाणे परमात्म्याच्या प्रकृतीला परमात्म्यापासून वेगळे (स्वतंत्र) सिद्ध करता येणे शक्य नाही. ही प्रकृती प्रभूचाच एक स्वभाव आहे म्हणून हिचे नाव ''प्रकृति'' आहे. त्याचप्रमाणे परमात्म्याचा अंश असल्यामुळे जीवाला परमात्म्याहून भिन्न सिद्ध करू शकत नाही. कारण हे परमात्म्याचे स्वरूप आहे. परमात्म्याचे स्वरूप असतानाही केवळ अपरा-प्रकृतीशी संबंध जोडल्यामुळे या जीवात्म्याला प्रकृती म्हटले गेले आहे. अपरा-प्रकृतीच्या संबंधाने आपल्यात कृतिशीलता (करणे) मानल्यामुळेच हा जीवरूपी आहे. जर ह्याने आपल्यात कृतिशीलता मानली नाही तर हा परमात्मस्वरूपच आहे मग याची जीव अथवा प्रकृती संज्ञा राहत नाही अर्थात् याचे ठिकाणी बंधनकारक कर्तृत्व आणि भोक्तृत्व राहत नाही. (१८।१७)

या ठिकाणी अपरा प्रकृतीत पृथ्वी, आप, तेज, वायू, आकाश, मन, बुद्धी, आणि अहंकार हे आठ शब्द घेतले गेले आहेत. यापैकी जर पाच स्थूल भूतापासून स्थूल सृष्टी मानली तसेच मन, बुद्धी, अहंकार या तिन्हीपासून सूक्ष्म सृष्टी मानली तर या वर्णनात स्थूल आणि सूक्ष्म सृष्टी तर येईल परंतु कारणरूपी प्रकृती यात येत नाही. कारणरूपी प्रकृती-विना प्रकृतीचे वर्णन अर्धवट राहते: म्हणून आदरणीय टीकाकारांनी पाच स्थूल भूतापासून सूक्ष्म पंचतन्मात्रा (शब्द, स्पर्श, रूप, रस, गंध) यांना घेतले आहे जे पाच स्थूल भूतांचे कारण आहेत.''मन'' शब्दाने अहंकार घेतला आहे जे मनाचे कारण आहे.''बुद्धि'' शब्दाने महत्तत्त्व (समष्टी बुद्धी) आणि ''अहंकार'' शब्दाने प्रकृती घेतली गेली आहे. अशा प्रकारे या आठ शब्दांचा असा अर्थ लावल्यानेच समष्टी अपरा-प्रकृतीचे पूर्ण वर्णन होत असते, कारण यात स्थूल, सूक्ष्म आणि कारण—हे तिन्ही समष्टी शरीरे येतात. शास्त्रांत याच समष्टी प्रकृतीचे ''प्रकृति-विकृति'' नावाने वर्णन केले गेले आहे.* परंतु या ठिकाणी एक गोष्ट लक्षात ठेवण्यासारखी आहे की, भगवंतांनी येथे अपरा आणि परा प्रकृतीचे वर्णन ''प्रकृति-विकृति'' च्या दृष्टीने केले नाही. जर भगवंतांनी ''प्रकृति-विकृति'' च्या दृष्टीने वर्णन केले असते तर चेतनाला प्रकृती म्हटलीच नसती कारण चेतन प्रकृतीही नाही आणि विकृतीही नाही. यावरुन सिद्ध होते की, भगवंतांनी येथे जड आणि चेतन यांचा विभाग दाखविण्यासाठी अपरा-प्रकृतीच्या नावाने जडाचे आणि परा-प्रकृतीच्या नावाने चेतनाचे वर्णन केले आहे.

येथे असा आशय दिसतो की, पृथ्वी, आप, तेज, वायू, आणि आकाश—या पाच तत्त्वाच्या स्थूल रूपाने स्थूल सृष्टी घेतली आहे आणि यांचे सूक्ष्मरूप ज्या पंचतन्मात्रा म्हणविल्या जातात, त्यापासून सूक्ष्मसृष्टी घेतली आहे. सूक्ष्म सृष्टीचे अंग, मन, बुद्धी, अहंकार आहेत.

अहंकार दोन प्रकारचा असतो. (१) ''अहं-अहं'' असे अंत:करणाच्या वृत्तीचे नावसुद्धा अहंकार आहे जो कारणरूप आहे. ही झाली ''अपरा-प्रकृति'' ज्याचे वर्णन येथे चौथ्या श्लोकात झाले आहे आणि (२) ''अहम्'' रूपाने व्यक्तित्व, एकदेशीयतेचे नावसुद्धा अहंकार आहे, जो कर्तारूपी असतो अर्थात् आपल्याला क्रियांचा करणारा मानतो. ही झाली ''परा-प्रकृति'' ज्याचे वर्णन येथे पाचव्या श्लोकात झाले आहे. हा अहंकार कारणशरीरात तादात्म्य-रूपाने राहत असतो. या तादाम्यात एक जड अंश असतो आणि एक चेतन अंश असतो. यात जो जड अंश आहे ते कारणशरीर आहे आणि त्यात जो अभिमान करत असतो तो चेतन अंश आहे. जोपर्यंत बोध होत नाही, तोपर्यंत हा जड-चेतनाचे तादात्म्य असणारा कारणशरीराचा ''अहम्'' कर्तारूपाने निरंतर कायम राहतो. सुषुप्तीच्या वेळी हा सुप्तरूपाने राहतो अर्थात् प्रगट होत नाही. झोपेतून जागे झाल्यावर ''मी झोपलो होतो, आत्ता जागा झालो आहे '' अशा प्रकारे ''अहम्'' ची जागृती होते. यानंतर मन आणि बुद्धी जागृत होतात. जसे मी कोठे आहे, कसा आहे—ही मनाची जागृती झाली आणि मी या देशात, यावेळी आहे असा निश्चय होणे बुद्धीची जागृती झाली. अशा प्रकारे झोपेतून जागे झाल्यावर ज्याचा अनुभव होतो ती ''अहम्'' परा-प्रकृती असते आणि वृत्तीरूप जो अहंकार आहे ती अपरा-प्रकृती आहे. या अपरा प्रकृतीला प्रकाशित करणारा आणि आश्रय देणारा चेतन

---

* मूलप्रकृतिरविकृतिर्महदाद्या: प्रकृतिविकृतय: सप्त।
षोडशकस्तु विकारो न प्रकृतिर्न विकृति:पुरुष: ॥ (सांख्यकारिका ३)

तात्पर्य हे आहे की, मूळ प्रकृती तर कोणापासून उत्पन्न होत नाही म्हणून ही कोणाचीही विकृती (कार्य) नाही. मूळ प्रकृतीपासून उत्पन्न होणारे असल्यामुळे महतत्त्व, अहंकार, पंचतन्मात्रा हे सात ''विकृति'' ही आहेत आणि शब्दादी पाच विषय आणि दहा इंद्रिय यांचे कारण असल्याने ''प्रकृति'' ही आहेत अर्थात् हे सातही पदार्थ ''प्रकृति विकृति'' आहेत. शब्दादी पाच विषय दहा इंद्रिये आणि मन हे सोळा पदार्थ केवळ ''विकृति'' आहेत कारण हे कोणाचेही प्रकृती (कारण) नाहीत अर्थात् यांच्यापासून कोणताही पदार्थ उत्पन्न होत नाही.

चेतन प्रकृती नाही आणि विकृतीही नाही अर्थात् हे कोणाचे कारणही नाही आणि कार्यही नाही.

जेव्हा अपरा प्रकृतीला आपली मानतो तेव्हा ती जीवरूपी परा-प्रकृती होत असते ''**ययेदं धार्यते जगत्**''.

जर ही परा-प्रकृती अपरा प्रकृतीपासून विमुख होऊन परमात्म्याच्या सम्मुख झाली, तिने परमात्म्यालाच आपले मानले आणि अपरा-प्रकृतीला कधीही आपले मानले नाही अर्थात् अपरा-प्रकृतीशी संपूर्णपणे संबंधरहित होऊन निर्लिप्ततेचा अनुभव केला तर हिला आपल्या स्वरूपाचा बोध होतो. स्वरूपाचा बोध झाल्यावर परमात्म्याविषयी प्रेम प्रगट होते*, जे पूर्वी अपरा-प्रकृतीशी संबंध ठेवल्यामुळे आसक्ती आणि कामनेच्या रूपात होते. ते प्रेम अनंत, अगाध, असीम, आनंदरूप आणि प्रत्येक क्षणाला वाढणारे असते. त्याची प्राप्ती झाल्याने ही परा-प्रकृती प्राप्त-प्रातव्य होऊन जाते, आपल्या असंगरूपाचा अनुभव झाल्याने ज्ञात-ज्ञातव्य होऊन जाते आणि अपरा-प्रकृतीला संसाराच्या सेवेत प्रवृत्त करून, संसाराशी संपूर्णपणे विमुख झाल्याने कृतकृत्य होऊन जाते. हीच मानवजीवनाची पूर्णता आहे, सफलता आहे.

**प्रकृतिरष्टधा अपरेयम्**—या पदांनी असे लक्षात येते की, येथे जी आठ प्रकारची अपरा प्रकृती सांगितली गेली आहे ती ''व्यष्टि अपरा प्रकृति'' आहे. याचे कारण असे आहे की, मनुष्याला व्यष्टी प्रकृती (शरीर) पासूनच बंधन होत असते, समष्टी प्रकृतीपासून नव्हे. कारण मनुष्य व्यष्टी शरीराशी आत्मीयता करून घेतो ज्यामुळे बंधन होत असते.

व्यष्टी कोणते वेगळे तत्त्व नाही, तर समष्टीचाच एक लहान अंश आहे. समष्टीशी मानलेला संबंधच व्यष्टी म्हणविला जातो अर्थात् समष्टीचा अंश शरीराशी जीव आपला संबंध मानतो त्यावेळी तो समष्टीचा अंश शरीरच ''व्यष्टी'' म्हणविला जातो. व्यष्टीशी संबंध जोडणेच बंधन आहे. या बंधनातून सोडविण्यासाठी भगवंतांनी आठ प्रकारच्या अपरा-प्रकृतीचे वर्णन करून म्हटले आहे की, जीवरूपी परा-प्रकृतीनेच या अपरा-प्रकृतीला धारण केले आहे. जर धारण केले नाही तर बंधनाचा प्रश्नच उद्भवत नाही.

पंधराव्या अध्यायाच्या सातव्या श्लोकात भगवंतांनी जीवात्म्याला आपला अंश म्हटले आहे—''**ममैवांशो जीवलोके जीवभूतः सनातनः**'' परंतु तो प्रकृतीत स्थित असलेल्या मन आणि पाचही इंद्रियांना आकर्षण करतो अर्थात् त्यांना आपले मानतो—''**मनः षष्ठानीन्द्रियाणि प्रकृतिस्थानि कर्षति**'' त्याचप्रमाणे तेराव्या अध्यायाच्या पाचव्या श्लोकात भगवंतांनी क्षेत्ररूपाने समष्टीचे वर्णन करून सहाव्या श्लोकात व्यष्टीच्या विकाराचे वर्णन केले. कारण हे विकार व्यष्टीचेच असतात समष्टीचे नव्हे. या सर्वांमुळे हेच सिद्ध झाले की, व्यष्टीशी संबंध जोडणेच बाधक आहे. या व्यष्टीपासून संबंध तोडण्यासाठीच येथे व्यष्टी अपरा-प्रकृतीचे वर्णन केले गेले आहे, जी समष्टीचेच एक अंग आहे. व्यष्टी प्रकृती अर्थात् शरीर संपूर्ण समष्टी सृष्टिशी संपूर्णपणे अभिन्न आहे, भिन्न कधी होऊच शकत नाही.

वास्तविक मूळ प्रकृती कधी कोणाला बाधक अथवा साधक (सहायक) नसते. जेव्हा साधक त्याचेशी आपला संबंध मानीत नाही तेव्हा तर ती सहायक होत असते, परंतु जेव्हा तो तिच्याशी आपला संबंध मानतो तेव्हा ती बाधक होत असते, कारण प्रकृतीशी संबंध मानल्यानेच व्यष्टी अहंता (मीपणा) उत्पन्न होत असते. ही अहंताच बंधनाला कारण होत असते.

येथे ''**इतीयं मे**'' पदाने भगवान् अशी चेतावणी देत आहेत की, ही अपरा-प्रकृती माझी आहे. हिच्याशी चुकीने आपलेपणा करून घेणेच वारंवार जन्म-मरणाचे कारण आहे आणि जो चूक करतो त्याच्यावरच चुकीची दुरुस्ती करणेची जबाबदारी येते. म्हणून जीवाने या अपरा-प्रकृतीशी आपलेपणा करू नये.

अहंतेत भोगेच्छा आणि जिज्ञासा—हे दोन्हीही राहत असतात. यापैकी भोगेच्छेला कर्मयोगाद्वारा समाप्त केले जाते आणि जिज्ञासेला ज्ञानयोगाद्वारे पूर्ण केले जाते. कर्मयोग आणि ज्ञानयोग—या दोन्हीपैकी एक जरी सम्यक्दृष्टीने पूर्ण झाला तर पर्यायाने दोन्हीही पूर्ण झाल्यासारखे होतात. (५।४-५) अर्थात् भोगेच्छेची निवृत्ती झाल्यावर जिज्ञासेचीही पूर्ती होत असते आणि जिज्ञासेची पूर्ती झाल्यावर भोगेच्छेचीही निवृत्ती होत असते. कर्मयोगात भोगेच्छा समाप्त झाल्यावर तसेच ज्ञानयोगात जिज्ञासेची पूर्ती झाल्यावर असंगता आपोआप प्राप्त होत असते. त्या असंगतेचाही भोग न केल्यास वास्तविक बोध होत असतो आणि मनुष्याच्या जन्माचे सार्थक होत असते.

**जीवभूताम्**—वास्तविक हा जीवरूपी नाही, तर जीव झाला आहे. हा तर स्वतः साक्षात् परमात्म्याचा अंश आहे. केवळ स्थूल, सूक्ष्म आणि कारणशरीररूपी प्रकृतीशी संबंध

* ज्या साधकाचे ठिकाणी ज्ञानमार्गाचे विशेष महत्त्व असते त्याचे ठिकाणी परमात्म्याचे प्रेम आपल्या स्वरूपाच्या आकर्षणाच्या रूपात प्रगट होईल आणि ज्या साधकाचे ठिकाणी भक्तीचे संस्कार असतात त्याच्यासमोर ते भगवत्प्रेमाच्यारूपात प्रगट होईल. जरी ज्ञानमार्गातल्या साधकाचा आग्रह राहीला नाही तरी त्यातही प्रभू प्रेम प्रगट होईल. वास्तविक स्वरूपाचा बोध झाल्यावर ज्ञानमार्गातल्या साधकाचा आग्रह राहत नाही तरीपण त्यामध्ये प्रभू-प्रेम प्रगट होत असते—या दृष्टीने शेवटी दोन्ही (भक्तियोगी आणि ज्ञानयोगी) एक होतात.

जोडल्यानेच हा जीव झाला आहे. हा आपल्या सुखासाठी संबंध जोडतो. हेच सुख याच्या जन्म-मरणरूपी महान् दुःखाचे प्रधान कारण आहे.

**महाबाहो**—हे अर्जुन! तू मोठा शक्तिशाली आहेस म्हणून तू अपरा आणि परा प्रकृतीच्या भेदाला समजून घेण्यास समर्थ आहेस. म्हणून तू याला समजून घे ''**विद्धि**''.

**ययेदं धार्यते जगत्***—वास्तविक हे जगत् जगद्रूपी नाही तर भगवंताचेच स्वरूप आहे—''**वासुदेवः सर्वम्**'' (७।१९) ''**सदसच्चाहम्**'' (९।१९) केवळ या परा प्रकृती जीवाने या अपरा-प्रकृतीला जगत्रूपाने धारण केले आहे अर्थात् जीव या संसाराची स्वतंत्र सत्ता मानून आपल्या सुखासाठी हिचा (अपरा प्रकृतीचा) उपयोग करू लागला. यामुळेच जीव बंधनात सापडला आहे. जर हा जीव संसाराची स्वतंत्र सत्ता न मानता हिला (अपरा-प्रकृतीला) केवळ भगवत्स्वरूपच मानेल तर त्याचे जन्म-मरणरूपी बंधन समाप्त होऊन जाईल.

भगवंताची परा प्रकृती असूनही जीवात्म्याने या दृश्यमान् जगताला, जी अपरा-प्रकृती आहे, धारण केले आहे अर्थात् या परिवर्तनशील, विकारी जगताला स्थायी, सुंदर आणि सुखप्रद, मानून ''मी'' आणि ''माझे'' रूपाने धारण केले आहे. ज्याची भोगांत आणि पदार्थांत जितकी आसक्ती असते, आकर्षण असते त्याला शरीर आणि संसार तितकाच स्थायी, सुंदर आणि सुखप्रद वाटतो. पदार्थांचा संग्रह आणि त्याचा उपभोग करण्याची लालसा हीच मुख्य बाधक आहे. संग्रहाने अभिमानजन्य सुख होत असते आणि भोगाने संयोगजन्य सुख होत असते. या सुखासक्तीमुळेच जीवाने जगताला जगत्रूपाने धारण केले आहे. सुखासक्तीमुळेच तो या जगताला भगवत्स्वरूपाने पाहू शकत नाही. जसे स्त्री वास्तविक जनन-शक्ती आहे. परंतु स्त्रीविषयी आसक्त असलेला पुरुष स्त्रीला मातृरूपाने पाहू शकत नाही. त्याचप्रमाणे संसार वास्तविक भगवत्स्वरूप आहे परंतु संसाराला आपले भोग्य समजणारा भोगासक्त पुरुष संसाराला भगवत्स्वरूप पाहू शकत नाही. ही भोगासक्तीच जगताला धारण करविते अर्थात् जगताला धारण करण्यात कारण आहे.

दुसरी गोष्ट सर्व माणसांच्या शरीरांची उत्पत्ती रजवीर्यानेच होत असते, जे स्वरूपाने स्वतःच मलिन आहे. परंतु भोगाविषयी आसक्त असलेल्या पुरुषांची त्या शरीराविषयी मलिन बुद्धी होत नाही तर रमणीय बुद्धी होत असते. ही रमणीय बुद्धीच जगताला धारण करविते.

नदीच्या काठावर उभे असलेल्या एका संताला एकाने म्हटले की ''पहा महाराज! हे नदीचे पाणी वाहत आहे आणि त्या पूलावर मनुष्य वाहत आहेत'' संताने त्याला म्हटले की, ''पहा बंधुराज! नदीचेच पाणी नव्हे तर स्वतः नदीही वाहत आहे आणि पूलावर मनुष्यच नव्हे तर स्वतः पूलही वाहत आहे.'' तात्पर्य हे नदी, पूल तसेच मनुष्य फार वेगाने नाशाकडे जात आहेत. एक दिवस असा येईल की, ज्यावेळी ही नदी, हा पूल आणि ही माणसे काहीच राहणार नाही. त्याचप्रमाणे ही पृथ्वीही वाहत आहे अर्थात् प्रलयाकडे जात आहे. अशा प्रकारे भावरूपाने दिसणारे हे सर्व जग प्रत्येक क्षणाला अभावामध्ये जात आहे परंतु जीवाने याला भावरूपाने अर्थात् ''आहे'' रूपाने धारण (स्वीकार) केले आहे. परा प्रकृतीची (स्वरूपाने) उत्पत्ती होत नाही परंतु अपरा प्रकृतीशी तादात्म्य केल्यामुळे हा जीव शरीराच्या उत्पत्तीला आपली उत्पत्ती मानतो आणि शरीराच्या नाशाला आपला नाश मानतो, ज्यामुळे हा जन्मत-मरत राहतो. जर ह्याने अपरा-प्रकृतीशी संबंध प्रस्थापित केला नाही, त्यापासून विमुख झाला, अर्थात् भावरूपाने हिला सत्ता दिली नाही तर जगत् सत्रूपाने दिसूच शकणार नाही.

**इदम्**—या पदाने शरीर आणि संसार दोन्ही घेतले पाहिजेत कारण शरीर आणि संसार वेगवेगळे नाहीत. तत्त्वतः एकच आहेत. शरीर आणि संसाराचा भेद केवळ मानलेला आहे वास्तविक अभेदच आहे. म्हणून तेराव्या अध्यायात भगवंतांनी ''**इदं शरीरम्**'' पदांनी शरीराला क्षेत्र म्हटले (१३।१) परंतु जेथे क्षेत्राचे वर्णन केले आहे तेथे समष्टीचेच वर्णन झाले आहे (१३।५) आणि इच्छा-द्वेषादी विकार व्यष्टीचे मानले गेले आहेत. (१३।६) कारण इच्छा इत्यादी विकार व्यष्टी प्राण्याच्या ठिकाणीच असतात. तात्पर्य समष्टी आणि व्यष्टी तत्त्वतः एकच आहेत. एक असतानाही आपल्याला शरीर मानल्याने ''अहंता'' आणि शरीराला आपले मानल्याने ''ममता'' उत्पन्न होत असते, ज्यामुळे बंधन होते. जर शरीर आणि संसाराच्या अभिन्नतेचा अथवा आपल्या आणि भगवंताच्या अभिन्नतेचा साक्षात् अनुभव झाला तर अहंता आणि ममता आपोआप समाप्त होतात. ह्या अहंता आणि ममता कर्मयोग, ज्ञानयोग आणि भक्तियोग या तिन्हीनेही समाप्त होतात.

* गीतेत ''जगत्'' शब्द कोठे ''परा'' प्रकृतीचा (७।१३) कोठे ''अपरा'' प्रकृतीचा (७।५) आणि कोठे ''परा-अपरा'' दोन्ही प्रकृतीचा वाचक आहे (७।६)

कर्मयोगाने— "**निर्ममो निरहंङ्कारः**" (२।७१) ज्ञानयोगाने— "**अहङ्कारं.........विमुच्य निर्ममः**" (१८।५३) आणि भक्तियोगाने "**निर्ममो निरहङ्कारः**" (१२।१३). तात्पर्य जडतेशी संबंध-विच्छेद झाला पाहिजे, जो केवळ मानलेला आहे. म्हणून विवेकपूर्वक न मानल्याने अर्थात् वास्तविकतेचा अनुभव करून घेतल्यास तो मानलेला संबंध समाप्त होतो.

## विशेष गोष्ट

ज्याप्रमाणे गुरु-शिष्याचा संबंध असतो त्यावेळी गुरू शिष्याला आपला शिष्य मानतो, शिष्य गुरूला आपला गुरू मानतो. अशा प्रकारे गुरू वेगळा असतो आणि शिष्य वेगळा असतो अर्थात् त्या दोघांची वेगवेगळी सत्ता दिसते. परंतु त्या दोघांच्या संबंधाने एक तिसरी सत्ता प्रतीत होऊ लागते, जिला "संबंधाची सत्ता" म्हणतात*. त्याचप्रमाणे साक्षात् परमात्म्याचा अंश जीवाने शरीर संसाराशी आपला संबंध मानून घेतला आहे. या संबंधामुळे एक तीसरी सत्ता प्रतीत होऊ लागते तिला "मी" पणा असे म्हणतात. संबंधाची ही सत्ता ("मी" पणा) केवळ मानलेलीच आहे वास्तविक नव्हेच. जीव अज्ञानाने या मानलेल्या संबंधाला सत्य समजतो अर्थात् याविषयी सद्भाव करतो आणि बांधला जातो. अशा प्रकारे जीव संसाराने नव्हे तर संसाराशी मानलेल्या संबंधानेच बांधला जातो.

गुरू आणि शिष्यात तर दोघांची वेगवेगळी सत्ता आहे आणि दोघेही एकमेकाशी संबंध मानतात. परंतु जीव (चेतन) आणि संसार (जड) या दोन्हीत केवळ एका जीवाचीच वास्तविक सत्ता आहे आणि तोच अज्ञानाने संसाराशी आपला संबंध मानत असतो. संसार प्रत्येक क्षणाला नाश होत आहे म्हणून त्याचेशी मानलेला संबंधही प्रत्येक क्षणाला आपोआप नष्ट होत असतो. असे असतानाही जोपर्यंत संसारात सुख वाटत असते तोपर्यंत त्याच्याशी मानलेला संबंध स्थायी वाटतो. तात्पर्य संसाराशी मानलेला संबंध सुखासक्तीवर टिकून असतो. संसाराशी सुखासक्तिपूर्वक मानलेल्या संबंधामुळेच संसार अप्राप्त असूनही प्राप्त आणि परमात्मा प्राप्त असूनही अप्राप्त वाटतात. संसाराशी मानलेला संबंध तुटताच परमात्म्याच्या वास्तविक संबंधाचा अथवा संसाराच्या अप्राप्तीचा आणि परमात्म्याच्या प्राप्तीचा अनुभव होतो.

"मी" पणाला समाप्त करण्यासाठी साधकाने प्रकृती आणि प्रकृतीच्या कार्याला आपले स्वरूप समजू नये, त्याच्यापासून काही मिळविण्याची इच्छा ठेवू नये, तसेच आपल्यासाठी काहीही करू नये. जे काही करावयाचे ते सर्व केवळ संसाराच्या सेवेसाठीच करत रहावे. तात्पर्य जे काही प्रकृतिजन्य पदार्थ आहेत त्या सर्वांचे संसाराशी ऐक्य आहे. म्हणून त्यांना केवळ संसाराचे मानून संसाराच्या सेवेतच उपयोगात आणावे. यामुळे क्रिया आणि पदार्थांचा प्रवाह संसाराकडे होतो आणि आपले स्वरूप अवशिष्ट राहते अर्थात् आपल्या स्वरूपाचा बोध होतो. हा कर्मयोग झाला. ज्ञानयोगात विवेक-विचारपूर्वक प्रकृतीचे कार्य क्रिया आणि पदार्थ यांच्याशी संपूर्णपणे संबंध-विच्छेद झाल्यावर स्वरूपाचा बोध होत असतो. अशा प्रकारे जडाच्या संबंधाने जी अहंता ("मी" पणा) उत्पन्न झाली होती त्याची निवृत्ती होते.

भक्तियोगात "मी" केवळ भगवंताचा आहे आणि केवळ भगवान्‌च माझे आहेत तसेच मी शरीर-संसाराचा नाही आणि शरीर-संसार माझे नाहीत"—अशी दृढ मान्यता करून भक्त संसाराशी विमुख होऊन केवळ भगवत्परायण होत असतो, ज्यामुळे संसाराचा संबंध आपोआप तुटून जातो आणि अहंतेची निवृत्ती होत असते.

अशाप्रकारे कर्मयोग, ज्ञानयोग, भक्तियोग—या तिन्हीपैकी कोणत्याही एकाचे ठीक अनुष्ठान झाल्यास जडतेशी संपूर्णपणे संबंध-विच्छेद होऊन परमात्मतत्त्वाची प्राप्ती होत असते.

**परिशिष्ट भाव**—जेव्हा चेतन अपरा-प्रकृतीबरोबर तादात्म्य करते अर्थात् 'अहम्' बरोबर एक होऊन आपल्याला 'मी आहे' असे मानते, तेव्हा ती जीवरूप बनलेली 'परा-प्रकृती' म्हटली जाते. 'अहम्' (मी) च्या इकडे जगत् (अपरा-प्रकृती) आहे आणि तिकडे परमात्मा आहेत. परंतु जीव त्या परमात्म्याला स्वीकार न करता, उलट त्यांच्या अपरा-प्रकृतीला स्वीकार करून त्याला जगत्‌रूपाने धारण करतो आणि जन्म-मरणरूप बंधनात पडतो.

**'अपरेयमितस्त्वन्याम्'**—अपराहून दुसरी परा आहे आणि पराहून दुसरी अपरा आहे. अपरा 'अन्य' अर्थात् विजातीय आहे. अन्याला पकडल्यानेच परा 'जीव' बनली आहे—**'जीवभूताम्'**।

अपरा (परिवर्तनशील) आणि परा (अपरिवर्तनशील)—दोन्हीही भगवंताच्या प्रकृती अर्थात् शक्ती आहेत, स्वभाव आहेत.

* गुरु-शिष्याच्या संबंधात गुरूचे काम केवळ शिष्याचे हित करणे असते आणि शिष्याचे काम केवळ गुरूची सेवा करणे असते. अशा प्रकारे संसारात मानलेले जितके काही संबंध आहेत सर्व केवळ एक दुसऱ्याचे हित अथवा सेवा करण्यासाठीच आहेत, आपल्यासाठी नव्हे.

भगवंताची शक्ती असल्यामुळे दोन्ही भगवंतापासून अभिन्न आहेत. कारण शक्तिमानाला सोडून शक्तीची स्वतंत्र सत्ता नसते. जसे नख आणि केस निष्प्राण असूनही आपल्या प्राणयुक्त शरीरापासून वेगळे नाहीत, तसेच अपरा-प्रकृती जड असूनही चेतन भगवंतापासून वेगळी नाही—'**सदसच्चाहमर्जुन**'। (गीता ९।१९) अशाप्रकारे जर अपरा आणि परा—दोन्ही प्रकृती भगवंताच्या स्वरूप झाल्या तर मग भगवंताला सोडून काय शिल्लक राहिले? काहीही शिल्लक राहिले नाही—'**वासुदेवः सर्वम्**'। (गीता ७। १९). तात्पर्य हे आहे की, अपरा आणि परा दोन्ही प्रकृतीसहित भगवंताचे स्वरूप 'समग्र' आहे अर्थात् परा-अपरा, सत्-असत, जड-चेतन सर्व काही भगवान्‌च आहेत.

'**ययेदं धार्यते जगत्**'चे तात्पर्य आहे की, संसार भगवंताच्या दृष्टीतही नाही आणि महात्म्याच्या दृष्टीतही नाही, तर जीवाच्या दृष्टीत (मान्यतेत) आहे. भगवंताच्या दृष्टीत सत्-असत् सर्व काही तेच आहेत—'**सदसच्चाहमर्जुन**' (गीता ९। १९) आणि महात्म्याच्या दृष्टीतही सर्व काही भगवान्‌च आहेत—'**वासुदेवः सर्वम्**' (गीता ७।१९). जीवानेच जगताला राग-द्वेषामुळे आपल्या बुद्धीत धारण केले आहे. हीच गोष्ट पुढे पंधराव्या अध्यायाच्या सातव्या श्लोकात '**मनःषष्ठानीन्द्रियाणि प्रकृतिस्थानि कर्षति**' पदांनी म्हटले गेली आहे. जगताला सत्ता दिल्यानेच राग-द्वेष पैदा होतात.

जीवाने संसाराची सत्ता मानली आणि सत्ता मानून त्याला महत्ता दिली. महत्ता दिल्यामुळे कामना अर्थात् सुखभोगाची इच्छा निर्माण झाली, ज्यामुळे जीव जन्म-मरणात पडला. तात्पर्य हे झाले की, एका भगवंताशिवाय दुसरी सत्ता मानल्यामुळेच जीव संसार-बंधनात पडला आहे. म्हणून दुसरी सत्ता न मानण्याची जबाबदारी जीवाचीच आहे. जर त्याने संसाराची सत्ता मानली नाही तर संसार आहेच कुठे?

भगवंतांनी पृथ्वी, जल, तेज, वायू, आकाश, मन, बुद्धी आणि अहम्—या आठांना अपरा (जड) प्रकृती म्हटले आहे.* म्हणून जसे पृथ्वी जड आणि जाणण्यात येणारी आहे. तसेच अहम्ही जड आणि जाणण्यात येणारा आहे. तात्पर्य हे आहे की, पृथ्वी, जल इत्यादी आठही एकाच जातीचे आहेत.† म्हणून ज्या जातीची पृथ्वी आहे त्याच जातीचा अहम्ही आहे अर्थात् अहम् सुद्धा मातीच्या ढेकळाप्रमाणे जड आणि दृश्य आहे. म्हणून भगवंताने अहम्‌ला एतत् ने संबोधले आहे—'**एतद् यो वेत्ति**'। (गीता १३। १) '**एतत**' (हे) कधी 'अहम्' (मी) होत नाही. म्हणून अहम्‌ला एतत् ने संबोधण्याचे तात्पर्य हे आहे की, हे आपले स्वरूप नाही. परंतु जेव्हा चेतन (जीव) या अहम्‌शी आपले तादात्म्य मानतो तेव्हा तो बांधला जातो—'**अहङ्कारविमूढात्मा कर्ताहमिति मन्यते**' (गीता ३। २७) यालाच चिज्जडग्रंथी म्हणतात.

'**अहङ्कार इतीयं मे**'—हा धातुरूप अहंकार तर अपरा-प्रकृतीचा (जडाचा) आहे, परंतु 'मी आहे'—हा ग्रंथिरूप अहंकार केवळ अपरा-प्रकृतीचा नाही, तर यात परा-प्रकृतीही (चेतन) ही मिसळलेली आहे. तत्त्वज्ञान झाल्यावर हा जन्म-मरणदायी ग्रंथिरूप अहंकार तर राहत नाही, परंतु अपरा-प्रकृतीचा धातुरूप अहंकार राहतो.

क्रिया आणि पदार्थ परा-प्रकृतीतही नाहीत आणि परमात्म्यातही नाहीत, तर अपरा-प्रकृतीत आहेत. अपरा-प्रकृती क्रियारूप आणि पदार्थरूप आहे. परमात्मा प्रकृतीच्या साहाय्यानेच सृष्टि-रचना करतात. परा-प्रकृती अर्थात् जीव क्रिया आणि पदार्थरूप अपरा-प्रकृतीत आसक्ती करून आणि त्याचा आश्रय घेऊन बांधला जातो. अपराची आसक्ती करणे आणि त्याचा आश्रय घेणे हेच जगताला धारण करणे आहे. म्हणून भगवंताने सातव्या अध्यायाच्या आरंभीच '**मय्यासक्तमनाः पार्थ योगं युञ्जन मदाश्रयः**' पदांनी आपल्यात आसक्ती (प्रेम) करण्याची आणि आपला आश्रय घेण्याची गोष्ट म्हटली आहे. जर जीवाने अपरा-प्रकृतीत आसक्ती ठेवली नाही आणि तिचा आश्रय घेतला नाही, तर तो मुक्त होईल. जर तो भगवंतात आसक्ती (प्रेम) करेल आणि त्यांचा आश्रय घेईल तर तो भक्त होईल.

जगताची स्वतंत्र सत्ता नाही. बांधणारे जगत तर जीवानेच बनविले आहे. जीव जगताला धारण करतो, म्हणूनच सुख-

---

* पृथ्वी स्थूल आहे. पृथ्वीहून सूक्ष्म जल आहे. जलाहून सूक्ष्म तेज आहे. तेजाहून सूक्ष्म वायू आहे. वायूहून सूक्ष्म आकाश आहे. आकाशहून सूक्ष्म मन आहे. मनाहून सूक्ष्म बुद्धी आहे. बुद्धीहून सूक्ष्म अहम् आहे. अपरा-प्रकृतीत अहम् सर्वात सूक्ष्म आहे. अशाप्रकारे भगवंताने स्थूलापासून सूक्ष्मापर्यंत क्रमाने अपरा-प्रकृतीचे वर्णन केले आहे.

† एक अनेकात अनुगामी असेल तर त्याला 'जाती' म्हणतात. पृथ्वी, जल, तेज, वायू, आकाश, मन, बुद्धी आणि अहम्—या आठात जातीय एकता तर आहे परंतु स्वरूपाची एकता नाही अर्थात् जाती एक असूनही यांचे स्वरूप वेग-वेगळे आहे. म्हणूनच यांना 'अष्टधा' म्हटले गेले आहे. अपरा-प्रकृतीचे कार्य असल्यामुळे येथे पृथ्वी, जल इत्यादींनाही अपरा-प्रकृती म्हटले गेले आहे.

दु:ख होतात, बन्धन होते, चौऱ्यांशी लक्ष योनी, भूत, प्रेत, पिशाच, देवता इत्यादी योनी तसेच नरकांची प्राप्ती होते. सत्त्व, रज आणि तम—हे तीन गुण कोणती बाधा करत नाहीत. परंतु यांचा संग करण्याने जीव ऊर्ध्वगती, मध्यगती अथवा अधोगतीत जातो—**'कारणं गुणसङ्गोऽस्य सदसद्योनिजन्मसु'**। (गीता १३। २१) गुणांचा संग जीव स्वत: करतो. अपरा-प्रकृती कोणा-बरोबर कोणता संबंध करीत नाही. संबंध प्रकृतीही करीत नाही, गुणही करीत नाहीत, इंद्रियेही करीत नाहीत, मनही करीत नाही किंवा बुद्धीही करीत नाही. जीव स्वत:च संबंध करतो, म्हणूनच सुखी-दुखी होते, जन्म-मरणात जातो. जीव स्वतंत्र आहे, कारण हा 'परा' अर्थात् उत्कृष्ट प्रकृती आहे. अपरा-प्रकृती तर बिचारी काही करत नाही. कारण तिच्यात चेतना आणि कामना नाही. तिच्याशी संबंध जोडून, तिचा सदुपयोग-दुरुपयोग करून जीव उच्च-नीच गतीत जातो, भटकतो. तात्पर्य हे आहे की, अपरिवर्तनशील असूनही जीव विजातीय जगताशी संबंध जोडून परिवर्तनशील जगत्‌रूप होतो.* (गीता ७। १३) त्याची दृष्टी शरीराकडेच राहते, स्वत:च्या स्वरूपाची स्फुरणा होतच नाही!

जो आपल्यापासून सर्वथा वेगळा आहे, त्या जगताशी अर्थात् शरीर-इंद्रिये-मन-बुद्धी-अहम् यांच्याशी आपली एकता मानली—हेच जगताचे धारण करणे आहे, वास्तविक जगत् आपले नाहीच. कारण जर आपली वस्तू आपल्याला मिळाली असती, तर आपल्या कामना नेहमीसाठी समाप्त झाल्या असत्या. आपण निर्मम, निर्भय, निश्चिन्त, निष्काम झाले असतो. परंतु जगत् आपणाला अशी वस्तू देऊ शकत नाही, जी आपली आहे अर्थात् जी आपल्यापासून कधी वेगळी होत नाही. जी वस्तू वास्तविक आपली आहे ती जगताद्वारा प्राप्त होऊ शकत नाही, तर जगताच्या संबंध-विच्छेदाने प्राप्त होऊ शकते. आपली वस्तू आहे—परमात्मा आपण त्या परमात्म्याचेच अंश आहोत—**'ममैवांशो जीवलोके'**। (गीता १५। ७) त्याच्या प्राप्तीचा उपाय (कर्मयोगाच्या दृष्टीने) हा आहे की, जगतापासून मिळालेल्या वस्तूंना (शरीरादींना) जगताच्या सेवेत लावावे आणि त्याच्या मोबदल्यात त्याच्यापासून कशाचीही आशा (फलेच्छा) ठेवू नये. त्याच्याशी कोणता संबंध जोडू नये, क्रियांशीही जोडू नये किंवा पदार्थांशीही जोडू नये. सेवा करण्यापेक्षाही कोणाला दु:ख न देणे श्रेष्ठ आहे. कोणालाही दु:ख न देण्यामुळे, कोणाचेही अहित न करण्यामुळे सेवा आपोआप होऊ लागते, करावी लागत नाही.† आपोआप होणाऱ्या क्रियेचा अभियान येत नाही आणि त्याच्या फलाची इच्छाही होत नाही. अभिमान आणि फलेच्छेचा त्याग झाल्यावर आपणाला ती वस्तू प्राप्त होते जी वास्तविक आपली आहे.

वास्तविक अपरा प्रकृतीची परमात्म्याशिवाय वेगळी सत्ता नाही—**'नासतो विद्यते भाव:'**। तिला विशेष सत्ता जीवानेच दिली आहे. जसे रुपयांचे स्वत:चे कोणते महत्त्व नाही. आपणच लोभामुळे त्यांना महत्त्व देतो, त्यातच आपले आकर्षण होते. महत्त्व तेव्हा देतो, जेव्हा दोषांचा स्वीकार करतो.‡ कामरूप दोषामुळेच स्त्रीत आकर्षण होते, लोभरूप दोषामुळेच धनात आकर्षण होते, मोहरूप दोषामुळेच कुटुंब-परिवारात आकर्षण होते इत्यादी. परंतु दोषांबरोबर तादात्म्य झाल्यामुळे दोष दोषरूपाने दिसत नाहीत आणि आपणाला हे कळत नाही की, आपणच त्यांना (अपरा-प्रकृतीला) सत्ता आणि महत्ता देत आहोत. तादात्म्य समाप्त झाल्यावर दोष तर राहत नाही आणि गुण दिसत नाही!

अनंत ब्रह्मांडात तीन लोक, चौदा भुवने, जड-चेतन, स्थावर-जंगम, थलचर-जलचर-नभचर, जरायुज-अण्डज-स्वेदज-उद्भिज, सात्त्विक, राजस, तामस, मनुष्य, देवता, पितर, गंधर्व, पशू, पक्षी, कीट, पतंग, भूत-प्रेत-पिशाच, ब्रह्म राक्षस इत्यादी जे काही पाहण्यात, ऐकण्यात, वाचण्यात आणि कल्पना करण्यात येते, त्यात 'परा' आणि 'अपरा'—या दोन प्रकृतीशिवाय काहीही नाही. जे पाहण्यात, ऐकण्यात, वाचण्यात व कल्पना करण्यात येते आणि शरीर-इंद्रिये-मन-बुद्धी-अहम् यांच्याद्वारा जे पाहिले, ऐकले, वाचले मनन केले जाते, ते सर्वचे सर्व 'अपरा' आहे. परंतु जी पाहते, ऐकते, वाचते, मनन करते, जाणते, मानते ती 'परा' आहे. परा आणि अपरा दोन्हीही भगवंताच्या शक्ती असल्यामुळे भगवंताशी अभिन्न अर्थात् भगवत्स्वरूपच आहेत.

---

* येथे 'जगत्' शब्द परिवर्तनशील याचा वाचक आहे— 'गच्छतीति जगत्'।

† कोणाचेही अहित न करण्यामुळे दोन गोष्टी होतील—आपण काही करणार नाही, जर काही करू तर आपल्याकडून सेवाच होईल. काही न करणे अथवा सेवा करणे—या दोन्हीपासूनही संसाराशी संबंध-विच्छेद होतो. कारण काही न करण्यात कोणता दोष होतच नाही आणि आपोआप सेवा झाल्यामुळे सर्व दोष समाप्त होतात. जसे भोजन करण्यात 'मी खातो'—अशा प्रकारे जो अभिमान असतो, तो भोजन पचण्यात नसतो. कारण ते आपोआप पचते. तसेच सेवा आपोआप होण्यामुळे कर्तृत्वाभिमान आणि फलासक्ती यांचा त्याग सहज होतो.

‡ संसारातील सर्व सुख दोषजनित आहेत. दोषांचा स्वीकार करण्यानेच सुख दिसते. कामामुळेच मनुष्य स्त्रीविना राहू शकत नाही. लोभामुळेच मनुष्य धनाविना राहू शकत नाही. मोहामुळेच मनुष्य परिवाराविना राहू शकत नाही. दोषामुळेच त्याला त्यागाचे महत्त्व वाटत नाही.

म्हणून अनंत ब्रह्मांडाच्या आत व बाहेर आणि अनंत ब्रह्मांडांच्या रूपात एका भगवंताशिवाय किंचिन्मात्र काही नाही—'**वासुदेवः सर्वम्**' (७। १९), '**सदसच्चाहमर्जुन**'। (९। १९) संसारातील सर्व दर्शन, मत-मतांतरे आचार्यांनी मांडलेली आहेत. परंतु '**वासुदेवः सर्वम्**' कोण्या आचार्याचे दर्शन, मत नाही, तर साक्षात् भगवंताचा अटळ सिद्धान्त आहे, ज्याच्या अंतर्गत सर्वच दर्शने, मत-मतान्तरे येतात.

'अपरा' ला (जगताला) स्वतंत्र सत्ता जीवानेच दिली आहे—'**ययेदं धार्यते जगत्**'। 'अपरा' ही भगवंताची आहे. परंतु तिला अर्थात् शरीर-इंद्रिये-मन-बुद्धी-अहम् यांना आपले आणि आपल्यासाठी मानल्यामुळेच जीव बंधनात पडला आहे. म्हणून साधकाला जर जगत दिसत आहे तर ही त्याची व्यक्तिगत दृष्टी आहे. व्यक्तिगत दृष्टी सिद्धान्त होत नाही. दिसणे सीमित असते, परंतु तत्त्व असीम असते. जसे सूर्य थाळीप्रमाणे दिसतो, परंतु वास्तविक तो थाळीच्या आकाराचा नसतो, तर पृथ्वीपेक्षाही कित्येक पटीने अधिक मोठा आहे.

जर साधकाला जगत दिसत असेल तर त्याने निष्कामभावपूर्वक जगताची सेवा केली पाहिजे. जगताला आपले व आपल्यासाठी मानणे आणि त्यापासून सुख घेणे हेच असाधन आहे, बन्धन आहे. कारण आपल्याजवळ शरीर-इंद्रिये-मन-बुद्धि इत्यादी जे काहीही आहे, ते सर्व जगताचे आहे आणि जगतासाठी आहे. म्हणून जगताची वस्तू जगताच्या सेवेत लावल्याने जगत् जगत्‌रूपाने दिसणार नाही, तर भगवत्स्वरूप दिसू लागेल, जे वास्तविक आहे. तात्पर्य हे आहे की, साधक मग जगताला मानो, आत्म्याला मानो अथवा परमात्म्याला मानो, कोणालाही मानून तो साधन करू शकतो आणि अंतिम तत्त्वाचा '**वासुदेवः सर्वम्**' चा अनुभव करू शकतो.

***संबंध—*** *पूर्व श्लोकात भगवंतांनी म्हटले आहे की, परा प्रकृतीने अपरा प्रकृतीला धारण केले आहे. त्याचेच स्पष्टीकरण करण्यासाठी आता पुढचा श्लोक सांगत आहेत.*

**एतद्योनीनि भूतानि सर्वाणीत्युपधारय।**
**अहं कृत्स्नस्य जगतः प्रभवः प्रलयस्तथा॥ ६॥**

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **सर्वाणि** | = संपूर्ण | | संयोगच कारण आहे— | **कृत्स्नस्य** | = संपूर्ण |
| **भूतानि** | = प्राण्यांच्या (उत्पन्न होण्यात) | **इति** | = असे | **जगतः** | = जगताचा |
| **एतद्योनीनि** | = अपरा आणि परा—या दोन्ही प्रकृतींचा | **उपधारय** | = तू समज. | **प्रभवः** | = प्रभव |
| | | **अहम्** | = मी | **तथा** | = आणि |
| | | | | **प्रलयः** | = प्रलय आहे. |

***व्याख्या—*** **एतद्योनीनि भूतानि***—जितके काही देवता, मनुष्य , पशू, पक्षी इत्यादी जंगम आणि वृक्ष, लता, गवत इत्यादी स्थावर प्राणी आहेत ते सर्वचे सर्व माझ्या अपरा आणि परा प्रकृतीच्या संबंधानेच उत्पन्न होतात.

तेराव्या अध्यायाच्या सव्वीसाव्या श्लोकातही भगवंतांनी क्षेत्र आणि क्षेत्रज्ञाच्या संबंधापासून संपूर्ण स्थावर जंगम प्राण्यांची उत्पत्ती सांगितली आहे. हीच गोष्ट सामान्य रीतीने चौदाव्या अध्यायाच्या चौथ्या श्लोकातही सांगितली आहे की, स्थावर-जंगम योनीत उत्पन्न होणारी जितकी शरीरे आहेत ती सर्व प्रकृतीची आहेत आणि त्या शरीरामध्ये जे बीज अर्थात् जीवात्मा आहे, तो माझा अंश आहे. त्याच बीजाला अर्थात् जीवात्म्याला भगवंतांनी ''परा-प्रकृती'' (७।५) आणि ''आपला अंश'' (१५।७) म्हटले आहे.

**सर्वाणीत्युपधारय**—स्वर्गलोक, मृत्युलोक, पाताळ-लोक इत्यादी संपूर्ण लोकांचे जितके काही स्थावर-जंगम प्राणी आहेत ते सर्वचे सर्व अपरा आणि परा प्रकृतीच्या संयोगानेच उत्पन्न होत असतात. तात्पर्य, परा-प्रकृतीने अपरा-प्रकृतीला आपले मानले आहे†. तिच्याशी सहवास केला आहे म्हणून सर्व प्राणी उत्पन्न होतात—हे तू विचारात घे अर्थात् योग्य रीतीने समजून घे अथवा मानून घे.

* ''एतद्योनीनि भूतानि'' पदाचा अर्थ आहे—''एते अपरा-परे योनी कारणे येषां तानि'' अर्थात् ''अपरा आणि परा ह्या दोन प्रकृतीं ज्यांचे कारण आहेत असे संपूर्ण प्राणी''

† यात एक विचित्र गोष्ट आहे की, संबंध केवळ क्षेत्रज्ञाने मानला आहे, क्षेत्राने नव्हे. जर हा आपला संबंध मानणार नाही तर याचा पुर्नजन्म होऊच शकत नाही. कारण पुनर्जन्माचे कारण गुणांचा संगच आहे—''कारणं गुणसङ्गोऽस्य सदसद्योनिजन्मसु'' (१३।२१)

**अहं कृत्स्नस्य जगतः प्रभवः प्रलयस्तथा**—सर्व वस्तूंना सत्ता स्फूर्ती परमात्म्यापासूनच मिळत असते, म्हणून भगवान् म्हणतात की, मी संपूर्ण जगताला उत्पन्न करणारा आणि प्रलय करणारा आहे.

"**प्रभवः**" म्हणजे मीच या जगताचे निमित्त कारण आहे कारण संपूर्ण सृष्टी माझ्या संकल्पाने* उत्पन्न झाली आहे "**सदैक्षत बहु स्यां प्रजायेयेति**" (छादोग्य० ६ । २ । ३)

जसे मातीचा घडा बनविण्यात कुंभार आणि सोन्याचे अलंकार बनविण्यात सोनार निमित्त कारण आहे. तसेच सर्व संसाराच्या उत्पत्तीमध्ये भगवंतच निमित्त कारण आहेत.

"**प्रलयः**" म्हणण्याचे तात्पर्य या जगताचे उपादान कारणही मीच आहे. कारण एकंदर कार्य, उपादान कारणापासून उत्पन्न होते, उपादान कारणरूपानेच राहत असतात आणि शेवटी उपादान कारणामध्येच लीन होतात.

जसे मातीचा घडा बनविण्यात माती उपादान कारण आहे, तसेच सृष्टीची रचना करण्यात भगवानच उपादान कारण आहेत. जसे मातीचा घडा मातीपासूनच उत्पन्न होतो, मातीरूपच राहतो आणि शेवटी घासला जाऊन फुटला तरी तो मातीच बनतो. जसे सोन्याचे सर्व प्रकारचे दागिने सोन्यापासूनच उत्पन्न होतात, सोनेरूपच राहतात आणि शेवटी सोनेच शिल्लक राहते. तसेच हा संसार भगवंतापासूनच उत्पन्न होतो, भगवंतातच राहतो आणि शेवटी भगवंतामध्येच लीन होतो. असे जाणणे हेच "ज्ञान" आहे. सर्व काही भगवत्स्वरूप आहे. भगवंताशिवाय दुसरे काहीच नाही असा अनुभव होणे "विज्ञान" आहे.

**कृत्स्नस्य जगतः**—या पदांत भगवंतांनी स्वतःला जड-चेतनात्मक संपूर्ण जगताला उत्पन्न करणारा आणि प्रलय करणारा म्हटले आहे. यापैकी जडा (अपरा प्रकृती) चा उत्पन्न करणारा आणि प्रलय करणारा म्हणणे तर योग्य आहे पण चेतना (परा-प्रकृती अर्थात् जीवात्मा) ची उत्पत्ती आणि विनाश कसा होईल ? कारण ते तर नित्य तत्त्व आहे—"**नित्यः सर्वगतः स्थाणुरचलोऽयं सनातनः**" (२ । २४). जे परिवर्तनशील आहे त्याला जगत् म्हणतात "**गच्छतीति जगत्**". परंतु येथे जगत् शब्द जड-चेतनात्मक संपूर्ण संसाराचा वाचक आहे. यापैकी जड अंश तर परिवर्तनशील आहे आणि चेतन अंश सदा-सर्वथैव परिवर्तनरहित तसेच निर्विकार आहे. ते निर्विकार तत्त्व जेव्हा जडाशी आपला संबंध मानून तादात्म्य करून घेते तेव्हा ते जडा (शरीर) च्या उत्पत्ति-विनाशाला आपला उत्पत्ति-विनाश मानते. म्हणून भगवंतांनी स्वतःला संपूर्ण जगत् अर्थात् अपरा आणि परा प्रकृतीचा प्रभव आणि प्रलय म्हटले आहे.

जर येथे "जगत्" शब्दाने केवळ नाशवान् परिवर्तनशील आणि विकारी संसारालाच घेतले गेले , चेतनाला घेतले नाही तर मोठी अडचण होईल. भगवंतांनी "**कृत्स्नस्य जगतः**" पदाने आपल्याला संपूर्ण जगताचे कारण दाखविले आहे† म्हणून संपूर्ण जगताच्या अंतर्गत स्थावर-जंगम, जड-चेतन सर्व घेतले जातील. जर केवळ जडालाच घेतले तर चेतन भाग सुटला जाईल ज्यामुळे "मी संपूर्ण जगताचे कारण आहे" हे म्हणता येणे शक्य नाही आणि पुढेही मोठी अडचण निर्माण होईल. कारण पुढे याच अध्यायाच्या तेराव्या श्लोकात भगवंतांनी म्हटले आहे की, तिन्ही गुणांनी मोहित जगत् मला जाणत नाही. तर येथे जाणणे अथवा न जाणणे चेतनाचेच होऊ शकते. जडाचे जाणणे अथवा न जाणणे होतच नाही. म्हणून "जगत्" शब्दाने केवळ जडालाच नव्हे, चेतनालाही घ्यावे लागेल.

त्याचप्रमाणे सोळाव्या अध्यायाच्या आठव्या श्लोकात-ही आसुरी संपत्ती असणाऱ्यांच्या मान्यतेनुसार "जगत्" शब्दाने जड आणि चेतन दोन्हींनाही घ्यावे लागेल. कारण आसुरी संपत्ती असणारी व्यक्ती संपूर्ण शरीरधारी जीवांना असत्य मानत असते केवळ जडाला नव्हे. म्हणून जर "जगत्" शब्दाने तेथे केवळ जड संसारच घेतला जाईल तर जगताला (जड संसाराला) असत्य, मिथ्या आणि अप्रतिष्ठित म्हणणारे अद्वैतसिद्धांतीसुद्धा आसुरी संपत्ती असणाऱ्यांत येतील, जे सर्वथा अनुचित आहे. तसेच आठव्या अध्यायाच्या सव्वीसाव्या श्लोकात आलेले "**शुक्लकृष्णे गती ह्येते जगतः**" पदांत "जगत्" शब्द केवल जडाचाच वाचक मानला जाईल तर जडाची शुक्ल आणि कृष्ण गतीचे काय तात्पर्य राहील? गती तर चेतनाचीच होत असते. जडाशी तादात्म्य केल्यामुळेच

* जीवाकडून केले गेलेले अनादी कालाचे कर्म जीवाचे प्रलयकालात लीन झाल्यावर जेव्हा परिपक्व होत असतात अर्थात् फल देण्यासाठी उन्मुख होतात तेव्हा त्यापासून (प्रलयाचा काळ समाप्त झाल्यावर सर्गाच्या आरंभी) भगवंताचा संकल्प होत असतो आणि त्याच संकल्पाने शरीरांची उत्पत्ती होत असते.

† अपरा-प्रकृती आणि भगवंतामध्ये तर कार्यकारणाचा संबंध आहे, कारण अपरा-प्रकृती भगवंताचे कार्य आहे. परंतु परा-प्रकृती आणि भगवंतात कार्य कारणाचा संबंध नसतो, कारण परा-प्रकृती (जीव) भगवंताचा अंश आहे कार्य नव्हे. म्हणून अंश-अंशीच्या दृष्टीनेच भगवान् जीवाचे कारण म्हटले गेले आहेत, कार्य-कारणाच्या दृष्टीने नव्हे.

चेतनाला ''जगत्'' नावाने म्हटले गेले आहे.

या सर्व गोष्टींवर विचार केल्याने हा निष्कर्ष निघतो की, जडाशी ऐक्य केल्याने जीव ''जगत्'' म्हटला जातो. परंतु जेव्हा हा जडाशी विमुख होऊन चिन्मय तत्त्वाशी आपले ऐक्य अनुभव करत असतो तेव्हा हा ''योगी'' म्हटला जातो ज्याचे वर्णन गीतेत अनेक ठिकाणी आलेले आहे.

**परिशिष्ट भाव**—जी स्वत:लाही जाणू शकत नाही आणि दुसऱ्यालाही जाणू शकत नाही, ती 'अपरा-प्रकृती' आहे. जी स्वत:लाही जाणू शकते आणि दुसऱ्यालाही जाणू शकते, ती 'परा-प्रकृती' आहे. या अपरा आणि परा—दोन्हींच्या मानलेल्या संयोगानेच संपूर्ण स्थावर-जंगम प्राणी उत्पन्न होतात. (१३।२६)

मूळ दोष एकच आहे, जो स्थानभेदाने अनेकरूपाने दिसतो. तो आहे—अपराशी संबंध. या एका दोषामुळेच संपूर्ण दोष उत्पन्न होतात. हा एक दोष निर्माण झाला तर संपूर्ण दोष निर्माण होतात आणि हा एक दोष नाहीसा झाला तर संपूर्ण दोष नाहीसे होतात. त्याचप्रमाणे मूळ गुणही एकच आहे, ज्यापासून संपूर्ण गुण प्रकट होतात. तो आहे—भगवंताशी संबंध.

अपराला मग नित्य माना अथवा अनित्य माना. परंतु तिच्याशी आपला संबंध अनित्य आहे—ही गोष्ट सर्वसम्मत आहे. हा संबंधच जन्म-मरणाचे कारण आहे—'**कारणं गुणसङ्गोऽस्य सदसद्योनिजन्मसु**'। (गीता १३।२१) हेच संसाराचे बीज आहे.

मी संपूर्ण जगताचा प्रभव आणि प्रलय आहे—याचे तात्पर्य हे आहे की, या स्थावर-जंगमरूप जगताला मीच उत्पन्न करणारा आहे, मीच उत्पन्न होणारा आहे, मीच नाश करणारा आहे आणि मीच नष्ट होणारा आहे. कारण माझ्याशिवाय संसाराचे दुसरे कोणतेच कारण आणि कार्य नाही (गीता ७।७) अर्थात् मीच त्याचा निमित्त आणि उपादान कारण आहे. म्हणून जगतरूपाने मीच आहे. नवव्या अध्यायाच्या एकोणीसाव्या श्लोकातही भगवंताने म्हटले आहे—'**अमृतं चैव मृत्युश्च सदसच्चाहमर्जुन**' अर्थात् अमृत आणि मृत्यू तसेच सत् आणि असत् दोन्हीही मीच आहे. श्रीमद्भागवतात भगवान् म्हणतात—

**आत्मैव तदिदं विश्वं सृज्यते सृजति प्रभुः।**
**त्रायते त्राति विश्वात्मा ह्रियते हरतीश्वरः॥** (११।२८।६)

'जी काही प्रत्यक्ष अथवा अप्रत्यक्ष वस्तू आहे ती सर्व शक्तिमान् परमात्माच आहे. जी काही सृष्टी प्रतीत होत आहे, तिचे निमित्तकारणही तेच आहेत आणि उपादानकारणही तेच आहेत अर्थात् तेज विश्व बनवितात आणि तेच विश्व बनतात. तेच रक्षक आहेत आणि तेच रक्षित आहेत. तेच सर्वात्मा भगवान् याचा संहार करतात आणि ज्याचा संहार होतो, तेही तेच आहेत.'

तैत्तिरीयोपनिषद्मध्ये आले आहे की, अन्नही मीच आहे आणि अन्न खाणाराही मीच आहे—'**अहमन्नमहमन्नमहमन्नम्। अहमन्नादोऽहमन्नादोऽहमन्नादः**'। (३।१०।६)

तात्पर्य हे झाले की, अपरा आणि परा प्रकृती तसेच त्यांच्या संयोगाने उत्पन्न होणारे संपूर्ण प्राणी—हे सर्वचे सर्व एक भगवान्च आहेत. कारणही भगवान् आहेत आणि कार्यही!

***संबंध**—पूर्व श्लोकात भगवंतांनी स्वत:ला परा आणि अपरा प्रकृतीरूपी संपूर्ण जगताचे मूळ कारण सांगितले. आता भगवंताशिवायही जगताचे आणखी कोणते दुसरे कारण असेल—याचा पुढील श्लोकात निषेध करतात.*

## मत्तः परतरं नान्यत्किञ्चिदस्ति धनञ्जय।
## मयि सर्वमिदं प्रोतं सूत्रे मणिगणा इव॥७॥

म्हणून—

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **धनञ्जय** | = हे धनंजय! | | (कारण आणि कार्य) | | असतात) |
| **मत्तः** | = माझ्या- | **न अस्ति** | = नाही | **इव** | = तसेच |
| **परतरम्** | = शिवाय (या जगताचा) | **मणिगणाः** | = (जसे सूताचे) मणी | **इदम्** | = हे |
| | | | | **सर्वम्** | = संपूर्ण जगत् |
| **अन्यत्** | = दुसरा कोणी | **सूत्रे** | = सूताच्या धाग्यात (ओवलेले | **मयि** | = माझ्यात (च) |
| **किञ्चित** | = किंचिन्मात्रही | | | **प्रोतम्** | = ओतप्रोत आहे. |

*व्याख्या*— **मत्तः परतरं नान्यत्किञ्चिदस्ति धनञ्जय**— हे अर्जुन! माझ्याशिवाय दुसरे कोणतेच कारण नाही, मीच सर्व संसाराचे महाकारण आहे. ज्याप्रमाणे वायू आकाशापासून उत्पन्न होतो, आकाशातच राहतो आणि आकाशातच लीन होतो अर्थात् आकाशाशिवाय वायूची कोणतीच वेगळी स्वतंत्र सत्ता नसते. त्याचप्रमाणे संसार भगवंतापासून उत्पन्न होतो, भगवंतामध्ये स्थित राहतो आणि भगवंतातच लीन होत असतो अर्थात् भगवंताशिवाय संसाराची कोणती वेगळी स्वतंत्र सत्ता नाही.

येथे ''**परतरम्**'' म्हणून सर्वांचे मूळ कारण दाखविले गेले आहे. मूळ कारणाच्या पुढे कोणते कारण नसते अर्थात् मूळ कारणाचा कोणी उत्पादक नसतो. भगवंतच सर्वांचे मूळ कारण आहेत. हा संसार अर्थात् देश, काल, वस्तू, व्यक्ती,घटना, परिस्थिती इत्यादी सर्व परिवर्तनशील आहेत. परंतु ज्याच्या अस्तित्वाने ह्या सर्वांचे अस्तित्व टिकून आहे अर्थात् ज्याच्या सत्तेने हे सर्व ''आहेत'' दिसत असतात, तो परमात्माच या सर्वांत परिपूर्ण आहे.

भगवंतांनी याच अध्यायाच्या दुसऱ्या श्लोकात म्हटले आहे की, मी विज्ञानासहित ज्ञान सांगेन, जे जाणल्यानंतर काहीही जाणणे शिल्लक राहणार नाही—''**यज्ज्ञात्वा नेह भूयोऽन्यज्ज्ञातव्यमवशिष्यते**'' आणि येथे म्हणतात की, माझ्याशिवाय दुसरे कोणते कारण नाही—''**मत्तः परतरं नान्यत्किञ्चिदस्ति**''. दोन्हीही ठिकाणी ''न अन्यत्'' म्हणण्याचे तात्पर्य जर माझ्याशिवाय दुसरे काहीच नाही तर मला जाणल्यानंतर जाणणे कसे शिल्लक राहील? म्हणून भगवंतांनी येथे ''**मयि सर्वमिदं प्रोतम्**'' आणि पुढे ''**वासुदेवः सर्वम्**'' (७।१९) तसेच ''**सदसच्चाहम्**'' (९।१९) म्हटले आहे.

जे कार्य होत असते ते कारणाशिवाय आपली कोणती स्वतंत्र सत्ता ठेवत नाही. वास्तविक कारणच कार्यरूपात दिसत असते. अशा प्रकारे जेव्हा कारणाचे ज्ञान होईल तेव्हा कार्य कारणात लीन होईल अर्थात् कार्याची वेगळी सत्ता प्रतीत होणार नाही आणि ''एका परमात्म्याशिवाय इतर कोणते कारण नाही'' असा अनुभव आपोआप होईल.

**मयि सर्वमिदं प्रोतं सूत्रे मणिगणा इव**—हा सारा संसार सुतामध्ये सुताच्याच मण्याप्रमाणे माझ्यात ओवला गेला आहे अर्थात् मीच सर्व संसारात व्यापून राहिलो आहे. ज्याप्रमाणे सुतापासून तयार केलेल्या मण्यात आणि सुतात सुताशिवाय दुसरे काहीच नसते, त्याप्रमाणेच संसारात माझ्याशिवाय इतर कोणते तत्त्व नाही. तात्पर्य, जसे सुतात सुताचे मणी ओवले तर दिसण्यात सुत आणि मणि वेगवेगळे दिसतात परंतु वास्तविक त्यांच्यात सुत एकच असते. त्याप्रमाणे संसारात जितके प्राणी आहेत ते सर्व नाव, रूप, आकृती इत्यादीने वेगवेगळे दिसतात, परंतु वास्तविक त्यात व्यापून असणारे चेतन तत्त्व एकच आहे. ते चेतन तत्त्व मीच आहे—''**क्षेत्रज्ञं चापि मां विद्धि सर्वक्षेत्रेषु भारत**'' (१३।२) अर्थात् मणिरूपी अपरा-प्रकृतीही माझे स्वरूप आहे आणि धागारूपी परा-प्रकृतीही मीच आहे. दोन्हीत मीच परिपूर्ण आहे, व्यापून आहे. साधक जेव्हा संसाराला संसार बुद्धीने पाहतो तेव्हा त्याला संसारात परिपूर्णरूपाने व्याप्त असलेले परमात्मा दिसत नाहीत. जेव्हा त्याला परमात्मतत्त्वाचा वास्तविक बोध होत असतो तेव्हा व्याप्य-व्यापक भाव नाहीसा होऊन एक परमात्मतत्त्वच दिसत असते. या तत्त्वाला दाखविण्यासाठी भगवंतांनी येथे कारणरूपाने आपल्या व्यापकतेचे वर्णन केले आहे.

**परिशिष्ट भाव**—जसे सुताचे मणी सुताच्या धाग्यात ओवलेले असतील तर त्यात सुताशिवाय दुसरे काही नाही, तसेच संसारात भगवंताशिवाय दुसरे काही नाही. तात्पर्य हे आहे की, मणिरूप अपरा-प्रकृती आणि धागारूप परा-प्रकृती—दोन्हीत भगवान्‌च परिपूर्ण आहेत. मणी बनण्यात अपरा-प्रकृतीची मुख्यता आहे आणि धागा बनण्यात परा-प्रकृतीची मुख्यता आहे. '**मणिगणाः**' पद बहुवचनात देण्याचे तात्पर्य हे आहे की, अपरा-प्रकृती स्थावर-जंगम, जलचर, थलचर, नभचर, चौदा भुवने, चौऱ्यांशी लक्ष योनी इत्यादी अनंतरूपात आणि अनंत समुदायात विभक्त आहे.

अपरा आणि पराचा भेद 'अपरा' प्रकृतीमुळेच आहे. कारण अपराला सत्ता आणि महत्ता देऊन तिच्याशी संबंध जोडल्यामुळेच जीव आहे. (गीता ७।५) म्हणून अपरा-प्रकृती जगतातही आहे आणि जीवातही! परंतु परमात्म्यात अपराही नाही आणि पराही नाही, जगतही नाही आणि जीवही नाही. तात्पर्य हे आहे की, वास्तविक धागाही नाही, मणीही नाहीत, तर एक सुतच कापूसच आहे. त्याचप्रमाणे अपराही नाही आणि पराही नाही तर एक परमात्माच आहेत. याच विषयाचे वर्णन भगवंताने पुढे बाराव्या श्लोकापर्यंत केले आहे. या श्लोकात आलेल्या '**मत्तः**' पदापासून आरंभ करून बाराव्या श्लोकाच्या '**मत्त एव**' पदापर्यंत भगवंताने हीच गोष्ट सांगितली आहे की, माझ्याशिवाय काहीही नाही. येथे '**मत्तः**' पद समग्रपरमात्म्याचे वाचक आहे, जो परा आणि अपरा दोन्ही प्रकृतींचा मालक आहे.

कारणच कार्यात परिणत होत असते. जसे रुईच धागा बनते, बीजच वृक्ष बनतो. म्हणून सर्वांचे परम कारण

भगवान् असल्यामुळे सर्वरूपात भगवान्‌च आहेत—'**वासुदेवः सर्वम्।**' म्हणून भगवंताशिवाय दुसऱ्याची सत्ता पाहणे चूक आहे.

'**मत्तः परतरं नान्यत्किञ्चिदस्ति**'—जो दोन्हीत श्रेष्ठ असतो त्याला 'परतर' म्हणतात. भगवान् अद्वितीय आहेत. त्यांच्याशिवाय दुसरी कोणती वस्तू ('पर') नाहीच, मग ते 'परतर' कसे होऊ शकतात? त्यांना 'परतर' शब्द लागूच पडत नाही. येथे भगवंताना अद्वितीय दाखविण्यासाठीच 'परतर' शब्द आला आहे. तात्पर्य हे आहे की, भगवंताहून दुसरे-ही काही नाही आणि श्रेष्ठही काही नाही. उपनिषदात आले आहे—**पुरुषान्न परं किञ्चित्सा काष्ठा सा परा गतिः॥** (कठ० १। ३। ११)

'पुरुषाहून पर काहीही नाही. तीच सर्वांची परमसीमा आणि तीच परमगती आहे.'

अर्जुनानेही म्हटले आहे—

**न त्वत्समोऽस्त्यभ्यधिकः कुतोऽन्यो लोकत्रयेऽप्यप्रतिम प्रभाव।** (गीता ११। ४३)

*संबंध—जे काही कार्य दिसत असते, त्याच्या मूळात परमात्माच आहेत. हे ज्ञान करविण्यासाठी आता भगवान् आठव्यापासून बाराव्या श्लोकापर्यंतचे प्रकरण आरंभ करीत आहेत.*

## रसोऽहमप्सु कौन्तेय प्रभास्मि शशिसूर्ययोः।
## प्रणवः सर्ववेदेषु शब्दः खे पौरुषं नृषु॥८॥

**कौन्तेय** = हे कुन्तीनन्दन!
**अप्सु** = जलात
**रसः** = रस
**अहम्** = मी आहे,
**शशिसूर्ययोः** = चंद्रमा आणि सूर्यात
**प्रभा** = प्रभा (प्रकाश)
**अस्मि** = मी आहे,
**सर्ववेदेषु** = संपूर्ण वेदांमध्ये
**प्रणवः** = प्रणव (ओंकार)
**खे** = आकाशात
**शब्दः** = शब्द (आणि)
**नृषु** = मनुष्यांमध्ये
**पौरुषम्** = पुरुषार्थ (मी आहे).

***व्याख्या***— [जसे सामान्य दृष्टीने लोकांनी रुपये-पैशानांच सर्वश्रेष्ठ मानले आहे म्हणून रुपये मिळविणे आणि त्यांचा संग्रह करणेसंबंधी लोभी माणसाची स्वाभाविक रुची होत असते. तसेच पाहणे, ऐकणे, मानणे आणि समजणे यामध्ये जे काही जगत् येते त्याचे कारण भगवान् आहेत (७।६). भगवंताशिवाय त्याची स्वतंत्र सत्ता नाहीच, असे मानल्याने भगवंताविषयी स्वाभाविक रुची उत्पन्न होत असते. मग स्वाभाविकच त्याचे भजन होत असते. हीच गोष्ट दहाव्या अध्यायाच्या आठव्या श्लोकात म्हटली आहे की, "मी संपूर्ण संसाराचे कारण आहे, माझ्यापासूनच संसाराची उत्पत्ती होते" असे समजून बुद्धिमान् माणसे माझे भजन करत असतात. तसेच अठराव्या अध्यायात सेहेचाळीसाव्या श्लोकात म्हटले आहे की, "ज्या परमात्म्यापासून संपूर्ण जगताची प्रवृत्ती होत असते आणि ज्याने सर्व संसार व्यापलेला आहे त्या परमात्म्याचे आपल्या कर्माद्वारा पूजन करून मनुष्य सिद्धीला प्राप्त करून घेतो" याच सिद्धांताला दाखविण्यासाठी हे प्रकरण आले आहे]

**रसोऽहमप्सु कौन्तेय**—हे कुन्तीनंदन! जलात मी "रस" आहे. जल रस-तन्मात्रेपासून* उत्पन्न होत असते. रस-तन्मात्रेत राहते आणि रस-तन्मात्रेमध्येच लीन होते. जलातून "रस" काढून टाकला तर जलतत्त्व काहीही राहणार नाही. म्हणून रसच जलरूपाने आहे. तो रस मी आहे.

**प्रभास्मि शशिसूर्ययोः**—चंद्र आणि सूर्यात प्रकाश करण्याची जी एक विलक्षण शक्ती "प्रभा" आहे† ते माझे

* पृथ्वी, आप, तेज, वायू आणि आकाश या स्थूल पंचमहाभूतांच्या कारणांची नावे क्रमाने गंध, रस, रूप, स्पर्श आणि शब्द आहेत. जे पंचतन्मात्रा म्हणविली जातात. पंचतन्मात्रा इंद्रिय आणि अंतः करणाचे विषय नाहीत तर शास्त्रात ऐकून मानल्या जातात. पंचमहाभूतांच्या कार्याचे नावही गंध, रस, रूप, स्पर्श आणि शब्द आहे जे इंद्रिय आणि अंतःकरणाचे विषय आहेत.

† रूप-तन्मात्रेत दोन शक्ती असतात एक "प्रकाशिका" अर्थात् प्रकाश करणारी आणि एक "दाहिका" अर्थात् जाळणारी. प्रकाशिका शक्तीला "प्रभा" म्हणतात आणि दाहिका शक्तीला "तेज" म्हणतात. "प्रकाशिका शक्ति" दाहिका शक्तिविनाही राहू शकते (जसे मणी, चंद्र इत्यादीत) परंतु "दाहिका-शक्ती" प्रकाशिका शक्तीविना राहू शकत नाही. येथे "प्रभास्मि शशिसूर्ययोः" पदांत चंद्रमा आणि सूर्याची "प्रकाशिका शक्ती" च्या प्रधानतेला

स्वरूप आहे. प्रभा रूप-तन्मात्रेपासून उत्पन्न होत असते, रूप तन्मात्रेत राहते आणि शेवटी रूप-तन्मात्रेतच लीन होते. जर चंद्र आणि सूर्यामधून प्रभा काढून टाकली तर चंद्रमा आणि सूर्य निस्तत्त्व होऊन जातील. तात्पर्य केवळ प्रभाच चंद्र आणि सूर्यरूपाने प्रगट होत असते. भगवान् म्हणतात की, ती प्रभा मीच आहे.

**प्रणवः सर्ववेदेषु**—संपूर्ण वेदांत प्रणव (ओंकार) माझे स्वरूप आहे. कारण सर्वात प्रथम प्रणव प्रकट झाला. प्रणवापासून त्रिपदा गायत्री आणि त्रिपदा गायत्री- पासून वेदत्रयी प्रगट झाली. म्हणून वेदात सार ''प्रणव'' च राहिले. जर वेदामधून प्रणव काढून टाकला तर वेद वेदरूपाने राहणार नाहीत. प्रणवच वेद आणि गायत्रीरूपाने प्रगट होत आहे—तो प्रणव मीच आहे.

**शब्दः खे**—सर्व ठिकाणी ही जी पोकळी दिसते हे आकाश आहे. आकाश शब्द-तन्मात्रेपासून उत्पन्न होते, शब्द तन्मात्रेतच राहते आणि शेवटी शब्द-तन्मात्रेमध्येच लीन होते. म्हणून शब्द-तन्मात्राच आकाशरूपाने प्रगट होत आहे. शब्द-तन्मात्रेशिवाय आकाश काहीही नाही. तो शब्द मीच आहे.

**पौरुषं नृषु**—मनुष्यात सार वस्तू जो पुरुषार्थ आहे, ते माझे स्वरूप आहे. वास्तविक नित्यप्राप्त परमात्मतत्त्वाचा अनुभव करणे हाच मनुष्याचा खरा पुरुषार्थ आहे. परंतु मनुष्यांनी अप्राप्ताला प्राप्त करण्यातच आपला पुरुषार्थ मानून घेतला आहे. जसे निर्धन मनुष्य धनाच्या प्राप्तीला पुरुषार्थ मानतो, अशिक्षित मनुष्य लिहिणे-वाचणे शिकण्यामध्ये आपला पुरुषार्थ मानतो, सामान्य मनुष्य आपल्या नावाच्या प्रसिद्धीला पुरुषार्थ मानतो इत्यादी. निष्कर्ष हा निघाला की, जे आता नाही त्याच्या प्राप्तीतच मनुष्य आपला पुरुषार्थ मानतो. परंतु हे पुरुषार्थ वास्तविक पुरुषार्थ नव्हेत. कारण जे पूर्वी नव्हते, प्राप्तीच्या वेळीही ज्यांचा निरंतर संबंध-विच्छेद होत आहे, शेवटी जे ''नाही''त जमा होतील, अशा पदार्थांना प्राप्त करणे पुरुषार्थ नव्हे. परमात्मा पूर्वीही विद्यमान होते, आत्ताही विद्यमान आहेत आणि पुढेही सदा विद्यमान राहतील, कारण त्यांचा कधीही अभाव होत नाही म्हणून परमात्म्याला उत्साहपूर्वक प्राप्त करण्याचा जो प्रयत्न आहे तोच वास्तविक पुरुषार्थ आहे. त्याची प्राप्ती करून घेण्यातच मनुष्याची मनुष्यता आहे. त्याविना मनुष्य काहीही नव्हे अर्थात् निरर्थक आहे.

**परिशिष्ट भाव**—सहाव्या-सातव्या श्लोकात भगवंताने स्वतःला संपूर्ण जगताचे कारण सांगितले. म्हणून आता भगवान् आठव्या श्लोकापासून बाराव्या श्लोकापर्यंत 'कारण'-रूपाने आपल्या विभूतींचे वर्णन करतात. जरी कारणापेक्षा कार्यात विशेष गुण असतात, परंतु स्वतंत्र सत्ता कारणाचीच असते अर्थात् कारणाविना कार्याची स्वतंत्र सत्ता नसते. जसे मृत्तिका कारण आहे आणि घट कार्य आहे. घटात पाणि भरले जाऊ शकते. ही विशेषता मृत्तिकेत नाही. परंतु मृत्तिकाविना घटाची स्वतंत्र सत्ता नाही. तात्पर्य हे आहे की, कारणच कार्यरूपात परिणत होते. घटाच्या रचनेत कर्ता, कारण आणि कार्य—तिन्ही एक नसतात अर्थात् कारण (मृत्तिका) आणि कार्य (घट) यांची तर एक सत्ता असते. मात्र कर्त्याची (कुंभाराची) वेगळी (स्वतंत्र) सत्ता असते. परंतु सृष्टीच्या रचनेत कर्ता, कारण आणि कार्य—तिन्ही एक भगवान्च असतात. म्हणून रसही भगवान् आहेत जलही भगवान् आहेत, प्रभाही भगवान् आहेत आणि चंद्र-सूर्य हेही भगवान् आहेत. ओंकारही भगवान् आहेत आणि वेदही भगवान् आहेत. शब्दही भगवान् आहेत आणि आकाशही भगवान् आहेत. पुरुषार्थही भगवान् आहेत आणि मनुष्यही भगवान् आहेत.

[मृत्तिका तर घटाच्या रूपात परिणत होते. परंतु परमात्मा संसाराच्या रूपात परिणत होत नाहीत. कारण परिणत होणारी वस्तू विकारी असते, परंतु परमात्मा निर्विकार आहेत. म्हणून जसे अंधारात दोरी सापाच्या रूपाने दिसते किंवा सापच वाटोळ्या रूपात दिसतो, तसेच परमात्मा संसाररूपात दिसतात. तात्पर्य हे आहे की, परमात्म्यात कार्य-कारणाचा भेद नाही. कारण त्यांच्याशिवाय दुसरी कोणती वस्तू नाहीच. कार्य-कारणाचा भेद माणसांच्या दृष्टीतच आहे. म्हणून माणसांना समजाविण्यासाठी दुसऱ्या वस्तूची काही-ना-काही सत्ता मानूनच परमात्म्याचे वर्णन, विवेचन, विचार, चिंतन, प्रश्नोत्तर इत्यादी केले जाते—'**नोद्यं वा परिहारो वा क्रियतां द्वैतभाषया**'।]

## पुण्यो गन्धः पृथिव्यां च तेजश्चास्मि विभावसौ।
## जीवनं सर्वभूतेषु तपश्चास्मि तपस्विषु॥ ९॥

---

अनुसरून ''प्रभा'' शब्दाचा प्रयोग झाला आहे आणि पुढे याच अध्यायाच्या नवव्या श्लोकात ''तेजश्चास्मि विभावसौ'' पदांत अग्नीच्या ''दाहिका शक्ती''च्या प्रधानतेला अनुसरून ''तेज'' शब्दाचा प्रयोग झाला आहे.

सूर्य आणि अग्नीत प्रकाशिका आणि दाहिका दोन्ही शक्ती आहेत. चंद्रात प्रकाशिका शक्ती तर आहे पण त्यात दाहिका शक्ती तिरस्कृत होऊन ''सौम्य शक्ती'' प्रगट झाली आहे, जी शीतलता देणारी असते.

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **पृथिव्याम्** | = पृथ्वीत | **तेजः** | = तेज | **जीवनम्** | = जीवनीशक्ती |
| **पुण्यः** | = पवित्र | **अस्मि** | = मी आहे | **च** | = आणि |
| **गन्धः** | = गन्ध | **च** | = तसेच | **तपस्विषु** | = तपस्व्यांमध्ये |
| **च** | = आणि | **सर्वभूतेषु** | = संपूर्ण प्राण्यात | **तपः** | = तपश्चर्या |
| **विभावसौ** | = अग्नीत | | | **अस्मि** | = मी आहे. |

*व्याख्या*— **पुण्यो गन्धः पृथिव्याम्**—पृथ्वी गंध-तन्मात्रेपासून उत्पन्न होते गंध-तन्मात्रारूपाने राहत असते आणि गंध-तन्मात्रेमध्येच लीन होते. तात्पर्य गंधाविना पृथ्वी काहीही नाही. भगवान् म्हणतात पृथ्वीत तो पवित्र गंध मी आहे.

येथे गंधाबरोबर ''**पुण्यः**'' विशेषण देण्याचे तात्पर्य सर्व गंध पृथ्वीत राहतात. त्यात पुण्य अर्थात् पवित्र गंध तर पृथ्वीत स्वाभाविक राहतो. परंतु दुर्गंध एखाद्या विकृतीपासून प्रगट होत असतो.

**तेजश्चास्मि विभावसौ**—तेज रूप-तन्मात्रेपासून प्रगट होते, त्यातच राहते आणि शेवटी त्यातच लीन होते. अग्नीत तेजच तत्त्व आहे. तेजाविना अग्नि निस्तत्त्व आहे, काही नाही. ते तेज मीच आहे.

**जीवनं सर्वभूतेषु**—संपूर्ण प्राण्यात एक प्राणशक्ती असते त्यामुळे सर्व जिवंत राहतात. त्या प्राणशक्तीमुळेच ते प्राणी म्हणविले जातात. प्राणशक्तीविना त्यांच्यात प्राणीपणा काही नाही. प्राणशक्तीमुळेच गाढ निद्रेत झोपलेला मनुष्यसुद्धा प्रेतापेक्षा विलक्षण दिसत असतो. ती प्राणशक्ती मीच आहे.

**तपश्चास्मि तपस्विषु**—द्वन्द्वसहिष्णुतेला तप म्हणतात. परंतु वास्तविक परमात्मतत्त्वाच्या प्राप्तीसाठी कितीही कष्ट झाले तरी त्यात निर्विकार राहणेच खरे तप आहे. हेच तपस्व्यामध्ये तप असते. यामुळेच ते तपस्वी म्हणविले जातात आणि याच तपाला भगवान् आपले स्वरूप म्हणतात. जर तपस्विलोकातले तप काढून टाकले तर ते तपस्वी राहणार नाहीत.

**परिशिष्ट भाव**—सृष्टीच्या रचनेत भगवान्च कर्ता आहेत, भगवानच कारण आहेत आणि भगवान्च कार्य आहेत. म्हणून गन्ध आणि पृथ्वी, तेज आणि अग्नी, जीवनी शक्ती आणि प्राणी, तपश्चर्या आणि तपस्वी—हे सर्वचे सर्व (कारण आणि कार्य) एक भगवान्च आहेत. कारण परा आणि अपरा—दोन्हीही भगवंताच्या शक्ती असल्यामुळे भगवंताशी अभिन्न आहेत. म्हणून परा-अपरा यांच्या संयोगाने उत्पन्न होणारी संपूर्ण सृष्टी भगवत्स्वरूपच आहे.

'**पुण्यो गन्धः**'—गन्ध-तन्मात्रा कारण आहे आणि पृथ्वी त्याचे कार्य आहे. गन्धाला पवित्र म्हणण्याचे तात्पर्य हे आहे की, कारण (तन्मात्रा) सदा पवित्रच असते. अपवित्रता कार्यात विकृती झाल्यामुळेच येते. म्हणून जसे गन्ध-तन्मात्रा पवित्र आहे, तसेच शब्द, स्पर्श, रूप आणि रस-तन्मात्रा सुद्धा पवित्र समजल्या पाहिजेत.

## बीजं मां सर्वभूतानां विद्धि पार्थ सनातनम्।
## बुद्धिर्बुद्धिमतामस्मि तेजस्तेजस्विनामहम्॥ १०॥

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **पार्थ** | = हे पृथानंदन! | **माम्** | = मला | **तेजस्विनाम्** | = तेजस्वियांमध्ये |
| **सर्वभूतानाम्** | = संपूर्ण प्राण्यांचे | **विद्धि** | = जाण. | **तेजः** | = तेज |
| **सनातनम्** | = अनादी | **बुद्धिमताम्** | = बुद्धिमानात | **अहम्** | = मी |
| **बीजम्** | = बीज | **बुद्धिः** | = बुद्धी (आणि) | **अस्मि** | = आहे. |

*व्याख्या*— **बीजं मां सर्वभूतानां विद्धि* पार्थ सनातनम्**—हे पार्थ! संपूर्ण प्राण्यांचे सनातन बीज (अविनाशी बीज) मी आहे. अर्थात् सर्वांचे कारण मीच आहे. संपूर्ण प्राणी बीजरूपी माझ्यापासून उत्पन्न होतात, माझ्यातच राहतात आणि शेवटी माझ्यातच लीन होतात. माझ्याविना प्राण्यांची स्वतंत्र सत्ता नाही.

जितकी काही बीजे असतात, ती वृक्षापासून उत्पन्न होतात आणि वृक्ष उत्पन्न करून नष्ट होतात. परंतु या ठिकाणी ज्या बीजाचे वर्णन आहे ते बीज ''सनातन'' आहे अर्थात् आदि-अंतरहित आहे (अनादी तसेच अनंत आहे). यालाच नवव्या अध्यायाच्या अठराव्या श्लोकात ''अव्यय बीज '' म्हटले गेले आहे. हे चेतन तत्त्व अव्यय अर्थात् अविनाशी आहे. हे स्वतः

* याच अध्यायाच्या सहाव्या श्लोकात भगवंतांनी ''उपधारय'' म्हटले आणि येथे ''विद्धि'' म्हणतात. याचे तात्पर्य हे आहे की, मात्र संसारात साररूपाने मीच आहे—ही गोष्ट समजून घे आणि समजून धारण कर. समजून धारण केल्याने वास्तविक प्रेम जागृत होत असते.

विकाररहित असतानाही संपूर्ण जगताचे उत्पादक, आश्रय आणि प्रकाशक आहे. तसेच जगताचे कारण आहे.

गीतेत ''बीज'' शब्द कोठे भगवान् आणि कोठे जीवात्मा—दोघांसाठी आला आहे. याठिकाणी जो ''बीज'' शब्द आला आहे तो भगवंताचा वाचक आहे, कारण येथे कारणरूपाने विभूतींचे वर्णन आहे. दहाव्या अध्यायाच्या एकोणचाळीसाव्या श्लोकात विभूतिरूपाने आलेला ''बीज'' शब्दही भगवंताचाच वाचक आहे. कारण तेथे त्यांना संपूर्ण प्राण्यांचे कारण म्हटले गेले आहे. नवव्या अध्यायाच्या अठराव्या श्लोकात ''बीज'' शब्द भगवंतासाठी आला आहे. कारण त्याच अध्यायाच्या एकोणीसाव्या श्लोकात ''**सदसच्चाहमर्जुन**'' पदांत म्हटले गेले आहे की, कार्य आणि कारण सर्व मीच आहे. सर्व काही भगवान्‌च असल्याने ''बीज'' शब्द भगवंताचा वाचक आहे. चौदाव्या अध्यायाच्या चौथ्या श्लोकात ''**अहं बीजप्रदः पिता**'' ''मी बीज प्रदान करणारा पिता आहे''—असे वर्णन आल्यामुळे तेथे ''बीज'' शब्द जीवात्म्याचा वाचक आहे. जेव्हा जीवात्मा जडाशी आपला संबंध मानतो, तेव्हा ''बीज'' शब्द जीवात्म्याचा वाचक होतो, नाही तर हा भगवंताचे स्वरूपच आहे.

**बुद्धिर्बुद्धिमतामस्मि**—बुद्धिमंतात बुद्धी मी आहे. बुद्धीमुळेच ते बुद्धिमान् म्हणविले जातात. जर त्यांचे ठिकाणी बुद्धी नसती तर त्यांना बुद्धिमान् संज्ञा राहणारच नाही.

**तेजस्तेजस्विनामहम्**—तेजस्वी लोकातील तेज मी आहे. हे तेज दैवी संपत्तीचा एक गुण आहे. तत्त्वज्ञ जीवन्मुक्त महापुरुषांत एक विशेष तेज-शक्ती राहत असते ज्याच्या प्रभावाने दुर्गुण-दुराचारी मनुष्यही सद्‌गुण सदाचारी बनतात. हे तेज भगवंताचे स्वरूप आहे.

## विशेष गोष्ट

भगवंतच सर्व संसाराचे कारण आहेत. संसार असतानाही ते सर्वात परिपूर्ण आहेत आणि सर्व संसार समाप्त झाला तरी ते राहत असतात. यावरुन सिद्ध झाले की, सर्व काही भगवंतच आहेत. यासाठी उपनिषदात, सोने, माती आणि लोखंडाचा दृष्टांत दिला गेला आहे की, जसे सोन्यापासून बनलेले सर्व दागिने सोनेच आहे, मातीपासून बनविलेली सर्व भांडी मातीच आहे आणि लोखंडापासून बनविलेली शस्त्रास्त्रे लोखंडच आहे. तसेच भगवंतापासून उत्पन्न झालेला सर्व संसार भगवंतच आहे. परंतु गीतेत भगवंतांनी बीजाचा दृष्टांत दिला आहे की, संपूर्ण संसाराचे बीज मी आहे. बीज वृक्षापासून उत्पन्न होत असते आणि वृक्षाला उत्पन्न करून स्वतः नष्ट होत असते अर्थात् बीजापासून अंकुर उत्पन्न होतो. अंकुरापासून वृक्ष होत असतो आणि बीज स्वतः नष्ट होऊन जाते. भगवंतांनी आपल्याला संपूर्ण संसाराचे बीज म्हणविले असूनही ही एक विलक्षण गोष्ट सांगितली आहे की, मी अनादी बीज आहे. उत्पन्न झालेले बीज नव्हे—''**बीजं मां सर्वभूतानां विद्धि पार्थ सनातनम्**'' (७।१०) आणि मी अविनाशी बीज आहे—''**बीजमव्ययम्**'' (९।१८). अविनाशी बीज म्हणण्याचे कारण हे आहे की, संसार माझ्यापासून उत्पन्न होतो, परंतु मी समाप्त होत नाही. जसाच्या तसाच राहतो.

सोने, माती, आणि लोखंडाच्या दृष्टांतात दागिन्यात सोने दिसते, भांड्यात माती दिसते आणि शस्त्रास्त्रात लोखंड दिसते. परंतु संसारात परमात्मा दिसत नाहीत, जर बीजाचा दृष्टांत घेतला तर वृक्षात बीज दिसत नाही. जेव्हा वृक्षाला बीज येते, तेव्हा पत्ता लागतो की, या वृक्षाचे असे बीज आहे ज्यापासून हा वृक्ष उत्पन्न झाला आहे. संपूर्ण वृक्ष बीजापासूनच निघतो आणि बीजातच समाप्त होतो. वृक्षाचा आरंभ बीजापासून होतो आणि अंतही बीजातच होतो. अर्थात् तो वृक्ष मग शंभर वर्ष का राहीना परंतु त्याची अंतिम परिणिती बीजातच होईल. बीजाशिवाय दुसरे काय होणार? त्याचप्रमाणे भगवंत संसाराचे बीज आहेत अर्थात् भगवंतापासूनच संसार उत्पन्न होतो आणि भगवंतातच लीन होतो. शेवटी एक भगवंतच बाकी राहतात ''**शिष्यते शेष संज्ञः**'' (श्रीमद्भा० १०।३।२५)

वृक्ष दिसत असतानाही ''हे बीजच आहे'' असे जे जाणतात ते वृक्षाला योग्य प्रकारे जाणतात आणि जे बीजाकडे न पाहता केवळ वृक्षाला पाहतात ते वृक्षाच्या तत्त्वाला जाणत नाहीत. भगवंत येथे ''**बीजं मां सर्वभूतानाम्**'' म्हणून सर्वांना हे ज्ञान करवितात की, तुम्हाला जितका हा संसार दिसत आहे, याच्या पूर्वी मीच होतो, मी एकच प्रजारूपाने पुष्कळ रूपात प्रगट झालो आहे ''**बहु स्यां प्रजायेय**'' (छान्दोग्य० ६।२।३) आणि यांच्या समाप्तीनंतर मीच राहतो. तात्पर्य पूर्वी मीच होतो आणि पुढेही मीच राहतो तर मध्यातही मीच आहे.

विचार करणाऱ्यासच हा संसार पंचभूतात्मक दिसतो, नाही तर हा पंचभूतात्मकही दिसत नाही. जसे कोणी एखादा म्हणेल की, ही आपली सर्वची सर्व शरीरे पार्थिव (पृथ्वीपासून उत्पन्न होणारी) आहेत, म्हणून यात मातीची प्रधानता आहे तेव्हा दुसरा म्हणेल की, ही माती कशी काय? मातीने तर हात धुतले जातात. माती तर रेती असते. म्हणून हे शरीर माती नव्हे. अशा रीतीने शरीर

माती असूनही त्याला माती दिसत नाही. परंतु हा संसार जितका दिसतो याला जाळून राख केली तर ती शेवटी एक मातीच होऊन जाते.

विचार करा की, या शरीराच्या मूळात काय आहे ? माता-पित्यात जो रज-वीर्याचा अंश असतो, ज्यापासून हे शरीर तयार होते, तो अंश अन्नापासून उत्पन्न होतो. अन्न मातीपासून उत्पन्न होते. म्हणून ही शरीरे मातीपासूनच उत्पन्न होतात आणि शेवटी मातीतच लीन होतात. शेवटी शरीराच्या तीन गती होतात. मग त्याला जमीनीत गाडून टाका, त्याला जाळून टाका अथवा तसेच पशू-पक्ष्यांना खाऊ द्या. तिन्हीही उपायांनी ते शेवटी मातीच होत असते. अशा प्रकारे पूर्वी आणि शेवटी माती असल्याने मध्यातही शरीर अथवा संसार मातीच आहे. परंतु मध्यात हे शरीर अथवा संसार पाहण्यात माती दिसत नाही. विचार केला तरच माती दिसते, डोळ्यानी नव्हे. त्याचप्रमाणे हा संसार विचार केल्याने परमात्मस्वरूप दिसतो. विचार केला तर, जेव्हा भगवंतांनी ह्या संसाराची रचना केली तेव्हा कोठून काही सामान मागविले नाही ज्या सामानापासून संसार बनविला गेला आणि बनविणाराही दुसरा कोणी नाही. भगवान स्वतः च संसाराला उत्पन्न करणारे आहेत आणि स्वतः-च संसार झाले आहेत. शरीराची रचना करून आपणच त्यात प्रविष्ट झाले आहेत—**''तत्सृष्ट्वा तदेवानुप्राविशत्''** (तैत्तिरीयोपनिषद २।६). या शरीरात जीवरूपानेसुद्धा तेच परमात्मा आहेत. म्हणून हा संसारही परमात्म्याचे स्वरूपच आहे.

**परिशिष्ट भाव**—स्वतःला संपूर्ण प्राण्यांचे बीज सांगण्याचे तात्पर्य हे आहे की, सर्व प्राण्यांच्या रूपात मीच आहे. सृष्टी अनंत आहे. अनंत ब्रह्मांडांत अनंत जीव आहेत. परंतु त्या अनंत जीवांचे बीज (परमात्मा) एकच आहे. अनंत सृष्टी उत्पन्न होऊनही त्या बीजात कोणता फरक पडत नाही. कारण ते अव्यय आहे—**'बीजमव्ययम्'**। (गीता ९।१८) त्या एकाच बीजापासून अनेक प्रकारची सृष्टी उत्पन्न होते. (१०।३९) बीजाला कितीही सूक्ष्म दृष्टीने पहा, त्यात फळ-पुष्प-पाने इत्यादी दिसणार नाहीत. कारण ते त्या बीजात कारणरूपाने विद्यमान आहेत. त्या बीजापासून उत्पन्न होणाऱ्या वृक्षाची दोन पाने सुद्धा अगदी सारखी नसतात. ही अनेकताही त्या बीजातच राहते.

सृष्टीच्या एका-एका वस्तूत अनेक भेद आहेत. विभिन्न देशात मानवांच्या अनेक जाती आहेत. त्यातही इतका भेद आहे की, दोन माणसांच्या अंगठ्याच्या रेखाही परस्पर मिळत नाहीत. गाय, म्हैस, मेंढी, शेळी, घोडा, ऊंट, कुत्रा इत्यादींच्या अनेक जाती आहेत आणि त्यांच्या एकाएका जातीतही अनेक भेद आहेत. वृक्षातही एका एका वृक्षाच्या अनेक जाती असतात. एका एका विद्येत पाहिले तर त्यात इतके भेद आहेत की, त्यांचा अंत लागत नाही. मूळ रंग तीन आहेत. परंतु त्यांच्या मिश्रणाने अनेक रंग बनतात. त्यातही एकाएका रंगाचे इतके भेद आहेत की, दोन व्यक्तींनाही एक रंग समानरूपाने दिसत नाही. अशाप्रकारे सृष्टीत एकासारख्या दिसणाऱ्या दोन वस्तूही वास्तविक सारख्या नसतात. इतकी अनेकता असूनही सृष्टीचे बीज एकच आहे तात्पर्य हे आहे की, एकच भगवान् अनेक रूपात प्रकट होतात आणि अनेक रूपात प्रकट असूनही एकच राहतात.*

भगवान् देश, काल इत्यादी सर्वच दृष्टींनी अनंत आहेत. भगवंताने निर्माण केलेल्या सृष्टीचाही जर अंत लागत नाही तर मग भगवंताचा अंत कसा लागू शकतो? आजपर्यंत भगवंताच्या विषयात जे काही चिंतन केले गेले आहे, जे काही सांगितले गेले आहे, जे काही लिहिले गेले आहे, जे काही मान्य केले गेले आहे, ते सर्वचे सर्व मिळवूनही अधूरे आहे. एवढेच नव्हे, भगवान् सुद्धा आपल्या विषयात पूर्ण कथन करू शकत नाहीत, जर करतील तर ते अनंत कसे राहतील?

**बलं बलवतां चाहं कामरागविवर्जितम्।**
**धर्माविरुद्धो भूतेषु कामोऽस्मि भरतर्षभ॥ ११ ॥**

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **भरतर्षभ** | = हे भरतवंशियात श्रेष्ठ अर्जुन! | **बलम्** | = बल | **धर्माविरुद्धः** | = धर्माशी अविरुद्ध (धर्मयुक्त) |
| | | **अहम्** | = मी आहे | | |
| **बलवताम्** | = बलवानात | **च** | = आणि | **कामः** | = काम |
| **कामराग विवर्जितम्** | = काम आणि आसक्तिरहित | **भूतेषु** | = प्राण्यात | **अस्मि** | = मी आहे. |

* प्राण्यात अनेकता असूनही त्यांच्यात परस्पर प्रेमाची एकता असायला पाहिजे. जसे काटा पायात मोडतो, परंतु अश्रू नेत्रात येतात. तसाच भाव संपूर्ण प्राण्यात असायला पाहिजे—'सर्वभूतहिते रताः' (गीता ५।२५, १२।४) एकमात्र प्रेम हीच अशी गोष्ट आहे ज्यात कोणता भेद राहत नाही. प्रेमात भेद करू शकत नाही. प्रेमात सर्व एक होतात. ज्ञानात तत्त्वभेद तर राहत नाही परंतु मतभेद राहतो. प्रेमात मतभेदही राहत नाही. म्हणून प्रेमाच्या पुढे (श्रेष्ठ) काहीही नाही. प्रेमाने त्रिलोकीनाथ भगवान सुद्धा वश होतात.

*व्याख्या*—**बलं बलवतां चाहं कामरागविवर्जितम्**—कठीणाती कठीण काम करत असतानाही आपल्या अंतः-करणात एक कामना-आसक्तिरहित शुद्ध, निर्मळ, उत्साह राहत असतो. काम पूर्ण झाल्यावरही "माझे कार्य शास्त्र आणि धर्माला अनुकूल आहे तसेच लोक मर्यादेनुसार संत जनानुमोदित आहे" अशा विचाराने मनात एक प्रकारचा उत्साह राहत असतो. याचे नाव "बल" आहे. हे बल भगवंताचेच स्वरूप आहे. म्हणून हे बल ग्राह्य आहे.

गीतेत भगवंतांनी स्वतःच बलाची व्याख्या केली आहे. सतराव्या अध्यायाच्या पाचव्या श्लोकात "**कामराग-बलान्विताः**" पदांत आलेले बल कामना आणि आसक्तीने युक्त असल्याने दुराग्रह आणि हट्टाचे वाचक आहे. म्हणून हे बल भगवंताचे स्वरूप नव्हे तर आसुरी संपत्ती असल्याने त्याज्य आहे. तसेच "**सिद्धोऽहं बलवान्सुखी**" (१६।१४) आणि "**अहङ्कारं बलं दर्पम्**" (१६।१८, १८।५३) पदांत आलेले बलही त्याज्य आहे. सहाव्या अध्यायाच्या चौतीसाव्या श्लोकात "**बलवद्दृढम्**" पदाने आलेले बल शब्द मनाचे विशेषण आहे. ते बलही आसुरी संपत्तीचेच आहे. कारण त्यात कामना आणि आसक्ती असते. परंतु येथे (७।११ मध्ये) जे बल आलेले आहे ते कामना आणि आसक्ति-रहित आहे, म्हणून हे सात्त्विक उत्साहाचे वाचक आहे आणि ग्राह्य आहे. सतराव्या अध्यायाच्या आठव्या श्लोकात "**आयुः सत्त्वबलारोग्य**" पदात आलेला बल शब्दही याच सात्त्विक बलाचा वाचक आहे.

**धर्माविरुद्धो भूतेषु कामोऽस्मि भरतर्षभ**—हे भरत-वंशीयामधील श्रेष्ठ अर्जुन! मनुष्यात* धर्माला अविरुद्ध अर्थात् धर्मयुक्त "काम†" माझे स्वरूप आहे. कारण शास्त्र आणि लोकमर्यादेनुसार शुभ-भावाने केवळ सन्तान उत्पत्तीसाठी उत्पन्न झालेला जो काम असतो तो काम मनुष्याचे अधीन असतो. परंतु आसक्ती, कामना, सुखभोग इत्यादीसाठी उद्भवलेला जो काम असतो त्या कामात मनुष्य पराधीन होत असतो आणि त्याला वश होऊन तो न करण्यायोग्य शास्त्रविरोधी कामात प्रवृत्त होत असतो. शास्त्रविरोधी काम पतनाला तसेच संपूर्ण पाप आणि दुःखाला कारणीभूत होत असतो.

कृत्रिम उपायांनी संतती निरोध करवून केवळ भोग बुद्धीने कामात प्रवृत्त होणे महान् नरकाचा दरवाजा आहे. जो संतानाची उत्पत्ती करू शकतो तो "पुरुष" म्हणविला जातो आणि जी गर्भ धारण करू शकते ती "स्त्री" म्हणविली जाते‡. जर पुरुष आणि स्त्री ऑपरेशनद्वारा आपली संतानोत्पत्ती करण्याची योग्यता (पुरुषत्व आणि स्त्रीत्व) नष्ट करतील तर ते दोघेही हिजडे म्हणविण्याला योग्य होतात. नपुंसक झाल्यामुळे देवकार्य (हवन-पूजन इत्यादी) आणि पितृकार्य (श्राद्ध-तर्पण) करण्यात त्यांना अधिकार राहत नाही.卐 स्त्रीमधील मातृशक्ती नष्ट झाल्यामुळे तिच्यासाठी परम आदरणीय तसेच प्रिय "आई" संबोधनाचा प्रयोगही केला जाऊ शकत नाही. म्हणून मनुष्याने शास्त्र आणि लोकमर्यादेनुसार केवळ प्रजोत्पत्ती (संतानोत्पत्ती) करण्यासाठीच कामाचे सेवन करावे अन्यथा ब्रह्मचर्य व्रताचे पालन करावे.

**परिशिष्ट भाव**—संपूर्ण जंगम सृष्टी कामापासून उत्पन्न होते. म्हणून मनुष्यात जो काम धर्माशी विरुद्ध नाही, मर्यादेनुसार आहे, तो काम भगवंताचे स्वरूप आहे. भगवंताने पूर्वी सांगितले आहे—'**मत्तः परतरं नान्यत्किञ्चिदस्ति**' (७।७) आणि पुढेही सांगतील—'**ये चैव सात्त्विका भावा**' (७।१२), '**वासुदेवः सर्वम्**'। (७।१९) म्हणून जसा धर्मयुक्त काम भगवंताचे स्वरूप आहे तसाच धर्मविरुद्ध कामसुद्धा भगवंतापासून वेगळा नाही. जे धर्मविरुद्ध काम उपयोगात आणतात त्यांना नरकरूपाने भगवान् प्राप्त होतात, कारण नरकही भगवान्‌च आहेत! परंतु गीतेचा उद्देश मनुष्याला नरकात अथवा जन्म-मरणात पाठवायचे नाही, तर त्याचे कल्याण करायचे आहे. उद्देश नेहमी कल्याणाचा, आनंदाचाच असतो, दुःखाचा नव्हे. दुःख कोणीही इच्छित नाही. अर्जुनानेही कल्याणाचीच गोष्ट विचारली आहे.$ उदाहरणार्थ, शब्द चांगलेही असतात आणि वाईटही असतात. परंतु व्याकरणात चांगल्या शब्दांवरच विचार केला जातो. कारण व्याकरण इत्यादीही मनुष्याच्या उद्धारासाठीच आहेत.

---

* धर्माचे विधान मनुष्यासाठीच असते. कारण मनुष्येतर प्राण्यांना धर्माची मर्यादा लागूच होत नाही.

† तीसऱ्या अध्यायाच्या सदतीसाव्या श्लोकात भगवंतांनी ज्या कामाला संपूर्ण पापांचे कारण सांगितले आहे, त्या कामाचा वाचक येथे "काम" शब्द नाही. येथे "काम" शब्द गृहस्थी धर्माचे पालनाचा वाचक आहे.

‡ "स्त्यै शब्दसंघातयोः", "स्त्यायतः—संगते भवतः अस्यां शुक्रशोणिते इति स्त्री." (सिद्धांतकौमुदी, बालमनोरमा)

卐 अङ्गहीनाश्रोत्रियषण्ढशूद्रवर्जम्. (कात्यायन श्रौत सूत्र १।१।५)

$ 'यच्छ्रेयः स्यान्निश्चितं ब्रूहि तन्मे' (गीता २।७)
तदेकं वद निश्चित्य येन श्रेयोऽहमाप्नुयाम्॥ (गीता ३।२)
यच्छ्रेय एतयोरेकं तन्मे ब्रूहि सुनिश्चितम्॥ (गीता ५।१)

# ये चैव सात्त्विका भावा राजसास्तामसाश्च ये।
# मत्त एवेति तान्विद्धि न त्वहं तेषु ते मयि॥ १२॥

आणखी काय सांगू—

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **ये** | = जितके | **च** | = आणि | **विद्धि** | = समज. |
| **एव** | = काही | **तामसाः** | = तामस (भाव आहेत ते सर्व) | **तु** | = परंतु |
| **सात्त्विकाः** | = सात्त्विक | | | **अहम्** | = मी |
| **भावाः** | = भाव आहेत (आणि) | **मत्तः एव** | माझ्यापासूनच होतात— | **तेषु** | = त्यात (आणि) |
| **ये** | = जितके | | | **ते** | = ते |
| **च** | = काही | **इति** | = असे | **मयि** | = माझ्यात |
| **राजसाः** | = राजस | **तान्** | = त्यांना | **न** | = नाहीत. |

*व्याख्या*— **ये चैव सात्त्विका भावा राजसास्तामसाश्च ये**—हे जे सात्त्विक, राजस, तामस भाव (गुण, पदार्थ आणि क्रिया) आहेत तेही माझ्यापासूनच उत्पन्न झाले आहेत. याचे तात्पर्य संपूर्ण सृष्टीत जे काही होत आहे, मुळात सर्वांचा आश्रय, आधार आणि प्रकाशक भगवंतच आहेत अर्थात् सर्व भगवंतापासूनच सत्ता स्फूर्ती मिळवितात.

सात्त्विक, राजस आणि तामस भाव भगवंतापासूनच उत्पन्न होतात. म्हणून यात जी काही विलक्षणता दिसत असते ती सर्व भगवंताचीच असते. म्हणून मनुष्याची दृष्टी भगवंताकडेच गेली पाहिजे, सात्त्विक इत्यादी भावाकडे नव्हे. जर त्याची दृष्टी भगवंताकडे गेली तर तो मुक्त होईल आणि जर त्याची दृष्टी सात्त्विक इत्यादी भावाकडे गेली तर तो बांधला जाईल.

सात्त्विक, राजस, तामस या भावा (गुण, पदार्थ आणि क्रिया) अतिरिक्त कोणता भाव नाहीच. हे सर्व भगवत्स्वरूपच आहेत. याठिकाणी अशी शंका येते की, जर हे सर्व भगवत्स्वरूपच आहेत तर आपण जे काही करू ते सर्व भगवत्स्वरूपच होईल. मग असे करावे, असे करू नये—हा विधीनिषेध कुठे राहिला? याचे समाधान असे आहे की, सर्व मनुष्य सुखाची इच्छा करतात, दु:ख इच्छित नाहीत. अनुकूल परिस्थिती विहित कर्माचे फल आहे आणि प्रतिकूल परिस्थिती निषिद्ध कर्माचे फल आहे. म्हणून म्हटले जाते की, विहित कर्म करा आणि निषिद्ध कर्म करू नका. जर निषिद्धाला भगवत्स्वरूप समजून कराल तर भगवान् दु:ख आणि नरकरूपामध्ये प्रगट होतील. जो अशुभ कर्मांची उपासना करतो, त्याच्यासमोर भगवान् अशुभरूपानेच प्रगट होतात कारण दु:ख आणि नरक हीसुद्धा भगवंताचीच स्वरूपे आहेत.

जेथे करणे आणि न करण्याविषयी बोलले जाते त्या ठिकाणी निषेध आणि विधी लागू होत असतो. म्हणून त्या ठिकाणी विहितच केले पाहिजे, निषिद्ध करता कामा नये. परंतु जेथे जाणणे आणि मानणेविषयी बोलले जाते तेथे परमात्म्यालाच "मानले" पाहिजे आणि आपल्याला अथवा संसाराला "जाणले" पाहिजे.

जेथे मानण्याविषयी गोष्ट आहे, तेथे परमात्म्यालाच मानून त्यांच्या प्राप्तीची उत्कंठा वाढविली पाहिजे. त्यांना प्राप्त आणि प्रसन्न करण्यासाठी त्यांच्या आज्ञेचे पालन केले पाहिजे तसेच त्यांच्या आणि सिद्धांताच्या विरुद्ध कार्य करता कामा नये. भगवंताच्या आज्ञेविरुद्ध कार्य केले गेले, तर त्यांना प्रसन्नता कशी वाटेल? आणि विरुद्ध कार्य करणाऱ्याला त्यांची प्राप्ती कशी होईल? जसे एखाद्या मनुष्याच्या मनाच्या विरुद्ध काम केल्यास तो कसा खूश होईल आणि प्रेमाने कसा भेटेल?

जेथे जाणण्याविषयी, गोष्ट आहे, तेथे संसाराला जाणले पाहिजे. जो उत्पत्ति-विनाशशील आहे, नेहमी बरोबर राहणरा नाही, तो आपला नव्हे आणि आपल्यासाठीही नव्हे—असे जाणून त्यापासून संबंध-विच्छेद केला पाहिजे. त्याचे ठिकाणी कामना, ममता, आसक्ती ठेवता कामा नये. त्याचे महत्त्व अंत:करणातून समाप्त केले पाहिजे. असे केल्याने सत्-तत्त्व प्रगट होईल आणि जाणणे पूर्ण होईल. असत् (नाशवान्) वस्तू आपल्याजवळ राहणारी नाही—असे जरी समजले तरी वेळोवेळी त्याला महत्त्व देत राहिलो तर वास्तविकतेची (सत्-वस्तू) प्राप्ती होणार नाही.

**मत्त एवेति तान्विद्धि**—त्या सर्वांना तू माझ्यापासूनच उत्पन्न होणारे समज अर्थात् सर्व काही मीच आहे. कार्य आणि कारण—हे दोन्ही भिन्न दिसत असूनही कार्य, कारणाहून आपली भिन्न आणि स्वतंत्र सत्ता ठेवत नाही. म्हणून कार्य कारणरूपच असते. जसे सोन्यापासून दागिने

तयार होतात तर ते सोन्याहून वेगळे राहत नाहीत अर्थात् सोनेच असतात. तसेच परमात्म्यापासून उत्पन्न होणारी अनंत सृष्टी परमात्म्याहून भिन्न स्वतंत्र सत्ता ठेवू शकत नाही.

"**मत्तएव**" म्हणण्याचे तात्पर्य अपरा आणि परा प्रकृती माझा स्वभाव आहे. म्हणून कोणी त्याला माझ्यापासून भिन्न सिद्ध करू शकत नाही. सातव्या अध्यायाच्या परिशिष्टरूपी नवव्या अध्यायात भगवंतांनी म्हटले आहे की, "कल्पाच्या आदित प्रकृतीला वश करून मी वारंवार सृष्टीची रचना करतो" (९।८) आणि पुढे म्हणतात की "माझ्या अध्यक्षते-मध्ये प्रकृती चराचर संसाराची रचना करते" (९।१०) ह्या दोन गोष्टी एकच झाल्या. मग प्रकृतीचा स्वीकार करून भगवान् रचना करोत अथवा भगवंताच्या अध्यक्षतेत प्रकृती रचना करो—या दोन्हींचे तात्पर्य एकच आहे. भगवान् रचना करतात तर प्रकृतीला स्वीकारूनच करत असतात तेव्हा मुख्यता भगवंताचीच झाली आणि प्रकृतीने भगवंताच्या अध्यक्षतेत रचना केली तरीही मुख्यता भगवंताचीच झाली. याच गोष्टीला येथे म्हटले आहे की, "मी संपूर्ण जगाचा प्रभव आणि प्रलय आहे (७।६) आणि याचा उपसंहार करत असताना म्हणतात की, सात्त्विक, राजस आणि तामस—हे भाव माझ्यापासूनच उत्पन्न होत असतात".

भगवंतांनी विज्ञानासहित ज्ञान सांगण्याची प्रतिज्ञा करून जाणणाऱ्याची दुर्लभता सांगून जे प्रकरण आरंभ केले, त्यात अपरा आणि परा प्रकृतीचे वर्णन केले. अपरा आणि परा प्रकृतीला संपूर्ण प्राण्यांचे कारण सांगितले. कारण यांच्या संयोगानेच संपूर्ण प्राणी उत्पन्न होत असतात. नंतर आपल्याला या अपरा आणि पराचे कारण म्हटले "**मत्तः परतरं नान्यत्**" (७।७). हीच गोष्ट विभूतींच्या वर्णनाचा उपसंहार करताना येथे म्हटली आहे की, सात्त्विक, राजस आणि तामस भाव माझ्यापासूनच उत्पन्न होणारे आहेत असे समज.

**न त्वहं तेषु ते मयि**—मी त्यांच्यात नाही आणि ते माझ्यात नाहीत. तात्पर्य त्या गुणांची माझ्याशिवाय दुसरी कोणती स्वतंत्र सत्ता नाही अर्थात् मीच मी आहे, माझ्या-शिवाय दुसरे काहीच नाही. ते सात्त्विक, राजस आणि तामस जितके काही प्राकृत पदार्थ आणि क्रिया आहेत ते सर्वचे सर्व उत्पन्न आणि नष्ट होत असतात. परंतु मी उत्पन्नही होत नाही आणि नष्टही होत नाही. मी जर त्यांच्यात असतो तर त्यांचा नाश होताना माझाही नाश झाला असता; परंतु माझा कधीही नाश होत नाही. म्हणून मी त्यांच्यात नाही. जर ते माझ्यात असते, तर मी जसा अविनाशी आहे तसे तेही अविनाशी झाले असते परंतु ते तर नष्ट होतात आणि मी राहतो म्हणून ते माझ्यात नाहीत.

जसे बीजच वृक्ष, शाखा, पाने, फूल इत्यादीच्या रूपात असते, परंतु वृक्ष, शाखा, पाने इत्यादीत बीजाचा शोध घेतला तर त्यात बीज सापडणार नाही. कारण बीज त्यात तत्त्वरूपाने विद्यमान असते. तसेच सात्त्विक, राजस आणि तामस भाव माझ्यापासूनच उत्पन्न होतात परंतु त्या भावांत माझा शोध केला तर त्यात मी सापडणार नाही (७।१३). कारण मी त्यात मूलरूपाने आणि तत्त्वरूपाने विद्यमान असतो. म्हणून मी त्यांच्यात आणि ते माझ्यात नाहीत, अर्थात् सर्व काही मीच मी आहे.

ज्याप्रमाणे ढग आकाशापासूनच उत्पन्न होतात, आकाशातच राहतात आणि आकाशतच लीन होतात परंतु आकाश जसेच्या तसे निर्विकार राहत असते. आकाशात ढग नसतात आणि ढगात आकाश नसते. तसेच आठव्या श्लोकापासून येथपर्यंत जितक्या (सतरा) विभूती सांगितल्या गेल्या त्या सर्व माझ्यापासूनच उत्पन्न होतात, माझ्यातच राहतात आणि माझ्यातच लीन होतात. परंतु त्या माझ्यात नाहीत आणि मी त्यांच्यात नसतो. माझ्याशिवाय त्यांची स्वतंत्र सत्ता नाही. या दृष्टीने सर्व काही मीच आहे. तात्पर्य भगवंताशिवाय जितके सात्त्विक, राजस आणि तामस भाव अर्थात् प्राकृत पदार्थ आणि क्रिया दिसतात, त्यांची सत्ता मानून आणि त्यांना महत्त्व देऊन, माणसे त्यात फसत आहेत. म्हणून भगवान् अशा मनुष्यांचे लक्ष आपल्याकडे वेधतात की, या सर्व पदार्थात आणि क्रियेत सत्ता आणि महत्ता माझीच आहे.

## विशेष गोष्ट

सत्त्वगुण, रजोगुण आणि तमोगुण यापासून उत्पन्न होणारे निरनिराळे जितके भाव (प्राकृत पदार्थ आणि क्रिया) आहेत ते सर्वच्या सर्व भगवंताच्या शक्ती (प्रकृती) पासूनच उत्पन्न होतात. परंतु प्रकृती भगवंताशी अभिन्न असल्यामुळे या गुणांना भगवंतांनी "**मत्त एव**" माझ्या-पासूनच उत्पन्न होतात असे म्हटले आहे. तात्पर्य प्रकृती भगवंताशी अभिन्न असल्याकारणाने हे सर्व भाव भगवंतापासून उत्पन्न होतात आणि भगवंतातच लीन होतात, परंतु परा प्रकृतीने (जीवात्म्याने) यांच्याशी संबंध जोडून घेतला अर्थात् यांना आपले आणि आपल्यासाठी मानले—हेच परा प्रकृतीद्वारा जगताला धारण करणे आहे. यामुळेच तो जन्मत आणि मरत राहतो. आता त्या बंधनाचे निवारण करण्यासाठी या ठिकाणी म्हणतात की, सात्त्विक, राजस आणि तामस—हे सर्व भाव माझ्यापासूनच होतात. याच रीतीने दहाव्या

अध्यायात म्हटले आहे "**भवन्ति भावा भूतानां मत्त एव पृथग्विधाः**" (१०।५) अर्थात् प्राण्यांचे हे वेगवेगळ्या प्रकाराचे (वीस) भाव माझ्यापासूनच उत्पन्न होतात आणि "**अहं सर्वस्य प्रभवो मत्तः सर्वं प्रवर्तते**" (१०।८) अर्थात् सर्वांना उत्पन्न करणारा मी आहे आणि सर्व माझ्या सत्तेमुळेच प्रवृत्त होतात. पंधराव्या अध्यायातही म्हटले आहे की, स्मृती, ज्ञान इत्यादी सर्व माझ्यापासूनच उत्पन्न होतात-"**मत्तः स्मृतिर्ज्ञानमपोहनं च**" (१५।१५) जर सर्व काही परमात्म्यापासूनच उत्पन्न होत असते तर त्या गुणांचा मनुष्याशी कोणताही संबंध नाही. आपल्याशी गुणाचा संबंध न मानल्याने हा मनुष्य बांधला जात नाही अर्थात् ते गुण त्याच्या जन्म-मरणाला कारणीभूत होत नाहीत.

गीतेत ज्याठिकाणी भक्तीचे वर्णन आले आहे, त्याठिकाणी भगवान् म्हणतात की, सर्व काही मीच आहे "**सदसच्चाहमर्जुन**" (९।१९) आणि अर्जुनसुद्धा भगवंतासाठी म्हणतात की, आपण सत् आणि असत् देखील आहात, तसेच त्याच्या पलीकडेही आहात "**सदसत्तत्परं यत्**" (११।३७) ज्ञानी (प्रेमी) भक्तासाठीसुद्धा भगवान म्हणतात की, त्याच्या दृष्टीत सर्व काही वासुदेवच असते "**वासुदेवः सर्वम्**" (७।१९). कारण भक्तीत श्रद्धा आणि मान्यतेची मुख्यता असते तसेच भगवंताविषयी दृढ अनन्यता असते. भक्तीत अन्याचा अभाव असतो. जसे उत्तम पतिव्रतेला एका पतीशिवाय संसारात कोणी दुसरा पुरुष दिसतच नाही, तसेच भक्ताला एका भगवंताशिवाय दुसरे कोणी दिसतच नाही. केवळ भगवंतच दिसत असतात.

गीतेत ज्या ठिकाणी ज्ञानाचे वर्णन आले आहे त्याठिकाणी भगवान् सांगतात की, सत् आणि असत् दोन्ही वेगवेगळे आहेत-"**नासतो विद्यते भावो नाभावो विद्यते सतः**" (२।१६) तसेच ज्ञानमार्गात शरीर-शरीरी, देह-देही, क्षेत्र-क्षेत्रज्ञ, प्रकृति-पुरुष, दोन्हींना वेगवेगळे जाणण्याविषयी अनेक ठिकाणी म्हटले गेले आहे. जसे-"**प्रकृतिं पुरुषं चैव विद्ध्यनादी उभावपि**" (१३।१९) "**क्षेत्रक्षेत्रज्ञयोर्ज्ञानम्**" (१३।२) "**क्षेत्रक्षेत्रज्ञसंयोगात्**" (१३।२६) "**क्षेत्रं क्षेत्री तथा कृत्स्नम्**" (१३।३३), "**क्षेत्रक्षेत्रज्ञयोरेवमन्तरं ज्ञानचक्षुषा**" (१३।३४). कारण ज्ञानमार्गात विवेकाची प्रधानता असते. म्हणून त्याठिकाणी नित्य-अनित्य, अविनाशी-विनाशी इत्यादीचा विचार असतो आणि मग आपले स्वरूप पूर्णपणे निर्लिप्त आहे, असा बोध होतो.

साधकाचे ठिकाणी श्रद्धा आणि विवेक दोन्हीही असले पाहिजेत. भक्तिमार्गात श्रद्धेची मुख्यता असते आणि ज्ञानमार्गात विवेकाची मुख्यता असते. असे असले तरीही भक्तिमार्गात विवेकाचा आणि ज्ञानमार्गात श्रद्धेचा अभाव नसतो. भक्तिमार्गात सात्त्विक, राजस आणि तामस भाव भगवंतापासूनच होतात असे मानतात (७।१२) आणि ज्ञानमार्गात सत्त्व, रज आणि तम हे तिन्ही गुण प्रकृतीपासूनच होतात असे मानतात. "**सत्त्वं रजस्तम इति गुणाः प्रकृतिसम्भवाः**" (१४।५) दोन्हीही साधक आपल्यात निर्विकारता मानतात की, हे गुण आपले नाहीत आणि दोघेही ज्या एका तत्त्वाला प्राप्त होतात त्या तत्त्वाला द्वैत-अद्वैत, सत-असत् काहीही म्हणू शकत नाही.

भक्तिमार्गाचा अवलंब करणारे भगवंताशी अनन्य प्रेमाने अभिन्न होऊन प्रकृतीपासून संपूर्णपणे रहित होतात. ज्ञानमार्गाचा अवलंब करणारे प्रकृती आणि पुरुषाचा विवेक करून प्रकृतीशी संपूर्णपणे संबंधरहित असलेल्या आपल्या स्वरूपाचा साक्षात् अनुभव करून प्रकृतीपासून पूर्णपणे संबंधरहित होतात.

**परिशिष्ट भाव—'मत्तः परतरं नान्यत्किञ्चिदस्ति'** (७।७) चा विस्तार करीत भगवंताने मागील चार श्लोकात जी गोष्ट सांगितली आहे आणि जी गोष्ट सांगितली नाही, ती सर्वची सर्व गोष्ट उपसंहाररूपात भगवंताने या श्लोकात सांगितली आहे. भगवान् म्हणतात की, संपूर्ण सात्त्विक, राजस आणि तामस भाव माझ्यापासूनच उत्पन्न होतात, माझ्यापासूनच सत्ता-स्फूर्ती प्राप्त करतात. परंतु मी त्यांच्यात नाही आणि ते माझ्यात नाहीत अर्थात् सर्व काही मीच मी आहे. म्हणून माझी प्राप्ती इच्छिणाऱ्या साधकाची दृष्टी या भावांकडे न जाता माझ्याकडेच गेली पाहिजे. जर तो त्या भावात चिकटला तर कधी मुक्त अथवा भक्त होऊ शकणार नाही.

पाहणे, ऐकणे, समजणे इत्यादीत जे काही भाव येतात आणि जे येत नाहीत, ते सर्वचे सर्व 'ये' पदाच्या अंतर्गत समजावे.

भगवंतापासून उत्पन्न होण्यामुळे येथे सात्त्विक, राजस आणि तामस गुणांना 'भाव' नावाने म्हटले गेले आहे. तात्पर्य हे आहे की, भगवान् भावरूप (सत्तारूप) आहेत.* म्हणून त्यांच्यापासून भावच उत्पन्न होईल, अभाव कसा उत्पन्न होईल? भगवंतापासून उत्पन्न झाल्यामुळे सर्व भाव भगवंताचीच स्वरूपे आहेत—**'भवन्ति भावा भूतानां मत्त एव पृथग्विधाः'** (गीता

* 'नासतो विद्यते भावो नाभावो विद्यते सतः।' (गीता २।१६), 'मद्भावं सोऽधिगच्छति' (गीता १४।१९), 'सर्व भूतेषु येनैकं भावमव्यय मीक्षते' (गीता १८।२०)

१०।५) तात्पर्य हे आहे की, शरीर, इंद्रिये, मन, बुद्धीने जे काही सात्त्विक, राजस आणि तामस भाव, क्रिया, पदार्थ इत्यादी ग्रहण केले जातात ते सर्व भगवान्‌च आहेत.* मनाच्या सर्व स्फुरणा मग त्या चांगल्या असोत अथवा वाईट असोत, भगवान्‌च आहेत. संसारात चांगले वाईट, शुद्ध-अशुद्ध, शत्रु-मित्र, दुष्ट-सज्जन, पापात्मा-पुण्यात्मा इत्यादी जे काही पाहण्यात, ऐकण्यात सांगण्यात, मनन करण्यात, समजण्यात इत्यादीत येते, ते सर्व केवळ भगवानच आहेत. भगवंताशिवाय कुठेही काहीही नाही.

आपला काही स्वार्थ ठेवला, घेण्याची इच्छा ठेवली तेव्हाच सात्त्विक, राजस आणि तामस हे तीन भेद होतात. जर तुम्ही आपला काही स्वार्थ ठेवला नाही आणि दुसऱ्याच्या हिताची दृष्टी ठेवली तर हे भगवंताचेच स्वरूप आहे. यांना आपल्यासाठी मानणे, यांच्यापासून सुख घेणेच पतनाला कारण आहे. (गीता ३-३७)

'तिन्ही गुण माझ्यापासूनच प्रकट होतात'—असे म्हणून भगवंताने हा भाव प्रकट केला आहे की, साधकाची दृष्टी या गुणांकडे न जाता मज गुणातीताकडेच गेली पाहिजे अर्थात् माझी सत्ता आणि महत्ता मानून माझ्याशीच संबंध जोडला पाहिजे, ज्यामुळे माझी प्राप्ती होईल आणि नेहमीसाठी दुःखाचा नाश होऊन महान आनंदाचा अनुभव येईल. 'मी त्यांच्यात नाही आणि ते माझ्यात नाहीत'—असे सांगून भगवंताने हा भाव प्रकट केला आहे की, जर कोणी मनुष्याने मला सत्ता आणि महत्ता न देता सात्त्विक, राजस आणि तामस गुण, पदार्थ व क्रिया यांना सत्ता आणि महत्ता देऊन त्यांच्याशी संबंध जोडला तर तो मला प्राप्त न होता जन्म-मरणात निघून जाईल—**'कारणं गुणसङ्गोऽस्य सदसद्योनिजन्मसु'** (गीता १३।२१)

**'मत्त एव'** पदांचा प्रयोग करून भगवान् जणू हे म्हणत आहेत की, तिन्ही गुण माझ्यापासूनच होतात, मग तुम्ही माझ्याकडे न येता गुणात का फसत आहात? जे गुणात फसतात ते माझे भजन करू शकत नाहीत. (गीता ७।१३) परंतु जे गुणात फसत नाहीत, ते भक्त माझे भजन करतात. (गीता ७।१६, १०।८) हे गुण टिकणारे नाहीत. कारण टिकत असते कार्य टिकत नाही. जसे सोने टिकते अलंकार टिकत नाहीत, माती टिकते घट टिकत नाही, तसेच भगवान् टिकतात, गुण टिकत नाहीत. गुण तर परिवर्तनशील आणि समाप्त होणारे आहेत. परंतु भगवान् नित्य-निरंतर जसेच्या तसे राहणारे आहेत. त्यांचे परिवर्तनही होत नाही किंवा नाशही! म्हणून भगवत्प्राप्ती गुणांमुळे होत नाही, तर गुणांच्या संबंध-विच्छेदाने होते. म्हणून तमोगुणाला रजोगुणाने आणि रजोगुणाला सत्त्वगुणाने जिंकून गुणातीत व्हायचे आहे.

येथे एक विशेष गोष्ट समजण्यायोग्य आहे की, सगुण-साकार भगवान् सुद्धा वास्तविक निर्गुणच आहेत. कारण ते सत्त्व, रज आणि तम या गुणांनी युक्त नाहीत, तर ऐश्वर्य, माधुर्य, सौंदर्य, औदार्य इत्यादी गुणांनी युक्त आहेत. म्हणून सगुण-साकार भगवंताच्या भक्तीला सुद्धा निर्गुण (सत्त्वादी गुणांनी रहित) म्हटले गेले आहे. जसे—**'मन्निष्ठं निर्गुणं स्मृतम्', 'मन्निकेतं तु निर्गुणम्', 'निर्गुणो मदपाश्रयः', 'मत्सेवायां तु निर्गुणा'** (श्रीमद्भा० ११।२५।२४-२७).

**प्रश्न**—जर सर्व काही भगवंतच आहेत, तर मग सात्त्विक, राजस आणि तामस भाव त्याज्य का आहेत?

**उत्तर**—जसे जमीनीत सर्व ठिकाणी जल राहते परंतु त्याचे प्राप्ती स्थान विहीर आहे, तसेच भगवान् सर्व ठिकाणी आहेत, परंतु त्यांचे प्राप्ती स्थान यज्ञ (कर्तव्यकर्म) आहे—**'तस्मात्सर्वगतं ब्रह्म नित्यं यज्ञे प्रतिष्ठितम्'** (गीता ३।१५) परंतु सात्त्विक-राजस-तामस भावही भगवंताची प्राप्तीस्थाने नाहीत अर्थात् यांच्याद्वारा भगवत्प्राप्ती होत नाही. (गीता ७।१३) म्हणून हे साधकाच्या कामाचे नाहीत. म्हणून भगवंताने म्हटले आहे की, हे भाव माझ्यापासून होत असूनही मी त्यांच्यात आणि ते माझ्यात नाहीत.

जसे बाजरीच्या पिकात बाजरीच मुख्य असते, पाने-काड्या नाही. शेतकऱ्याचा उद्देश बाजरी प्राप्त करण्याचा असतो. बाजरी प्राप्त करण्यासाठी तो शेतीला पाणी, खत इत्यादींनी पुष्ट करतो, ज्यामुळे उत्कृष्ट बाजरी प्राप्त होऊ शकते. तसेच साधकाचा उद्देश सुद्धा केवळ भगवंताचा झाला पाहिजे. संसाराचा नव्हे. भगवत्प्राप्तीसाठी साधकाने संसाराची सेवा करावी. सेवेशिवाय संसाराशी आपला कोणताही मतलब ठेवू नये. महत्त्व बाजरीचे (दाण्याचे) आहे, पाने-काड्या यांचे नाही. कारण आरंभीही बाजरी राहते आणि शेवटीही बाजरीच राहते. बाजरी प्राप्त झाल्यावर जे शिल्लक राहते, ते (पाने-काड्या) बाजरीपासून वेगळे नसतानाही आपल्या कामाचे नाही, तर पशूंचे खाद्य आहे. तसेच सात्त्विक-राजस-तामस भाव मूढ (अविवेकी) माणसांसाठी

---

* मनसा वचसा दृष्ट्या गृह्यतेऽन्यैरपीन्द्रियैः।
अहमेव न मत्तोऽन्यदिति बुध्यध्वमञ्जसा॥ (श्रीमद्भा० ११।१३।२४)

'मनाने, वाणीने, दृष्टीने तसेच दुसऱ्या इंद्रियांनी जे काही (शब्दादी विषय) ग्रहण केले जाते, ते सर्व मीच आहे. म्हणून माझ्याशिवाय दुसरे काहीही नाही—हा सिद्धान्त तुम्ही विचारपूर्वक शीघ्र समजून घ्या अर्थात् स्वीकार करून अनुभव करा.'

आहेत. हे तिन्हीही भाव मनुष्याला बन्धनकारक आहेत. (१४।५) म्हणून हे भाव भगवंताचे रूप असूनही स्वयंसाठी नाहीत, तर विवेकपूर्वक सांसारिक व्यवहारासाठी आहेत. जसे विषही भगवंताचे स्वरूप आहे, परंतु ते खाण्यासाठी नाही!

जसे बाजरीपासून (बीजापासून) पाने-काड्या उत्पन्न होऊनही पाने-काड्यात बाजरी नाही आणि बाजरीत पाने-काड्या नाहीत, तसेच भगवंतापासून निर्माण होऊनही सात्त्विक-राजस-तामस भावात भगवान् नाहीत आणि भगवंतात सात्त्विक-राजस-तामस भाव नाहीत.

***संबंध***— *भगवंतांनी पूर्वी बाराव्या श्लोकात म्हटले आहे की, सात्त्विक, राजस आणि तामस भाव माझ्यापासूनच होतात. परंतु मी त्यांच्यात आणि ते माझ्यात नसतात. या विवेचनावरुन हे सिद्ध झाले की, भगवान प्रकृती आणि प्रकृतीच्या कार्यापासून संपूर्णपणे निर्लिप्त आहेत. त्याचप्रमाणे भगवंताचा शुद्ध अंश हा जीवसुद्धा निर्लिप्त आहे. यावर असा प्रश्न निर्माण होतो की, हा जीव निर्लिप्त असताना बांधला कसा जातो? याचे विवेचन पुढील श्लोकात करतात.*

**त्रिभिर्गुणमयैर्भावैरेभिः सर्वमिदं जगत्।**
**मोहितं नाभिजानाति मामेभ्यः परमव्ययम्॥ १३॥**

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **एभिः** | = या | **इदम्** | = हे | | (असलेल्या) |
| **त्रिभिः** | = तिन्ही | **सर्वम्** | = संपूर्ण | **अव्ययम्** | = अविनाशी |
| **गुणमयैः** | = गुणरूप | **जगत्** | = जगत् (प्राणीमात्र) | **माम्** | = मला |
| **भावैः** | = भावांनी | **एभ्यः** | = या गुणांहून | **अभिजानाती** | = जाणत |
| **मोहितम्** | = मोहित | **परम्** | = अतीत | **न** | = नाही. |

*व्याख्या*— **त्रिभिर्गुणमयैर्भावैरेभिः....परमव्ययम्**— सत्त्व, रज आणि तम—तिन्ही गुणांच्या वृत्ती उत्पन्न आणि लीन होत राहतात. त्यांच्याशी तादात्म्य करून मनुष्य आपल्याला सात्त्विक, राजस आणि तामस मानतो, अर्थात् त्यांचा आपल्यावर आरोप करून घेतो की, "मी सात्त्विक, राजस आणि तामस झालो आहे" अशा प्रकारे तिन्ही गुणांनी मोहित झालेला मनुष्य असे मानूच शकत नाही की, मी परमात्म्याचा अंश आहे. तो आपल्या अंशी परमात्म्याकडे न पाहता उत्पन्न आणि नष्ट होणाऱ्या वृत्तीशी आपला संबंध समजतो—हेच त्याचे मोहित होणे आहे. अशा प्रकारे मोहित झाल्यामुळे तो "माझा परमात्म्याशी नित्य संबंध आहे" हे समजूच शकत नाही.

या ठिकाणी "जगत्" शब्द जीवात्म्याचा वाचक आहे. निरंतर परिवर्तनशील शरीराशी तादात्म्य झाल्यामुळे हा जीव "जगत्" नावाने संबोधला जातो. तात्पर्य हा शरीराच्या जन्मण्यात आपले जन्मणे, शरीराच्या मरण्यात आपले मरणे, शरीराच्या आजारी होण्यात आपण आजारी होणे आणि शरीर स्वस्थ राहण्यात आपले स्वस्थ राहणे, मानत असतो. म्हणूनच याला "जगत्" म्हटले आहे. जोपर्यंत हा शरीराशी आपले तादाम्य मानत राहील तोपर्यंत हा जगत्च राहील अर्थात् जन्मत-मरतच राहील, कोठेही स्थायी होणार नाही.

भगवंताशिवाय गुणांची वेगळी सत्ता मानल्यानेच प्राणी मोहित होत असतात. जर त्यांनी गुणांना भगवत्स्वरूप मानले तर ते कधीही मोहित होऊच शकत नाहीत.

तिन्ही गुणांचे कार्य जे शरीर आहे त्या शरीराला आपले माना अथवा आपल्याला शरीर माना—दोन्हीही मान्यतेने मोह उत्पन्न होतो. शरीराला आपले मानणे "ममता" झाली आणि आपल्याला शरीर मानणे "अहंता" झाली. शरीराशी अहंता-ममता करणेच मोहित होणे आहे. मोहित झाल्याने हा गुणापासून संपूर्णपणे अतीत असलेले जे भगवत्तत्त्व आहे, त्याला जाणू शकत नाही. हा त्या भगवत्तत्त्वाला, जेव्हा त्रिगुणात्मक शरीराशी याची अहंता-ममता समाप्त होते, तेव्हा जाणू सकतो. हा सिद्धांत आहे की, मनुष्य संसारापासून संपूर्णपणे वेगळा होऊनच संसाराला जाणू शकतो आणि परमात्म्याशी संपूर्णपणे अभिन्न झाल्यावरच परमात्म्याला जाणू शकतो. याचे कारण हे आहे की, त्रिगुणात्मक शरीरापासून हा स्वतः संपूर्णपणे भिन्न आहे आणि परमात्म्याशी हा स्वतः संपूर्णपणे अभिन्न आहे.

अस्वाभाविकाविषयी स्वाभाविक भाव असणेच मोहित होणे आहे. जो प्रतिक्षणाला नष्ट होणाऱ्या तिन्ही गुणाच्या पलीकडे आहे, अत्यंत निर्लिप्त आहे आणि नित्य निरंतर एकरूप राहणारा आहे असा परमात्मा "स्वाभाविक" आहे. परमात्म्याची ही स्वाभाविकता बनविलेली नाही, कृत्रिम नाही, अभ्याससाध्य नाही तर स्वतः स्वाभाविक आहे. परंतु शरीर तसेच संसाराविषयी अहंता-ममता अर्थात् "मी" आणि "माझे" असा जो भाव उत्पन्न झाला आहे आणि जो

नष्ट होणारा आहे, हा केवळ मानलेला आहे. म्हणून हा भाव ''अस्वाभाविक'' आहे. या अस्वाभाविकाला स्वाभाविक मानणेच मोहित होणे आहे ज्यामुळे मनुष्य स्वाभाविकतेला समजू शकत नाही.

जीव प्रथम परमात्म्याशी विमुख झाला? की प्रथम संसाराशी सम्मुख (गुणांनी मोहित) झाला? याविषयी दार्शनिकांचे मत असे आहे की, परमात्म्याशी विमुख होणे आणि संसाराशी संबंध जोडणे हे दोन्ही अनादी आहेत. यांचा आदि नाही. म्हणून यांचेविषयी प्रथम अथवा नंतर म्हटले जाऊ शकत नाही. परंतु जर मनुष्याने प्राप्त झालेल्या स्वतंत्रतेचा दुरुपयोग केला नाही, त्याला केवळ भगवंताचे ठिकाणीच प्रवृत्त करणे आरंभ केले, तर हा संसारापासून मुक्त होतो अर्थात् याचे जन्म-मरण समाप्त होते. यावरुन हे सिद्ध झाले की, हा मनुष्य भगवंतांनी दिलेल्या स्वतंत्रतेचा दुरुपयोग करूनच बंधनात पडलेला आहे. आपल्या स्वतंत्रतेचा दुरुपयोग करून नष्ट होणाऱ्या पदार्थात गुरफटल्यामुळे हा परमात्मतत्त्वाला जाणू शकत नाही.

**परमव्ययम्**—या पदाने भगवान् म्हणतात की, मी या गुणांच्या पलीकडचा आहे अर्थात् या गुणांपासून संपूर्णपणे रहित, असम्बद्ध, निर्लिप्त आहे. मी कधीही, कोणत्याही गुणांनी बांधला गेलेला नाही आणि गुणांत होणाऱ्या परिवर्तनाने माझ्यात कोणतेही परिवर्तन होत नाही. अशा माझ्या वास्तविक स्वरूपाला गुणांनी मोहित झालेले प्राणी जाणू शकत नाहीत.

**परिशिष्ट भाव**—जो मनुष्य भगवंताला न पाहता सात्त्विक, राजस आणि तामस भावांनाच पाहतो. त्यांचा भोग घेतो, त्यापासून सुख घेतो, तो त्या भावांनी मोहित होतो अर्थात् भगवंताच्या दुस्तर गुणमयी मायेने बांधला जातो आणि फलस्वरूप वारंवार जन्मत-मरत असतो. तात्पर्य हे आहे की, सात्त्विक, राजस आणि तामस भाव (कर्म, पदार्थ, काल, स्वभाव, गुण इत्यादी) अनित्य आहेत आणि भगवान् नित्य आहेत. जे अनित्याचा भोग घेतात, ते बांधले जातात. परंतु जे अनित्याचा त्याग करून नित्यस्वरूप भगवंताचा आश्रय घेतात, ते मुक्त होतात. (गीता ७। १४)

या श्लोकात जीवात्म्यासाठी 'जगत्' शब्द आला आहे. याचे तात्पर्य हे आहे की, ज्याची सत्ता विद्यमान नाहीच, त्याला सत्ता आणि महत्ता देऊन त्याच्याशी संबंध जोडल्याने जीवसुद्धा जगत् होतो! चेतनसुद्धा (चेतनतेचा दुरुपयोग करून) जड होतो! उत्कृष्ट परा प्रकृतीसुद्धा निकृष्ट अपरा-प्रकृती बनते! जीव जगताच्या उत्पत्ति-विनाशाला आपला उत्पत्ति-विनाश, जगताच्या लाभ-हानीला आपली लाभ-हानी मानतो. जसे मनुष्य कामनेशी अभिन्न होऊन **'कामात्मानः'** अर्थात् कामनारूप होतो. (गीता २। ४३) आणि भगवंताशी अभिन्न होऊन **'मन्मयाः'** अर्थात् भगवद्रूप होतो. (गीता ४। १०) तसेच जीव जगताशी अभिन्न होऊन जगतरूप होतो. फरक हाच आहे की, भगवद्रूपाने तो नित्य आहे परंतु कामनारूपाने अथवा जगतरूपाने तो अनित्य आहे.

जीवाने भगवंताशिवाय दुसरी सत्ता मानली, सत्ता मानून त्याला महत्त्व दिले, महत्त्व देऊन त्याच्याशी संबंध जोडला आणि संबंध जोडून आपल्या स्वतंत्र सत्तेचा अभाव करून घेतला. म्हणून तो 'जगत्' बनला! जो केवळ जगताची सत्ता मानतो, तो आपल्या सत्तेशी विमुख होऊन जगत् होतो, जे अवास्तविक आहे आणि जो केवळ भगवंताची सत्ता मानतो, तो आपल्या स्वतंत्र सत्तेची मान्यता समाप्त करून भगवान् होतो—**'मम साधर्म्यमागताः'** (गीता १४। २) जे वास्तविक आहे.

जीवाला 'जगत्' म्हणण्याचे तात्पर्य हे आहे की, त्याचे चेतनाकडे लक्षच राहिले नाही, तर जड शरीरालाच 'मी' (आपले स्वरूप) आणि 'माझे' मानू लागला. जीव स्वरूपाने निर्गुण आणि अव्यय असूनही 'जगत्' झाल्यामुळे सात्त्विक-राजस-तामस या गुणांनी बांधला जातो—**'निबध्नन्ति महाबाहो देहे देहिन मव्ययम्'** (गीता १४। ५) वास्तविक अलौकिक परमात्म्याचा अंश असल्यामुळे जीवसुद्धा अलौकिकच आहे. (१३। ३१) परंतु लौकिक जगताला पकडल्यामुळे तोही लौकिक होतो! अहम्-पासून पृथ्वीपर्यंत सर्व अपरा-प्रकृती आहे. (गीता ७। ४) म्हणून जसे पृथ्वी जड आहे तसेच अहम्ही जड आहे. जेव्हा जीव अहम्ला दृढतेने पकडून **'अहङ्कारविमूढात्मा'** होतो अर्थात् अहम्ला आपले स्वरूप मानतो, तेव्हा त्याचे पतन होत-होत तोही जड जगतच बनतो. अर्थात् त्याचा चेतनपणा लुप्त (विस्मृत) होतो, त्याला चेतनपणाचा अनुभव होत नाही.

जे गुणात आसक्त होत नाहीत, त्यांच्यासमोर जडता राहतच नाही. म्हणून त्यांना सर्व ठिकाणी भगवंतच भगवंत दिसतात—**'वासुदेवः सर्वम्'** (गीता ७। १९). परंतु जे गुणात आसक्त होतात, त्यांना भगवान् दिसतच नाहीत, तर संसारच-संसार दिसतो. म्हणून ते भगवंतानाही संसारीच पाहतात. ते गुणातीत भगवंतालाही गुणांनी बांधलेले पाहतात, अविनाशी भगवंतालाही जन्मणारा-मरणारा पाहतात. (गीता ७। २४) भक्ताची दृष्टी तर भगवंताला सोडून दुसरीकडे जात नाही आणि गुणात आसक्त असलेल्या संसारी लोकांची दृष्टी संसाराला सोडून दुसरीकडे जात नाही. म्हणून भक्ताला आनंदच आनंद प्राप्त होतो आणि संसारी मनुष्याला दुःखच दुःख—**'दुःखालयम्'** (गीता ८। १५)!

*संबंध—आता पुढील श्लोकात भगवान् आपल्याला जाणू न शकण्याची कारणे सांगत आहेत.*

**दैवी ह्येषा गुणमयी मम माया दुरत्यया।**
**मामेव ये प्रपद्यन्ते मायामेतां तरन्ति ते॥ १४॥**

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **हि** | = कारण | **दुरत्यया** | = दुस्तर आहे अर्थात् हिचे उल्लंघन करणे फार कठीण आहे | **प्रपद्यन्ते** | = शरण होतात, |
| **मम** | = माझी | | | **ते** | = ते |
| **एषा** | = ही | | | **एताम्** | = ही |
| **गुणमयी** | = गुणमयी | | | | |
| **दैवी** | = दैवी | **ये** | = जे | **मायाम्** | = माया |
| **माया** | = माया | **माम् एव** | = केवळ मलाच | **तरन्ति** | = तरून जातात. |

*व्याख्या—* **दैवी ह्येषा गुणमयी* मम माया दुरत्यया**—सत्त्व, रज आणि तम—ह्या तिन्ही गुणांनी युक्त असणारी दैवी (देव अर्थात् परमात्म्याची) माया अत्यंत दुस्तर आहे. भोग आणि संग्रहाची इच्छा ठेवणारे मनुष्य या मायेशी संबंध-विच्छेद करू शकत नाहीत.

"**दुरत्यय**"—म्हणण्याचे तात्पर्य ही माणसे आपल्याला कधी सुखी आणि कधी दु:खी, कधी समजदार तर कधी अडाणी, कधी दुर्बल तर कधी बलवान इत्यादी मानून त्या भावात तल्लीन राहत असतात. अशा प्रकारे येणाऱ्या जाणाऱ्या प्राकृत भावामध्ये आणि पदार्थामध्येच तादाम्य, ममता, कामना करून त्यांच्याशी बांधलेले राहतात आणि आपणाला त्यांच्यापासून रहित असा अनुभव करू शकत नाहीत. हाच या मायेचा दुस्तरपणा आहे.

ही गुणमयी माया, जेव्हा भगवंताशिवाय गुणांची स्वतंत्र सत्ता आणि महत्ता मानली जाते, तेव्हा दुस्तर होत असते. जर मनुष्याने भगवंताशिवाय गुणाची वेगळी सत्ता आणि महत्ता मानली नाही तर तो या गुणमयी मायेतून तरून जाईल.

**मामेव ये प्रपद्यन्ते मायामेतां तरन्ति ते**—मनुष्यांपैकी जे मला शरण येतात ते या मायेला तरून जातात. कारण त्यांची दृष्टी केवळ माझ्याकडेच राहत असते, तिन्ही गुणांकडे नव्हे. ज्याप्रमाणे पूर्वी वर्णन आले आहे की, सत्त्व, रज आणि तम—हे तिन्ही गुण माझ्यात नाहीत आणि मी त्यांच्यात नाही. मी तर निर्लिप्त राहून सर्व कार्य करतो. अशा प्रकारे जे माझ्या स्वरूपाला जाणतात, ते गुणांत फसत नाहीत, या मायेतून तरून जातात. ते गुणांचे कार्य मन-बुद्धीची किंचित्मात्रही मदत घेत नाहीत. का घेत नाहीत? कारण ते ह्या गोष्टीला जाणतात की, प्रकृतीचे कार्य असल्याने मन, बुद्धी ही तर प्रकृतीच आहे. प्रकृतीची क्रियाशीलता प्रकृतीतच असते. ज्याप्रमाणे प्रकृती प्रत्येक क्षणाला प्रलयाकडे वाटचाल करत आहे, त्याप्रमाणेच हे मन, बुद्धीही तर प्रलयाकडेच जात आहेत. म्हणून त्यांची मदत घेणे परतंत्रताच आहे. अशी परतंत्रता मुळीच राहू नये आणि परा-प्रकृती (जो परमात्म्याचा अंश आहे) केवळ परमात्म्याकडे आकृष्ट व्हावी, तसेच अपरापासून संपूर्णपणे विमुख व्हावी. हेच भगवंताचे संपूर्णपणे शरण होण्याचे तात्पर्य आहे.

या ठिकाणी "**मामेव**" म्हणण्याचे तात्पर्य ते अनन्य-भावाने केवळ मलाच शरण येतात, कारण माझ्याशिवाय दुसरी कोणती सत्ता नाहीच.

कित्येक साधक मला शरण तर होतात परंतु "केवळ मलाच" शरण होत नाहीत. म्हणून म्हटले की, जे "**मामेव**" केवळ मला शरण येतात ते तरून जातात. मायेला शरण जाऊ नये अर्थात् आपल्याजवळ रुपये-पैसे, वस्तू-पदार्थ इत्यादी सर्व रहावे, परंतु आपण त्यांना आपला आधार मानू नये. त्यांचा आश्रय घेऊ नये, त्यांच्यावर भरवसा ठेवू नये, त्यांना महत्त्व देऊ नये. त्यांचा उपयोग करण्याचा आपल्याला अधिकार आहे. त्यांच्यावर मालकी हक्क स्थापित करण्याचा आपल्याला अधिकार नाही. त्यांच्यावर मालकी हक्क स्थापित करणे म्हणजेच त्यांच्या आश्रित होणे आहे. आश्रित झाल्यावर त्यांच्यापासून वेगळे होणे कठीण वाटते. हाच वास्तविक दुस्तरपणा आहे. या दुस्तरपणापासून सुटका करून

---

* भगवंतांनी पूर्वी बाराव्या श्लोकात हे म्हटले आहे की, सात्त्विक, राजस आणि तामस भाव माझ्यापासूनच होतात. त्यालाच अनुसरून भगवंतांनी येथे गुणमयी मायेला आपली दैवी (अलौकिक) माया म्हटले आहे. मागील तेराव्या श्लोकात ज्या तीन गुणमय भावाने संपूर्ण जगताला मोहित म्हटले होते, त्यांनाच येथे "एष" पदाने म्हटले आहे.

मायेला "गुणमयी" म्हणण्याचे तात्पर्य ही माया कार्यरूप आहे कारण गुण प्रकृतीचे कार्य आहेत आणि ते गुणच जीवाला बांधतात, स्वत: प्रकृती नव्हे.

घेण्यासाठीच उपाय सांगतात "**मामेव ये प्रपद्यन्ते**"

शरीर, इंद्रिये इत्यादी सामुग्रीला आपली व आपल्यासाठी न मानता, भगवंताची आणि भगवंतासाठीच मानून भगवंताच्या भजनात, त्यांच्या आज्ञापालनात, लावावयाची आहे. आपल्याला त्यांच्याकडून काहीही घ्यावयाचे नाही. त्यांना भगवंताचे ठिकाणी लावण्याचे जे फल आहे तेही आपल्याला घ्यावयाचे नाही. कारण जर भगवंताची वस्तू संपूर्णपणे भगवंताला अर्पण केली अर्थात् त्यात अज्ञानाने जी आत्मीयता ठेवली होती, ती काढून घेतली तर त्या समर्पणाचे फल आपले कसे होऊ शकते? ही सर्व सामुग्री तर भगवंताची सेवा करण्यासाठीच भगवंताकडून मिळाली आहे. म्हणून हिला त्यांच्या सेवेमध्ये उपयोगात आणणे आपले कर्तव्य आहे, आपली इमानदारी आहे. या ईमानदारीला पाहून भगवान् फार संतुष्ट होतात आणि त्यांच्या कृपेने मनुष्य मायेतून तरून जातात.

आपल्याजवळ आपली म्हणविणारी कोणती वस्तू नाहीच. भगवंतांनी दिलेल्या वस्तूंना आपली मानून आपल्या ठिकाणी अभिमान केला होता—ही चूक होती. भगवंताचा तर फारच उदार आणि प्रेमळ स्वभाव आहे की, ते ज्याला जे काही देतात त्याला त्या गोष्टीचा पत्ताच लागू देत नाहीत की, ही वस्तू भगवंतांनी दिली आहे, तर ज्याला जे मिळाले आहे त्याला तो आपली आणि आपल्यासाठीच मानतो. ही भगवंताकडून देण्याची एक विलक्षण पद्धती आहे. त्यांच्या या कृपेला केवळ भक्तलोकच जाणू शकतात. परंतु जे लोक भगवंतापासून विमुख होतात ते विचारच करू शकत नाहीत की, ह्या वस्तूंना आपण नेहमीसाठी आपल्याजवळ ठेवू शकतो का? अथवा वस्तूजवळ आपण नित्य राहू शकतो का? या वस्तूवर आपला अधिकार स्थापित होऊ शकतो का? म्हणून ते अनन्यभावाने भगवंताला शरण होऊ शकत नाहीत.

या श्लोकाचा भाव हा झाला की, जे केवळ भगवंतालाच शरण होतात अर्थात् जे केवळ दैवी संपत्तीने युक्त असतात, ते भगवंताच्या गुणमयी मायेतून तरून जातात. परंतु जे भगवंताला शरण न होता देवता इत्यादींना शरण होतात अर्थात् जे केवळ आसुरी संपत्तीने (प्राणपिंड पोषणपरायण, सुखोपभोगपरायण) युक्त असतात ते भगवंताच्या गुणमयी मायेतून तरून जाऊ शकत नाहीत. असे आसुरी संपत्तीने युक्त असलेले लोक जरी ब्रह्मलोकापर्यंत गेले तरीपण त्यांना (ब्रह्मलोकापर्यंत गुणमयी माया असल्याने) तेथून परत यावेच लागते, जन्मावे-मरावे लागतेच.

**परिशिष्ट भाव**—मनुष्य जेव्हा संसाराशी विन्मुख होऊन भगवंताची शरणागती स्वीकारतो तेव्हा तो माया (अपरा-प्रकृतीचे कार्य) तरून जातो अर्थात् त्याच्या अहम्‌चा सर्वथा नाश होतो. भगवंताची शरणागती स्वीकारण्याचे तात्पर्य हे आहे की, भगवंताच्या सत्तेतच आपली सत्ता मिसळून टाकावी अर्थात् केवळ भगवंताचीच सत्ता स्वीकार करावी. आपलीही स्वतंत्र सत्ता मानू नये आणि मायेचीही स्वतंत्र सत्ता मानू नये, अहम्‌चाही आश्रय घेऊ नये किंवा मायेचाही (गुणांचाही) आश्रय घेऊ नये. यात काही परिश्रम, प्रयत्न नाही.

मायेला सत्ता मनुष्यानेच दिली आहे—'**ययेदं धार्यते जगत्**' (गीता ७।५), '**मनः षष्ठानीन्द्रियाणि प्रकृतिस्थानि कर्षति**'। (गीता १५।७) जर तो मायेला सत्ता न देता केवळ भगवंतालाच शरण राहीला तर तो मायेला तरून जातो अर्थात् त्याच्यासाठी मायेची सत्ता राहतच नाही.

जीव जडतेचा आश्रय घेतल्यामुळे अर्थात् त्याला आपले आणि आपल्यासाठी मानल्यामुळे जडतेत निघून जातो आणि जगत् बनतो. (गीता ७।१३) परंतु भगवंताचा आश्रय घेतल्याने तो स्वतःसिद्ध चिन्मयतेत प्रविष्ट होतो अर्थात् भक्त होतो. भक्त झाल्यावर जगत् लुप्त होते अर्थात् जगत् जगत्‌रूपाने राहत नाही, तर भगवत्स्वरूप होते, जे वास्तविक आहे.

'**मामेव**' पदाने भगवंताचे तात्पर्य हे आहे की, जीव माझाच (मम एव) अंश आहे—'**ममैवांशो जीवलोके**' (गीता १५।७) म्हणून मलाच (**माम् एव**) शरण झाल्याने तो मायेला तरून जातो. म्हणून मला शरण झालेल्या भक्तांचा दुसऱ्या कोणाशी संबंध होतच नाही, होणे भगवंतच नाही. कारण त्यांच्या दृष्टीत माझ्याशिवाय (भगवंताशिवाय) दुसरा कोणी नसतोच. त्यांची दृष्टी दुसऱ्यात जात नाही आणि दुसऱ्याची दृष्टी त्यांच्यात येत नाही. त्यांच्या दृष्टीत अपरा-प्रकृतीची सत्ताही राहत नाही आणि महत्ताही राहत नाही तसेच आत्मीयताही राहत नाही. त्यांची केवळ भगवद्‌बुद्धी होते, जी वास्तविक भगवत्स्वरूपच आहे.

ज्यांच्यात विवेकाची प्रधानता आहे, असे भक्त अहम्‌चा आश्रय सोडून अर्थात् संसाराचा त्याग करून भगवंताचे आश्रित होतात. परंतु ज्यांच्यात विवेकाची प्रधानता नसते, तर भगवंतात श्रद्धा-विश्वासाची प्रधानता असते, असे साधे सरळ भक्त अहम्‌ला बरोबर ठेवूनच (जसे आहेत तसेच) भगवंताच्या आश्रित होतात. अशा भक्तांच्या अहम्‌चा नाश भगवान् स्वतः करतात. (गीता १०।११)

***संबंध**—पूर्व श्लोकात भगवंतांनी हे सांगितले की, मला शरण येणारे सर्व मायेतून तरून जातात म्हणून सर्वचे सर्व प्राणी मला शरण का होत नाहीत याचे कारण पुढील श्लोकात सांगत आहेत.*

**न मां दुष्कृतिनो मूढाः प्रपद्यन्ते नराधमाः।**
**माययापहृतज्ञाना आसुरं भावमाश्रिताः॥ १५॥**

परंतु—

| | |
|---|---|
| **मायया** | = मायाद्वारा |
| **अपहृत ज्ञानाः** | = ज्यांचे ज्ञान हरले गेले आहे, (ते) |
| **आसुरम् भावम्** | = आसुर भावाचा |
| **आश्रिताः** | = आश्रय घेणारे (आणि) |
| **नराधमाः** | = मनुष्यात महान नीच (तसेच) |
| **दुष्कृतिनः** | = पापकर्म करणारे |
| **मूढाः** | = मूढ मनुष्य |
| **माम्** | = मला |
| **न, प्रपद्यन्ते** | = शरण होत नाहीत. |

*व्याख्या*—**न मां दुष्कृतिनो मूढाः प्रपद्यन्ते नराधमाः**—जे दुष्कर्म करणारे आणि मूर्ख असतात ते भगवंताला शरण जात नाहीत. दुष्कृती तेच असतात जे नाशवान्, परिवर्तनशील प्राप्त पदार्थात ''ममता'' ठेवतात आणि अप्राप्त पदार्थांची ''कामना'' करतात. कामनापूर्ती झाली असता ''लोभ'' आणि कामनेच्या पूर्तीत बाधा झाल्यावर ''क्रोध'' उत्पन्न होतो. अशा प्रकारे जो ''कामने''त फसून व्यभिचार इत्यादी शास्त्रनिषिद्ध विषयांचे सेवन करतात, ''लोभात'' फसून खोटेपणा, कपट, विश्वासघात, बेइमानी इत्यादी पाप करतात आणि ''क्रोधा'' च्या भरात द्वेष, वैर इत्यादी वाईट रीतीने हिंसाचारादी पाप करतात ते ''दुष्कृति'' आहेत.

जेव्हा माणसे भगवंताशिवाय दुसरी सत्ता मानून त्याला महत्त्व देतात तेव्हाच कामना उत्पन्न होत असते. कामना उत्पन्न झाल्याने माणसे मायेने मोहित होऊन जातात आणि ''आपण जिवंत रहावे आणि भोग भोगत रहावे'' हेच त्यांना पटलेले असते. म्हणून ते भगवंताला शरण जात नाहीत तर विनाशी वस्तू-पदार्थ इत्यादींना शरण जातात.

तमोगुणाचे अधिक्य असल्याने सार-असार, नित्य-अनित्य, सत-असत् ग्राह्य-त्याज्य, कर्तव्य-अकर्तव्य, इत्यादीकडे लक्ष न देणारे भगवद्विमुख मनुष्य ''मूढ'' आहेत. दुष्कर्म करणारे आणि मूर्ख पुरुष परमात्म्याकडे वाटचाल करण्याचा निश्चयच करू शकत नाहीत, तर मग ते परमात्म्याला शरण कसे होऊ शकतात?

''**नराधमाः**'' म्हणण्याचे कारण असे आहे की, ते दुष्कर्म करणारे आणि मूर्ख मनुष्य पशूपेक्षाही नीच आहेत. पशू तर पशू असूनही आपल्या मर्यादेत राहतात. परंतु हे मनुष्य असूनही आपल्या मर्यादेत राहत नाहीत. पशू तर आपली योनी भोगून मनुष्य योनीकडे येत आहेत आणि हे मनुष्य असून (ज्यांना परमात्मप्राप्तीसाठी मनुष्यशरीर मिळाले आहे) पाप, अन्याय इत्यादी करून नरक आणि पशू योनीकडे जात आहेत. अशा मूर्खपणाने पाप करणारे प्राणी नरकाचे अधिकारी होतात. अशा प्राण्यांसाठी भगवंतांनी (१६।१९-२० मध्ये) म्हटले आहे की, ''द्वेष करणारे मूर्ख, क्रूर आणि संसारातील नराधम पुरुषांना मी वारंवार आसुरी योनीत जन्माला घालतो. मग ते आसुरी योनीला प्राप्त होऊन घोर नरकाला जातात.''

**माययापहृतज्ञाना आसुरं भावमाश्रिताः**—भगवंताची जी तीन गुण असणारी माया आहे (७।१४) त्या मायेमुळे विवेक झाकला गेल्याकारणाने जे आसुरी भावनेला प्राप्त झाले आहेत, अर्थात् शरीर, इंद्रिये, अंतःकरण आणि प्राणांचे पोषण करण्यात मग्न झाले आहेत; ते माझ्याशी नित्य विमुखच राहतात. म्हणून ते मला शरण येत नाहीत.

दुसरा भाव असा आहे की, ज्यांचे ज्ञान मायेने झाकले गेले आहे, त्यांची वृत्ती पदार्थांच्या आदि आणि अंताकडे जातच नाही. उत्पत्ति-विनाशशील पदार्थांना प्रत्यक्ष नश्वर पाहत असतानाही ते रुपये-पैसे, संपत्ती इत्यादीच्या संग्रहात आणि मान, योग्यता, प्रतिष्ठा, कीर्ती इत्यादीतच आसक्त राहतात आणि त्यांची प्राप्ती करण्यात आपली मर्दुमकी आणि प्रयत्नाचे साफल्य, इति श्री मानतात. या कारणामुळे ते हे समजूच शकत नाहीत की, जे आत्ता नाही त्याची प्राप्ती झाल्यावरही शेवटी ते ''नाही'' तच जमा होणार आहे आणि त्यांच्याशी आपला संबंध राहणार नाही.

''असु'' प्राणाला म्हणतात. प्राणाला प्रत्यक्ष येणारा जाणारा अर्थात् क्रियाशील आणि नाश होणारा पाहत असूनही ते त्या प्राणाचे पोषण करण्यात मग्न असतात. जीवन-निर्वाहामध्ये कामी येणाऱ्या सांसारिक वस्तूनांच ते महत्त्व देत असतात. त्या वस्तूपेक्षाही रुपये-पैशाला अधिक महत्त्व देतात जे स्वतः उपयोगात येत नाहीत तर वस्तूद्वारा कामी येतात. ते केवळ रुपयांनाच आदर देत नाहीत तर त्याच्या संख्येला फार आदर देतात. रुपयांची संख्या अभिमान

वाढविण्यात साहाय्य होते. अभिमान संपूर्ण आसुरी संपत्तीचा आधार आणि संपूर्ण दु:ख तसेच पापाचे कारण आहे* हा अभिमान उराशी बाळगून जे आपल्याला मोठे समजतात ते आसुरीभावाला प्राप्त होतात.

## विशेष गोष्ट

येथे भगवंतांनी म्हटले आहे की, दुष्कर्म करणारी माणसे मला शरण होऊ शकत नाहीत आणि नवव्या अध्यायाच्या तीसाव्या श्लोकात म्हटले आहे की, जर दुराचारी मनुष्याने-सुद्धा अनन्यभावाने माझे भजन केले तर तो फार लवकर धर्मात्मा होऊन जाईल. तसेच निरंतर राहणाऱ्या शांतीला प्राप्त होईल. हे कसे काय शक्य आहे ? याचे समाधान असे आहे की, तेथे (९।३० मध्ये) **''अपि चेत्''** पद आले आहे ज्याचा अर्थ, दुराचाऱ्याची प्रवृत्ती परमात्म्याकडे स्वाभाविक होत नाही, परंतु जर तो भगवंताला शरण होईल तर त्याला भगवंताकडून मनाई नाही. भगवंताकडून कोणत्याही जीवासाठी थोडीही बाधा (अटकाव) नाही कारण भगवान् प्राणीमात्रासाठी सम असतात. त्यांचा कोण्याही प्राण्याविषयी राग-द्वेष नसतो (९।२९). दुराचाऱ्यांतील दुराचारी मनुष्यसुद्धा भगवंताच्या द्वेषाचा विषय नसतो. सर्व प्राण्यांशी भगवंताची प्रीती आणि कृपा समानच असते.

वास्तविक दुराचारी अधिक दयेचा पात्र आहे कारण तो आपलेच अहित करत असतो, भगवंताचे काहीही बिघडवित नाही. म्हणून एखाद्या कारणाने दैवी प्रकोप किंवा भयंकर संकट प्राप्त झाले आणि त्यावेळी त्याला कोणाचाही आधार मिळाला नाही, तर तो भगवंताच्या नावाने टाहो फोडेल. तसेच एखाद्या संताला दु:ख दिले आणि त्यांच्या अंत:करणात कृपा उपजली तर त्या संताच्या कृपेने तो भगवंताकडे खेचला जाईल. एखाद्या ठिकाणी जेथे पूर्वी विलक्षण दयाळू संत महात्मे राहिलेले आहेत तेथे जाऊन राहण्याचा प्रसंग येईल आणि त्या स्थानाच्या प्रभावाने त्याचा भाव बदलून जाईल, किंवा त्याचे पूर्व पुण्य उदयाला आले तर तो एकदम जागृत होऊ शकतो आणि भगवंताला शरण होऊ शकतो. असा पापी पुरुष भगवंताकडे जर लागला, तर दृढतेने लागतो कारण त्याच्यात कोणताही चांगुलपणा नसतो त्यामुळे त्याला चांगुलपणाचा अभिमान होत नाही.

तात्पर्य हे झाले की, संपूर्ण प्राण्यात भगवंताची व्यापकता आणि कृपा समान आहे. सदाचार आणि दुराचार हे तर त्या प्राण्यांनी केलेली करतूत आहे. मूळात तर ते प्राणी नित्य भगवंताचे शुद्ध अंश आहेत. केवळ दुराचारामुळे त्यांची भगवंतात रुची नसते. जर एखाद्या कारणाने रुची झाली तर भगवान् त्यांच्या कार्यांना न पाहता त्यांचा स्वीकार करत असतात—

**रहति न प्रभु चित चूक किए की। करत सुरति सय बार हिए की॥**

मानस (१।२९।३)

जसे आईचे अंत:करण आपल्या संबंधाने बालकांवर समानच राहत असते. त्यांच्या सदाचार-दुराचारामुळे त्यांच्या विषयी आईचा व्यवहार तर विषम असतो पण अंत:करण विषम नसते—**''कुपुत्रो जायेत क्वचिदपि कुमाता न भवति''**. आई तर एका जन्माला आणि एका शरीराला देणारी असते परंतु प्रभू तर नेहमी राहणारी आई आहेत. प्रभूचे हृदय तर प्राणीमात्रावर सदैव द्रवित राहतच असते. प्राणी निमित्तमात्र जरी शरण झाला तर प्रभू विशेष द्रवित होतात. भगवान् म्हणतात—

**जौं नर होई चराचर द्रोही। आवै सभय सरन तकि मोही॥**
**तजि मद मोह कपट छल नाना। करउँ सद्य तेहि साधु समाना॥**

(मानस ५। ४८। १-२)

याचे तात्पर्य जो चराचर प्राण्याशी द्वेष करणारा आहे तो जेव्हा कुठेही आश्रय न मिळाल्यामुळे भयभीत होऊन संपूर्णपणे माझाच आश्रय घेऊन मला शरण होतो, तेव्हा त्याचे ठिकाणी असणाऱ्या मद, मोह, कपट, अनेक छल इत्यादी दोषांकडे न पाहता केवळ त्याच्या भावाकडे पाहून मी त्याला फार लवकर साधू बनवतो.

धर्माचा आश्रय असल्याने धर्मात्मा पुरुषांच्या अंत:-करणात भगवंताविषयी अनन्यभाव होणे कठीण आहे. परंतु दुराचारी पुरुष जेव्हा एखाद्या विशिष्ट कारणाने भगवंताला सम्मुख होतो तेव्हा त्याला कोणत्याही शुभ कर्माचा आश्रय नसल्याने केवळ भगवत्परायणतेचेच बळ राहते. हे बळ फार शीघ्र पवित्र करत असते. कारण हे बळ स्वत:चे असते अर्थात् कोणत्याही प्रकारचा आश्रय नसल्याने त्याचा तो स्वत:चा धावा होतो. असा धावा केल्याने भगवान् फारच लवकर द्रवित होतात. असा धावा होण्यास पुण्यात्मा-पापात्मा, विद्वान-मूर्ख, सुजाती-कुजाती, इत्यादीचे असणे कारण नसते तर संसाराकडून संपूर्णपणे निराश होणे हेच मुख्य कारण असते. अशी निराशा प्रत्येक मनुष्याला होऊ शकते.

दुसरी गोष्ट, भगवंताच्या कथनाचे तात्पर्य, दुष्कर्म

* संसृत मूल सूलप्रद नाना। सकल सोक दायक अभिमाना॥ (मानस ७।७४।३)

करणारे पुरुष मला शरण येत नाहीत, कारण त्यांचा स्वभाव माझ्या विपरीत असतो. त्यापैकी जर कोणी मला शरण झाला तर त्याच्यावर प्रीती करण्यासाठी मी सदैव तयार आहे. भगवंताची कृपाळूता इतकी विलक्षण आहे की, भगवंतही आपल्या कृपेला परवश होऊन जीवाचे शीघ्र कल्याण करत असतात. म्हणून येथील आणि तेथील प्रसंगात विरोध नाही, तर यात भगवंताची कृपाळूताच प्रगट होत असते.

सुकृती आणि दुष्कृती* असणे त्यांच्या क्रियेवर अवलंबून नसते तर भगवंताच्या सम्मुख आणि विन्मुख होण्यावर अवलंबून आहे. जो भगवंताला सम्मुख असतो तो सुकृती आणि जो भगवंताला विन्मुख असतो तो दुष्कृती असतो. भगवंताशी सम्मुख होण्याचे जसे माहात्म्य आहे तसे माहात्म्य सकामभावनेने केल्या गेलेल्या यज्ञ, दान, तप, तीर्थ, व्रत इत्यादी शुभ कर्माचे नाही. जरी यज्ञ, दान, तप इत्यादी क्रियाही पवित्र आहेत, परंतु जो आपल्याला संपूर्णपणे अयोग्य समजून आणि आपल्यात कसलीही पवित्रता न पाहून आर्तभावाने भगवंताच्या समोर टाहो फोडतो, त्यावेळी त्याची पवित्रता भगवत्कृपेने फार लवकर होत असते. भगवत्कृपेने होणारी पवित्रता अनेक जन्मात केले गेलेल्या शुभ कर्मापेक्षा फारच विलक्षण असते. त्याच-प्रमाणे शुभ कर्म करणारे सुकृतीही शुभ कर्मांचा आश्रय सोडून जेव्हा भगवंताचा धावा करतात तेव्हा त्यांचाही शुभ कर्मांचा आश्रय न राहता एका भगवंताचाच आश्रय राहत असतो. केवळ भगवंताचाच आश्रय झाल्याने तेही भगवंताचे आवडते भक्त होतात.

एक कृती असते व एक भाव असतो. कृतीत बाहेरची क्रिया होत असते आणि भाव अंत:करणात असतो. भावाच्या पाठीमागे उद्देश असतो आणि उद्देशाच्या पाठीमागे भगवंता-विषयीची अनन्यता असते. ती अनन्यता कृती आणि भाव याहून फार विलक्षण असते, कारण ती स्वत:ची असते. त्या अनन्यतेपुढे कोणताही दुराचार टिकूच शकत नाही. ती अनन्यता दुराचाऱ्याती दुराचाऱ्या पुरुषालाही फार लवकर पवित्र करून टाकते. वास्तविक हा जीव परमात्म्याचा अंश असल्याने पवित्र तर आहेच. केवळ वाईट भाव आणि वाईट वर्तनाचे आचरण झाल्यानेच ह्याचे ठिकाणी अपवित्रता येत असते.

**परिशिष्ट भाव**—जी माणसे भगवंताचा आश्रय घेत नाहीत, ते आसुरी, राक्षसी आणि मोहिनी प्रकृतीचा आश्रय घेणारे असतात. (गीता ९। १२) त्यांची दृष्टी संसाराला (पदार्थ आणि क्रिया यांना) सोडून दुसरीकडे जातच नाही. त्यांच्या दृष्टीत भगवंताची सत्ताच नसते, मग भगवंताला शरण होण्याचा प्रश्नच उद्भवत नाही. भोग भोगणे आणि संग्रह करणे हेच त्यांचे अंतिम ध्येय असते—'**कामोपभोग परमा एतावदिति निश्चिता:**'। (गीता १६। ११) त्यांचे ज्ञान मायाद्वारा आच्छादित झाल्याने ते मायेला वश होतात. मायेला वश झाल्यामुळे ते माया तरूच शकत नाही.

'**माययापहृतज्ञाना:**' पदाचे तात्पर्य हे आहे की, मायेमुळे त्या माणसांची विवेकशक्ती तिरस्कृत झालेली असते. ती माणसे मायेतच बुडलेले राहतात अर्थात् भोग भोगणे आणि संग्रह करणे, शरीराला सजवणे, घर शोभिवंत करणे इत्यादीतच लागून राहतात. ते शरीराला सुख-आराम देणाऱ्या वस्तूंचाच नव-नवीन अविष्कार करीत राहतात आणि त्यालाच विशेष महत्त्व देतात. अशा अनित्य, परिवर्तनशील वस्तूंनाच जाणणारे लोक नित्य, अपरिवर्तनशील तत्त्व कसे जाणतील? कारण त्यांची दृष्टी तिकडे जातच नाही, जाऊ शकतच नाही.

***संबंध**—पूर्व श्लोकात भगवंतांनी म्हटले की, दुष्कर्म करणारे पुरुष मला शरण येत नाहीत तर मग शरण कोण येतात? हे पुढील श्लोकात सांगत आहेत.*

**चतुर्विधा भजन्ते मां जना: सुकृतिनोऽर्जुन।**
**आर्तो जिज्ञासुरर्थार्थी ज्ञानी च भरतर्षभ॥ १६॥**

---

* येथे (७। १५मध्ये) ''दुष्कृतिन:'' म्हणून बहूवचन दिले गेले आहे आणि तेथे (९। ३० मध्ये) ''सुदुराचार:'' म्हणून एक वचन दिले आहे याचे तात्पर्य बहुवचन देणे सामान्य शास्त्र (सामान्य गोष्ट) आहे आणि एक वचन देणे विशेष शास्त्र (विशेष गोष्ट) आहे. जेथे सामान्य आणि विशेष शास्त्राची तुलना होते त्याठिकाणी सामान्य शास्त्रापेक्षा विशेष शास्त्र बलवान होते—''सामान्यशास्त्रो न्यूनं विशेषो बलवान् भवेत्'' म्हणून एकवचन बलवान आहे. दुसरी गोष्ट ज्याला अवकाश मिळत नाही ती विधी बलवान होते—''निरवकाशो विधिरपवाद:'' याचे तात्पर्य, दुष्कृती भगवंताला शरण होत नाहीत हा त्यांचा सामान्य भाव दाखविला परंतु त्यापैकी एखादा एखाद्या कारण विशेषाने भगवंताला शरण गेला तर भगवंताकडून कृपेचा दरवाजा उघडा आहे—

सनमुख होइ जीव मोहि जबही। जन्म कोटि अघ नासहि तबहिं॥ (मानस ५। ४४। १)

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **भरतर्षभ,** | = हे भरतवंशियात श्रेष्ठ अर्जुन! | **आर्त:** | = आर्त, | **चतुर्विधा:** | = चार प्रकारची |
| **अर्जुन** | | **जिज्ञासु:** | = जिज्ञासू | **जना:** | = माणसे |
| **सुकृतिन:** | = पवित्र कर्म करणारे | **च** | = आणि | **माम्** | = माझे |
| **अर्थार्थी** | = अर्थार्थी, | **ज्ञानी** | = ज्ञानी अर्थात् प्रेमी— (ही) | **भजन्ते** | = भजन करतात अर्थात् मला शरण होतात. |

*व्याख्या*— **चतुर्विधा भजन्ते मां जना: सुकृतिनोऽर्जुन**—सुकृती पवित्रात्मा माणसे अर्थात् भगवत्संबंधी काम करणारी माणसे चार प्रकारची असतात. ही चारी प्रकारची माणसे माझे भजन करतात अर्थात् स्वत: मला शरण येतात.

पूर्व श्लोकात "**दुष्कृतिन:**" पदाने भगवंताविषयी आकर्षण नसणाऱ्या मनुष्यांची गोष्ट आली होती. आता येथे "**सुकृतिन:**" पदाने भगवंताकडे आकृष्ट झालेल्या मनुष्या-बद्दल सांगत आहेत. ही सुकृती माणसे शास्त्रीय सकाम पुण्य करणारी नव्हेत, तर भगवंताशी आपला संबंध जोडून भगवत्संबंधी कर्म करणारी आहेत. सुकृती माणसे दोन प्रकारची असतात. एक तर यज्ञ, दान, तप इत्यादी आणि वर्ण आश्रमाचे शास्त्रीय कर्म भगवंतासाठी करतात अथवा ते भगवंताला अर्पण करतात आणि दुसरी भगवन्नामाचा जप तसेच कीर्तन करणे, भगवंताच्या लीला श्रवण करणे आणि सांगणे इत्यादी केवळ भगवत्संबंधी कर्म करत असतात.

ज्यांची भगवंताविषयी आवड झाली आहे तेच भाग्यशाली आहेत, तेच श्रेष्ठ आहेत आणि तेच मनुष्य म्हणविण्याला योग्य आहेत. ती रुची मग एखाद्या पूर्व पुण्याने झालेली असो, संकटाचे वेळी कोणाचाही आधार न मिळाल्याने झालेली असो, एखाद्या विश्वासनीय माणसाकडून प्रसंगी विश्वासघात झाल्यामुळे झालेली असो, किंवा सत्संग, विचार, अथवा स्वाध्याय इत्यादीने झालेली असो. कोणत्याही कारणाने भगवंताविषयी रुची झाली तर ती सर्व माणसे सुकृती म्हणविली जातात.

ज्यावेळी भगवंताविषयी रुची निर्माण होईल तोच काळ, तोच दिवस पवित्र, तोच समय निर्मळ, शुद्ध असतो आणि तीच संपत्ती होय. जर भगवंताविषयी आवड निर्माण झाली नाही तर तोच दुर्दिन आहे, तीच विपत्ती आहे—

**कह हनुमंत बिपति प्रभु सोई। जब तव सुमिरन भजन न होई॥**

(मानस ५। ३२। २)

भगवंतांनी कृपा करून भगवत्प्राप्तीरूपी ज्या उद्देशासाठी मानवशरीर दिले आहे ते "जना:" (जन) म्हणविले जातात. भगवंताचा संकल्प मनुष्यमात्राच्या उद्धारासाठीच झालेला आहे. म्हणून मनुष्यमात्र भगवंताच्या प्राप्तीचा अधिकारी आहे. तात्पर्य त्या संकल्पात भगवंतांनी मनुष्याला आपला उद्धार करून घेण्याचे स्वातंत्र्य दिले आहे, ते स्वातंत्र्य इतर प्राण्यांना नाही, कारण त्या भोगयोनी आहेत आणि हे मानवशरीर कर्मयोनी आहे. वास्तविक केवळ भगवत्प्राप्ती-साठीच असल्याने मानवशरीराला साधनयोनीच मानले पाहिजे. म्हणून या स्वतंत्रतेचा सदुपयोग करून मनुष्याने शास्त्रनिषिद्ध कर्मांचा त्याग करून जर भगवत्प्राप्तीसाठीच प्रयत्नशील राहिले तर त्याला भगवत्कृपेने सहज भगवत्प्राप्ती होऊ शकते. परंतु मिळालेल्या स्वतंत्रतेचा दुरुपयोग करून जे विपरीत मार्गाचे आक्रमण करतात ते नरकाला आणि चौऱ्यांशी लाख योनीला जातात. अशा तऱ्हेने सर्वांच्या उद्धाराचा भाव ठेवून भगवंतांनी कृपा करून जे मानवशरीर दिले आहे त्या शरीराला प्राप्त करून भगवंताचे भजन करणारे सुकृती मनुष्यच "**जना:**" अर्थात् मनुष्य म्हणविण्याला योग्य आहेत.

**आर्तो जिज्ञासुरर्थार्थी ज्ञानी च भरतर्षभ**—अर्थार्थी, आर्त, जिज्ञासू आणि ज्ञानी अर्थात् प्रेमी—हे चार प्रकारचे भक्त भगवंताचे भजन करतात अर्थात् भगवंताला शरण जातात.

(१) "**अर्थार्थीभक्त**"—ज्यांना आपली न्याययुक्त सुख-सुविधेची इच्छा होत असते अर्थात् धन-संपत्ती, वैभव इत्यादीची इच्छा होत असते परंतु ते त्याच्या पूर्ततेची इच्छा भगवंताकडूनच करत असतात, इतरांकडून नव्हे, असे भक्त अर्थार्थी भक्त म्हणविले जातात.

चार प्रकारच्या भक्तांमध्ये अर्थार्थी आरंभिक भक्त असतो. पूर्व संस्कारामुळे त्याला धनाची इच्छा राहते आणि तो धनासाठी प्रयत्न पण करत असतो, परंतु तो असे समजतो की, धनाची इच्छा पूर्ण करणारा भगवंतासमान दुसरा कोणी नाही. असे समजून तो धन प्राप्तीसाठी तत्परतेने भगवन्नामाचे जप-कीर्तन, भगवत्स्वरूपाचे ध्यान इत्यादी करत असतो. धन प्राप्त करण्यासाठी त्याचा भगवंतावरच विश्वास, निष्ठा असते.

ज्याला धनाची इच्छा तर आहे परंतु त्याच्या प्राप्तीसाठी तो सांसारिक उपायांची मदत घेतो आणि कधी कधी धन-प्राप्तीसाठी भगवंताचेही स्मरण करतो तो केवळ अर्थार्थी अर्थात् अर्थाचा भक्त आहे, भगवंताचा भक्त नव्हे. कारण त्याचे ठिकाणी धनाचीच इच्छा मुख्य आहे. परंतु ज्यात भगवंताच्या संबंधाची मुख्यता असते तो क्रमाने भगवंता-

कडेच उत्तरोत्तर आकर्षित होत असतो. भगवंताविषयी आकर्षण असल्याने त्याची धनाची इच्छा थोकडी होते आणि वेळ येताच ती समाप्तही होते. हाच भगवंताचा अर्थार्थी भक्त आहे. यात प्रामुख्याने ध्रुवजींचे नाव घेतले जाते.

एके दिवशी ध्रुव बालकाच्या मनात राजाच्या मांडीवर बसण्याची इच्छा झाली परंतु सावत्रमातेने बसू दिले नाही. तिने ध्रुवाला म्हटले की ''तू भजन केलेले नाहीस, तू अभागी आहेस आणि भाग्यहीन मातेच्या पोटी तू जन्म घेतला आहेस. म्हणून तू राजाच्या मांडीवर बसण्याचा अधिकारी नाहीस'' ध्रुवाने सावत्रमातेने म्हटलेली सर्व हकीकत आपल्या मातेला सांगितली. मातेने म्हटले, ''बाळ, तुझ्या धाकट्या मातोश्रीने तुला जे म्हटले आहे ते योग्य म्हटले आहे कारण तूही भजन केले नाही आणि मीही केले नाही'' यावर ध्रुवाने म्हटले- ''आई, मी तर आता भजन करणार.'' असे म्हणून ते भगवद्भजन करण्यासाठी घराबाहेर पडले आणि मातेनेही मोठ्या धैर्याने ध्रुवाला वनात जाण्याची आज्ञा केली. वाटेने चालताना नारदजी महाराज यांची भेट झाली. नारदजींनी ध्रुवाला म्हटले की ''अरे भोळ्या बालका, तू एकटा कुठे जात आहेस? भगवान् असे लवकर थोडेच मिळतात? तू वनात कुठे राहशील? तेथे मोठ-मोठी जंगली जानावरे राहत असतात. ते तुला खाऊन टाकतील. तेथे तुझी आई थोडीच बसलेली आहे? तू माझ्याबरोबर चल. मी सांगितलेले राजा ऐकतो. मी तुझी आणि तुझ्या आईची व्यवस्था लावून देईल.'' नारदजींच्या वक्तव्याने ध्रुवाची भगवद्भजनांत विशेष दृढता झाली की पहा, भगवंताकडे वाटचाल करण्याने नारदजीही असे बोलतात. आता हे मला घरी परतण्यासाठी म्हणत आहेत परंतु पूर्वी हे कुठे गेले होते? ध्रुवाने नारदांना म्हटले ''महाराज! मी तर आता भगवंताचे भजनच करीन'' ध्रुवाचा असा दृढ निश्चय पाहून नारदांनी त्याला द्वादशाक्षर मंत्र (**ॐ नमो भगवते वासुदेवाय**) दिला आणि चतुर्भुज विष्णूचे ध्यान सांगून मधुवनात जाऊन भजन करण्याची आज्ञा दिली.

ध्रुवाने मधुवनात जाऊन अशा निष्ठेने भजन केले की, त्यांच्या निष्ठेला पाहून सहा महिन्याच्या अवधीतच भगवान् त्यांच्यासमोर प्रगट झाले. भगवंतांनी ध्रुवाला राज्य मिळण्याचे वरदान दिले. परंतु या वरदानाने ध्रुवाला विशेष समाधान झाले नाही. भजनाने अंत:करण शुद्ध झाल्याने त्यांना धनासाठी (राज्य) भगवंताचे भजन केले त्याबद्दल लाज वाटली की, आपण फार मोठी चूक केली.

तात्पर्य ध्रुवाला तर पूर्वी राजाच्या मांडीवर बसण्याची इच्छा झाली होती परंतु त्यांनी या इच्छेच्या पूर्तीचा मुख्य उपाय भगवंताचे भजनच मानले. भजन केल्याने त्यांना राज्य मिळाले आणि इच्छा समाप्त झाली. अशा प्रकारे अर्थार्थी भक्त केवळ भगवंताकडेच ओढला जातो.

आजकाल धन प्राप्तीसाठी खोटेपणा, कपट, बेईमानी इत्यादी जे लोक करतात तेही धनासाठी वेळोवेळी भगवंताला साकडे घालतात. ते अर्थार्थी तर आहेत पण भक्त नव्हेत. ते तर खोटेपणा, कपट, बेईमानीचे भक्त आहेत. कारण त्यांचा ''पापाशिवाय, खोटेपणा-कपट या-शिवाय काम होत नाही'', अशा रीतीने खोटेपणा, कपट इत्यादीवर जितका विश्वास असतो तितका विश्वास भगवंतावर नसतो.

जे केवळ भगवत्परायण आहेत आणि जे भगवंताशी आत्मीयता ठेवून भगवंताचेच भजन करतात. परंतु कधी कधी पूर्व संस्कारामुळे अथवा अन्य कोण्या कारणाने ज्यांना आपले शरीर इत्यादीसाठी अनुकूल परिस्थितीची इच्छा होते तेही अर्थार्थी भक्त म्हणविले जातात. त्यांची अनुकूलतेची इच्छा हीच अर्थार्थीपणा आहे.

**(२) आर्त भक्त**—प्राणसंकट ओढवल्यावर, भयंकर आपत्ती कोसळल्यावर, मनाच्या प्रतिकूल घटना घडली तर जे दु:खी होऊन आपले दु:ख दूर करण्यासाठी भगवंताचा धावा करतात आणि दु:ख दूर करणे, केवळ भगवंता-कडूनच इच्छितात. दुसऱ्या कोणत्याही उपायांचा अवलंब करीत नाहीत, ते आर्त भक्त म्हणविले जातात. आर्त भक्तात उत्तरेचा दृष्टांत घेणे योग्य आहे.* कारण जेव्हा तिच्यावर संकट ओढवले तेव्हा तिने भगवंताशिवाय इतर कोणत्या

* आर्त भक्तात द्रौपदी आणि गजेंद्राचा दृष्टांत योग्य बसत नाही कारण त्यांनी आपल्या संरक्षणासाठी अन्य उपायांचाही आश्रय घेतला होता, केवळ भगवंताचाच नव्हे. जोपर्यंत आपले दु:ख दूर करण्यासाठी अन्य उपायांचा आश्रय घेतला जातो, अन्य उपायाकडे वृत्ती धावते तोपर्यंत ते अनन्यभक्त नव्हेत आणि तोपर्यंतच त्यांना कष्ट होतात. जेव्हा अन्याकडील दृष्टी नष्ट होते तेव्हा ते भक्त म्हणविले जातात आणि त्यांना कष्ट होत नाहीत. जसे वस्त्र-हरणाचे वेळी जोपर्यंत द्रौपदीची दुसऱ्यांकडे दृष्टी होती, दुसऱ्यांचा भरवसा होता, आपल्या शक्तीचा आश्रय होता तोपर्यंत तिला कष्ट होत राहिले. परंतु जेव्हा, दुसऱ्यांकडे पाहण्याचे तर राहू द्या, स्वत: च्या हाताने साडीलाही धरले नाही अर्थात् आपल्या शक्तीचाही आश्रय घेतला नाही तेव्हा तिचा अनन्यभाव झाला आणि तिला दु:ख सहन करावे लागले नाही. तसेच गजेंद्राने जोपर्यंत हत्ती आणि हत्तिणी यांचा आश्रय घेतला होता, आपल्या शक्तीचा आश्रय घेतला होता, तोपर्यंत तो अनेक वर्षे दु:ख सोसत राहिला. जेव्हा सर्व आश्रय सुटला केवळ भगवंताचा आश्रय घेतला तेव्हा त्याला दु:ख सोसावे लागले नाही.

उपायांचा आश्रय घेतला नाही. इतर उपायांकडे तिची दृष्टीच गेली नाही. तिने केवळ भगवंताचाच आश्रय घेतला. *तात्पर्य सकामभाव राहिला तरीही आर्त भक्त त्याची पूर्ती केवळ भगवंताकडूनच इच्छितात.

जे भगवंताशी आपुलकी ठेवून भगवत्परायण असतात आणि अनुकूलतेची तशी इच्छा ठेवीत नाहीत परंतु प्रतिकूल परिस्थिती प्राप्त झाली तर इच्छा होत असते की, भगवंतांनी असे का केले? ''ही प्रतिकूलता समाप्त झाली तर बरे होईल'' अशा रीतीने प्रतिकूलता समाप्त करण्याचा भाव उत्पन्न झाल्याने तेही आर्त भक्त म्हणविले जातात.

**(३) जिज्ञासु भक्त**—ज्यांचे ठिकाणी आपल्या स्वरूपाला, भगवत्तत्त्वाला जाणून घेण्याची तीव्र इच्छा जागृत होत असते की, वास्तविक माझे काय स्वरूप आहे? भगवत्तत्त्व काय आहे? अशा प्रकारे तत्त्वाला जाणून घेण्यासाठी शास्त्र, गुरू अथवा पुरूषार्थाचाही (श्रवण, मनन, निदिध्यासन इत्यादी उपाय) आश्रय न घेता केवळ भगवंताच्या आश्रित होऊन त्या तत्त्वाला केवळ भगवंताकडूनच जे जाणून घेऊ इच्छितात ते जिज्ञासू भक्त म्हणविले जातात.

जिज्ञासू भक्त तोच असतो ज्याचे जिज्ञास्य केवळ भगवत्तत्त्व आणि उपाय केवळ भगवद्भक्ती हीच असते अर्थात् उपेय आणि उपाय यात अनन्यता असते.

जिज्ञासु भक्तात उद्धवजी यांचे नाव घेतले जाते. भगवंतांनी उद्धवजी यांना दिव्य ज्ञानाचा उपदेश दिला होता जो उद्धवगीता (श्रीमद्भा० ११।७-३०) या नावाने प्रसिद्ध आहे.

जे भगवंताचे ठिकाणी आत्मीयता करून भगवंताच्या भजनातच तल्लीन राहतात, परंतु कधी कधी संगतीने, संस्काराने मनात हा भाव उत्पन्न होतो की, वास्तविक माझे स्वरूप काय आहे? भगवत्तत्त्व काय आहे? तेही जिज्ञासू म्हणविले जातात.

**(४) ज्ञानी (प्रेमी) भक्त**—अर्थार्थी, आर्त आणि जिज्ञासू—तिन्ही भक्ताहून ज्ञानी भक्ताची विलक्षणता दाखविण्यासाठी येथे ''च'' अव्यय आले आहे.

ज्ञानी भक्ताला अनुकूलतेत अनुकूल आणि प्रतिकूलतेत प्रतिकूल परिस्थिती, घटना, व्यक्ती, वस्तू इत्यादी सर्व भगवत्स्वरूपच दिसतात अर्थात् त्याला अनुकूल-प्रतिकूल परिस्थिती केवळ भगवंताची लीलाच दिसत असते. जसे भगवंताला आपल्यासाठी अनुकूलता प्राप्त करण्याची, प्रतिकूलता नष्ट करण्याची, बोध प्राप्त करण्याची इत्यादी कोणत्याही प्रकारची कधीही किंचिन्मात्रही इच्छा उत्पन्न होत नाही. ते तर केवळ भक्तांच्या प्रेमामध्येच मस्त राहतात, तसेच ज्ञानी (प्रेमी) भक्ताला किंचिन्मात्रही कोणती इच्छा नसते, ते केवळ भगवंताच्या प्रेमामध्येच मस्त राहतात.

ज्ञानी अर्थात् प्रेमी भक्तात गोपींचे नाव प्रसिद्ध आहे. देवर्षी नारद यांनीही ''**यथा व्रजगोपिकानाम्**'' (भक्तिसूत्र २१) म्हणून गोपींना प्रेमीभक्तांचे आदर्श मानले आहे. कारण गोपींच्या ठिकाणी स्वत:च्या सुखाचा संपूर्णपणे त्याग होता. प्रियतम भगवंताचे सुखच त्यांचे सुख होते.

या ठिकाणी एक गोष्ट समजून घेण्याची आहे की, धनाची इच्छा, दु:ख दूर करण्याची इच्छा आणि जिज्ञासापूर्तीची इच्छा यांच्या अनुषंगाने जे भगवंताकडे आकृष्ट होतात त्यांचे ठिकाणी तर भगवंताचे प्रेम जागृत होते आणि ते भक्त म्हणविले जातात. परंतु ज्यांची ही भावना असते की, इतर उपायांनी धन मिळू शकते, दु:ख दूर होऊ शकते, जिज्ञासा-पूर्ती होऊ शकते, त्यांचा भगवंताशी संबंध नसल्याने त्यांचे ठिकामी प्रेम जागृत होत नाही आणि त्यांना भक्त ही संज्ञा लागू होत नाही.

संताच्या वाणीत असे येते की, प्रेम तर केवळ भगवान्च करतात, भक्त केवळ भगवंताचे ठिकाणी आत्मीयता करतात. कारण प्रेम तोच करतो ज्याला कधी कोणाकडून कधीही, काहीही घेण्याची इच्छा नसते. भगवंतांनी स्वत: आपल्याला संपूर्ण जीवांना अर्पण करून टाकले आहे आणि जीवापासून कधी काहीही प्राप्त करण्याची कोणतीही संभावना ठेवली नाही. म्हणून भगवंतच वास्तविक प्रेम करत असतात. जीवाला भगवंताची आवश्यकता आहे म्हणून जीव भगवंताशी आपलेपणच करत असतो. जेव्हा स्वत: आपल्याला संपूर्णपणे भगवंताला अर्पित झाल्यावर भक्तात कधीही, काहीही, मिळविण्याची कोणतीही अभिलाषा राहत नाही तेव्हा तो ज्ञानी अर्थात् प्रेमी भक्त म्हणविला जातो. स्वत: आपल्याला संपूर्णपणे भगवंताला अर्पण करून टाकल्याने त्या भक्ताची सत्ता

---

* पाहि पाहि महायोगिन् देवदेव जगत्पते। नान्यं त्वदभयं पश्ये यत्र मृत्यु: परस्परम्॥
अभिद्रवति मामीश शरस्तप्तायसो विभो। कामं दहतु मां नाथ मा मे गर्भो निपात्यताम्॥

(श्रीमद्भा० १।८।९-१०)

''देवाधिदेव! जगदीश्वर! महायोगिन! आपण माझे रक्षण करा, रक्षण करा आपल्याशिवाय या लोकी मला अभय देणारा दुसरा कोणी नाही. कारण येथे सर्व आपसात एकमेकाला मृत्यूचे कारण होत आहेत. हे प्रभो, सर्वशक्तिमान् हा जळत येणारा लोखडांचा बाण माझ्याकडे जोरात येत आहे. स्वामी, ह्याने मला जाळून टाकले तरी चालेल पण माझा गर्भ नष्ट करू नये.''

भगवंतापासून किंचिन्मात्रही वेगळी राहत नाही. तर त्याचे ठिकाणी केवळ भगवंताची सत्ताच राहत असते.

## विशेष गोष्ट

(१) चार मुले खेळत होती. इतक्यात त्यांचे वडील चार आंबे घेऊन आले. त्यांना पाहताच एक मुलगा आंबा मागू लागला आणि एक मुलगा आंबा घेण्यासाठी रडू लागला. वडिलांनी त्यांना एक एक आंबा देऊन टाकला. तीसरा मुलगा आंबा मागतही नाही आणि रडतही नाही, केवळ आंब्याकडे पाहत राहतो आणि चौथा मुलगा आंब्याकडे न पाहता जसे पूर्वी खेळत होता त्याच मस्तीत तो खेळत असतो. त्या दोघांनाही वडिलांनी एक एक आंबा देऊन टाकला. अशा प्रकारे चारीही मुलांना आंबा मिळत असतो. याठिकाणी आंबा मागणारा मुलगा अर्थार्थी असतो, रडणारा मुलगा आर्त असतो, केवळ आंब्याकडे पाहणारा जिज्ञासू आहे आणि आंब्याची परवा न करता खेळात मग्न असलेला मुलगा ज्ञानी आहे. तसेच अथार्थी भक्त भगवंताकडून अनुकूलता मागतो, आर्त भक्त भगवंताकडून प्रतिकूलता दूर करवू इच्छितो, जिज्ञासू भक्त भगवंताला जाणून घेऊ इच्छितो आणि ज्ञानी अर्थात् प्रेमी भक्त भगवंताकडून कशाचीही इच्छा ठेवीत नाही.

अर्थार्थी, आर्त, जिज्ञासू आणि ज्ञानी—हे चारीही भक्त भगवन्निष्ट आहेत. म्हणून यांना योगभ्रष्ट पुरुषांत (६।४१-४२) घेतले जाऊ शकत नाही. तसेच अर्थार्थी आणि आर्त—हे दोघेही सकाम पुरुषापेक्षा वेगळे आहेत कारण या दोघामध्ये भगवंताचा आश्रय मुख्य आहे. सकाम पुरुष कामनापूर्तीतच व्यस्त राहण्यामुळे "**हृतज्ञानाः**" आहेत (७।२०) म्हणून त्यांना आसुरी संपत्तिधारक पुरुषामध्ये घेतले गेले आहे. जरी अर्थार्थी इत्यादी भक्तांत जी काही न्यूनाधिकता आहे ती कामनेमुळेच आहे परंतु कामना असतानाही ते "**हृतज्ञानाः**" नव्हेत. त्यांना भगवंतांनी "**सुकृतिनः**" आणि "**उदाराः**" (७।१८) म्हटले आहे.

जे भगवंताला शरण जातात त्यांचे ठिकाणी सकाम भावही असू शकतो. परंतु त्यांच्यात मुख्यता भगवन्निष्ठ होण्याचीच असते. म्हणून त्यांची भगवंताशी जितकी-जितकी घनिष्ठता होत जाते तितका-तितकाच त्यांच्यातला सकामभाव समाप्त होत जातो आणि विलक्षणता उत्पन्न होते. म्हणून त्यांना भगवंतांनी "**उदाराः**" म्हटले आहे आणि ज्ञानी भक्त हे आपले स्वरूप सांगितले आहे "**ज्ञानी त्वात्मैव मे मतम्**" (७।१८)

(२) भगवंताशी आपलेपण मानण्यासारखे दुसरे कोणतेही साधन नाही, कोणती योग्यता नाही, कोणते बल नाही, कोणती अधिकारिता नाही. भगवंताची आत्मीयता प्राणीमात्रावर नेहमीच असते आणि नेहमीच राहील. त्या आत्मीयतेला फक्त प्राणीच विसरून गेला आहे आणि त्याने चुकीने संसाराशी आत्मीयता मानली आहे. म्हणून ही चुकीने केलेली आत्मीयता समाप्त करायची आहे आणि भगवंताशी जी स्वतःसिद्ध आत्मीयता आहे त्याला मानावयाचे आहे. भगवंताला आपले मानण्यासाठी मन, बुद्धी इत्यादी कशाचीही साहाय्यता घ्यावी लागत नाही. परंतु दुसऱ्या साधनांत मन, बुद्धी इत्यादीची साहाय्यता घ्यावी लागते.

भगवंताशी आत्मीयता झाल्यावर अर्थात् "मी केवळ भगवंताचा आहे आणि केवळ भगवान्‌च माझे आहेत" असे दृढतेने मानल्यावर साधक भक्ताला आपले म्हणविणाऱ्या अंतःकरणात भावांची, गुणांची कमीही दिसू शकते परंतु भगवंताशी आत्मीयता झाल्यामुळे ती टिकणार नाही. दुसरी गोष्ट, साधक भक्तात काही गुणांची कमी असतानाही भगवंताची दृष्टी केवळ आपुलकीवरच जात असते, गुणांच्या उणीवेवर नव्हे. कारण भगवंताशी जी आपली आत्मीयता आहे ती वास्तविक आहे.

भगवंताची आत्मीयता तर दुष्टाती दुष्ट मनुष्याशीही तशीच असते. म्हणून सोळाव्या अध्यायात आसुरी प्रकृति-धारकांचे वर्णन करताना भगवान् म्हणतात की, "क्रूर, द्वेष करणारे, नराधम, दुष्टांना मी आसुरी योनीत ढकलतो." अशा प्रकारे भगवान् त्यांना आसुरी योनीत जन्माला घालून शुद्ध करतात. जसे माता आपल्या मुलाला त्याच्या सम्मतीशिवाय स्नान घालून शुद्ध करते त्याप्रमाणे त्यांना शुद्ध करण्यासाठी भगवान् त्यांची सम्मती घेत नाहीत कारण त्यांच्याशी भगवंताची आत्मीयता असते.

भगवंताशी आत्मीयतेचा संबंध पूर्वीपासूनच आहे इतक्यावरही कोणती कामना उत्पन्न झाली तरी भक्ताचा भगवंताशी आपलेपणाचा संबंध मुख्य असतो आणि कामना गौण असते. या दृष्टीने हे भक्त प्रथम श्रेणीचे आहेत.

भगवंताचा संबंध तर पूर्वीपासूनच आहे परंतु वेळो-वेळी कामना उत्पन्न होत असते, जिच्या पूर्तीची इच्छा इतरा-कडून केली जाते. जेव्हा इतराकडून कामनेची पूर्ती होत नाही तेव्हा शेवटी भगवंताकडून पूर्तीची इच्छा करतात. याप्रमाणे अनन्यतेत कमी असल्याकारणाने हे भक्त दुसऱ्या श्रेणीचे असतात.

ज्यावेळी केवळ कामना पूर्तीसाठीच भगवंताशी आत्मीयतेचा संबंध केला जातो तेव्हा कामना मुख्य असते आणि भगवंताचा संबंध गौण असतो. या दृष्टीने हे भक्त तीसऱ्या श्रेणीचे आहेत.

### मार्मिक गोष्ट

कामना दोन प्रकारची असते (१) पारमार्थिक (२) लौकिक.

**(१) पारमार्थिक कामना**—पारमार्थिक कामना दोन प्रकारची असते. मुक्तीची (कल्याणाची) आणि भक्तीची (भगवत्प्रेमाची).

जी मुक्तीची कामना असते त्यात तत्त्व जाणण्याची इच्छा असते, जिला जिज्ञासा म्हणतात. ही जिज्ञासा ज्याचे ठिकाणी असते तो जिज्ञासू असतो. सखोल विचार केला तर जिज्ञासा कामना नव्हे. कारण तो आपल्या स्वरूपाला अर्थात् तत्त्वाला जाणू इच्छितो, जी वास्तविक त्याची आवश्यकता असते. आवश्यकता तिला म्हणतात जी अवश्य पूर्ण होत असते आणि पूर्ण झाल्यावर पुन: दुसरी आवश्यकता उत्पन्न होत नाही.* ही आवश्यकता सत् विषयाची असते.

दुसरी कामना भगवंताच्या प्रेमप्राप्तीची असते त्याला प्राप्ती तर म्हणतात परंतु ती प्राप्ती आपल्यासाठी नसते तर भगवंतासाठीच असते. त्यात आपले थोडेही प्रयोजन राहत नाही, भगवंताला समर्पित होण्याचेच प्रयोजन असते. प्रेमी तर स्वत: आपल्याला भगवंताला समर्पित करत असतो जो त्यांचाच अंश असतो.†

उपर्युक्त दोन्हीही पारमार्थिक कामना वास्तविक ''कामना'' नव्हेत.

**(२) लौकिक कामना**—लौकिक कामना ही दोन प्रकारची असते. सुख प्राप्त करण्याची आणि दु:ख निवृत्त करण्याची.

शरीराला आराम मिळावा, जिवंतपणी आपला आदर-सत्कार व्हावा आणि मेल्यानंतर आपले नाव अमर रहावे, माझे स्मारक तयार व्हावे, एखादा ग्रंथ आपल्याकडून तयार व्हावा, ज्याला लोकांनी पहावे, वाचावे आणि समजून घ्यावे की, हा एक कोणी विलक्षण पुरुष होऊन गेला आहे, मेल्यानंतर स्वर्ग इत्यादीतील भोग भोगत रहावे इत्यादी-इत्यादी, लौकिक सुख प्राप्तीच्या कामना असतात. अशा कामनेने तर वासनाच वाढत जातात ज्यामुळे बंधन आणि पतन होत असते, उद्धार होत नाही. ही कामना आसुरी संपत्ती असते म्हणून ही कामना त्याज्य आहे.

दुसरी कामना दु:ख दूर करण्याची असते. दु:ख तीन प्रकारची आहेत. आधिदैविक, आधिभौतिक आणि आध्यात्मिक.

अतिवृष्टी, अनावृष्टी, सरदी-गरमी, वायूपासून जे दु:ख होते, त्यांना ''आधिदैविक'' म्हणतात. हे दु:ख देवतांच्या अधिकारानुसार होत असते.

सिंह, साप, चोर, इत्यादी प्राण्याकडून जे दु:ख होते त्याला ''आधिभौतिक'' म्हणतात.

शरीर आणि अंत:करण (मन, बुद्धी, चित्त, अहंकार) याला जे दु:ख होत असते त्याला ''आध्यात्मिक'' म्हणतात.‡

या दु:खांना दूर करण्याविषयी आणि सुख प्राप्त करण्याविषयी जी कामना उत्पन्न होत असते, ती सर्वथा निरर्थक असते. कारण त्या कामनेची पूर्ती होत नाही. पूर्ती झाली तरी दुसरी नवीन कामना उत्पन्न होत असते आणि शेवटी अपूर्तीच शिल्लक राहते. म्हणून या दोन्ही कामानांची पूर्ती कोण्याही मनुष्याची कधीही झाली नाही, होत नाही आणि भविष्यात पूर्ण होणारी नाही.

**परिशिष्ट भाव**—चौदाव्या श्लोकात भगवंतांनी म्हटले होते की, मला शरण होणारे भक्त गुणमयी मायेला तरून जातात. ते शरण होणारे भक्त कोण आहेत—ही गोष्ट आता या श्लोकात सांगतात.

---

* कामना तिला म्हणतात जी कधी पूर्ण होत नाही. एक कामना पूर्ण झाली असता दुसरी कामना उत्पन्न होत असते. जसे धनाची कामना झाली. जितके धन हवे होते तितके मिळाले तर मग त्यापेक्षा अधिक धनाची कामना होते. धनाप्रमाणेच मान-प्रतिष्ठा, जगण्याची, भोगण्याची, निरोगता, यश-कीर्ती, स्त्री-पुत्र इत्यादी इत्यादी उत्पत्ति-विनाशशील वस्तूंची कामना उत्पन्न होत असते. ह्या धनादी वस्तू आपल्या नव्हेत कारण यापैकी कोणतीही वस्तू स्वत:पर्यंत पोहचत नाही. यांची कामनापूर्ती केवळ शरीर आणि नावापर्यंतच पोहचते. कामना असत् विषयांची होत असते. कामनापूर्तीनंतर पुन: दुसरी कामना उत्पन्न होते. अशा प्रकारे अपूर्तीच शिल्लक राहते. म्हणून कामना त्याज्य आहे कारण ह्या वस्तू तर राहणार नाहीत आणि त्यांच्या प्राप्तीसाठी केलेली कामना आणि प्रयत्न हे दोन्हीही निष्फळ होतील.

† मुक्तीपेक्षा भक्तीची कामना श्रेष्ठ आहे कारण मुक्तीत स्वत: मुक्त होऊ इच्छितो आणि भक्तीत भगवंताला समर्पित होऊ इच्छितो तात्पर्य, मुक्तीत घेण्याची इच्छा आणि भक्तीत देण्याची इच्छा असते म्हणून मुक्तीत सूक्ष्म अहम् राहत असतो परंतु भक्तीत अहम् मुळीच राहत नाही.

‡ आध्यात्मिक दु:खाचे दोन प्रकार आहेत. आधी आणि व्याधी. मनाची चिंता ''आधी'' आहे आणि शरीराचा रोग ''व्याधी'' आहे. आधी ही दोन प्रकारची असते-(१) वेडेपणा (२) चिंता, शोक, भय, उद्वेग इत्यादी. वेडेपणा तर प्रारब्धाने येत असतो आणि चिंता, शोक इत्यादी अज्ञानाने होतात. ज्ञान झाल्यावर चिंता शोक इत्यादी तर समाप्त होतात परंतु वेडेपणा प्रारब्धानुसार होऊ शकतो.

पूर्व श्लोकात 'दुष्कृती' माणसांची आणि या श्लोकात 'सुकृती' माणसांची गोष्ट आली आहे. जे आपल्यापासून वेगळे आहे त्या संसाराला आपले मानणे सर्वात मोठे दुष्कृत अर्थात् पाप आहे आणि जे आपल्याशी अभिन्न आहे, त्या भगवंताला आपले मानणे सर्वात मोठे सुकृत अर्थात् पुण्य आहे. म्हणून जे संसाराला आपले मानतात ते दुष्कृती आहेत आणि जे भगवंताला आपले मानतात ते सुकृती आहेत.

भोगी माणूस भगवंतात लागत नाही म्हणून 'अर्थार्थी' तर भगवंताचा भक्त होऊ शकतो. परंतु 'भोगार्थी' भगवंताचा भक्त होऊ शकत नाही. कारण भोगार्थीत संसाराची अधिक लिप्तता असते आणि अर्थार्थीत लिप्तता कमी असते आणि भगवंताची मुख्यता असते.

काही अंशात भगवंताशिवाय दुसऱ्या सत्तेची मान्यता असल्यामुळेच भक्त अर्थार्थी, आर्त अथवा जिज्ञासू असतो. जर दुसऱ्या सत्तेची मान्यता सर्वथा नसेल तर तो ज्ञानी (प्रेमी) होतो. तात्पर्य हे आहे की, भगवंताशिवाय दुसरी सत्ता मानल्यानेच हे चार भेद होतात. वास्तविक एका भगवंताच्या सत्तेशिवाय दुसरी सत्ता संभवतच नाही.

जो विज्ञानासहित ज्ञानाला अर्थात् परमात्म्यच्या समग्ररूपाला जाणू इच्छितो, तो 'जिज्ञासू' आहे. जिज्ञासू भगवंताच्या ऐश्वर्य, प्रभाव, सामर्थ्य यांना जाणू इच्छितो. म्हणून भगवंताच्या लीला-कथेमध्ये त्याला विशेष रस येतो. भगवंताने 'मुमुक्षू' पद न देता 'जिज्ञासू' पद दिले आहे. कारण 'मुमुक्षू' तर केवळ तत्त्वज्ञान इच्छिणाराच होऊ शकतो. परंतु जिज्ञासू ज्ञान इच्छिणाराही होऊ शकतो आणि भक्ती इच्छिणाराही! मुमुक्षूत आपल्या कल्याणाची गोष्ट मुख्य असते आणि जिज्ञासू भक्तात स्वत:ला भगवंताना अर्पित करण्याची गोष्ट मुख्य असते. मुमुक्षूला ब्रह्माचे ज्ञान होते आणि जिज्ञासू भक्ताला '**वासुदेवः सर्वम्**' चे ज्ञान होते. तत्त्वज्ञान्याला तर ब्रह्माचे ज्ञान होते परंतु भक्ताला समग्राचे ज्ञान होते! (गीता ७। २९-३०)

अर्थार्थी, आर्त अणि जिज्ञासू यांच्यात क्रमाने संसाराचा संबंध घटत जातो आणि परमात्म्याचा संबंध वाढत जातो. जोपर्यंत जीव जगताला धारण केलेला राहतो तोपर्यंतच अर्थार्थी, आर्त आणि जिज्ञासू राहतात. जेव्हा तो जगताला धारण करीत नाही तेव्हा केवळ 'ज्ञानी' राहतो.

ज्या भक्ताला 'सर्व काही वासुदेवच आहे'—अशा प्रकारचे परमात्म्याच्या समग्ररूपाचे ज्ञान झाले आहे, त्याला येथे '**ज्ञानी**' म्हटले गेले आहे. याच ज्ञानी भक्ताला पुढे एकोणीसाव्या श्लोकात '**ज्ञानवान्**' म्हटले गेले आहे.

अर्थार्थी प्राप्त परिस्थितीत संतोष न करून धन इच्छितो. 'आर्त' प्राप्त परिस्थितीत तर संतोष करतो परंतु दु:ख प्राप्त झाल्यावर त्याला दु:ख सहन होत नाही. 'अर्थार्थी' यात अर्थाची मुख्यता नसते, तर भगवंताची मुख्यता असते. त्यात धनाची इच्छा तर राहते परंतु ती इच्छा तो केवळ भगवंताकडूनच पूर्ण करू इच्छितो. कारण भगवंतात कोणती कमी नाही. अपरा-प्रकृती आहे तर भगवंताचीच! 'आर्त' ही आपले दु:ख केवळ भगवंताकडूनच दूर करू इच्छितो. 'जिज्ञासू' ही केवळ भगवंताकडूनच आपल्या जिज्ञासेची पूर्ती करू इच्छितो. परंतु जेव्हा भक्तात अशी उत्कट अभिलाषा राहते की, 'मला तर केवळ भगवंतच आवडावे' तेव्हा त्याच्यात अर्थार्थीपणा, आर्तपणा आणि जिज्ञासूपणा राहत नाही आणि तो ज्ञानी अर्थात् प्रेमी होतो.

'अर्थार्थी' चा तर अर्थाशी निरंतर संबंध राहतो, कारण अर्थाची वासना नेहमी राहते. परंतु 'आर्त' चा दु:खाशी निरंतर संबंध राहत नाही, कारण दु:ख नेहमी नसते. 'जिज्ञासू' ला सुख-दु:खाची परवा नसते. म्हणून तो सुख प्राप्तीचीही इच्छा करीत नाही आणि दु:ख निवृत्तीचीही इच्छा करीत नाही. अर्थार्थी आणि आर्त—दोन्ही जिज्ञासू होऊन ज्ञानी होतात.

'अर्थार्थी' भक्ताला जेव्हा अर्थ प्राप्त होतो, तेव्हा त्याला आपल्या चुकीचा पश्चात्ताप होतो. जसे—ध्रुवजींना राज्य मिळाल्यावर पश्चात्ताप झाला. परंतु 'आर्त' भक्ताला तितका पश्चात्ताप होत नाही, तर त्याच्यात हा भाव राहतो की, भगवान दु:ख निवृत्त करणारे आहेत. जसे—द्रौपदी आणि गजेंद्र यांचे रक्षण झाल्यावर त्यांना पश्चात्ताप झाला नाही, तर त्यांची वृत्ती भगवंताकडेच राहिली. 'आर्त' भक्त आलेल्या दु:खाला सहन करू शकत नाही—ही त्याची कमजोरी आहे.

'जिज्ञासू' भक्तात भगवंताच्या समग्ररूपाला जाणण्याची उणीव राहते. त्याला मुक्ती, तत्त्वज्ञान झाल्यावरही संतोष होत नाही, तर त्यात प्रेम प्राप्तीची भूक राहते. परंतु 'ज्ञानी' भक्ताच्या दृष्टीत एका वासुदेवाशिवाय दुसरी सत्ता किंचिन्मात्रही नसते. मग त्याच्यात कोणती उणीव कशी राहू शकते? म्हणून भगवंताने ज्ञानी भक्ताला आपले स्वरूप म्हटले आहे—'**ज्ञानी त्वात्मैव मे मतम्**'। (गीता ७। १८)

***संबंध***—*पूर्व श्लोकात वर्णन केलेल्या चारी भक्तांपैकी ज्ञानी भक्ताच्या विशेषतेचे वर्णन विस्ताराने पुढील श्लोकात करत आहेत.*

**तेषां ज्ञानी नित्ययुक्त एकभक्तिर्विशिष्यते।**
**प्रियो हि ज्ञानिनोऽत्यर्थमहं स च मम प्रियः॥ १७॥**

| | |
|---|---|
| **तेषाम्** | = त्या चार भक्तात |
| **नित्ययुक्तः** | = माझ्यात निरंतर लागलेला |
| **एकभक्तिः** | = अनन्य भक्तियुक्त |
| **ज्ञानी** | = ज्ञानी अर्थात् प्रेमी भक्त |
| **विशिष्यते** | = श्रेष्ठ आहे |
| **हि** | = कारण |
| **ज्ञानिनः** | = ज्ञानी भक्ताला |
| **अहम्** | = मी |
| **अत्यर्थम्** | = अत्यंत |
| **प्रियः** | = प्रिय आहे |
| **च** | = आणि |
| **सः** | = तो |
| **मम** | = मला |
| **प्रियः** | = (अत्यंत) प्रिय आहे. |

*व्याख्या*— **तेषां ज्ञानी नित्ययुक्तः**—त्या (अर्थार्थी, आर्त, जिज्ञासू आणि ज्ञानी) भक्तांपैकी ज्ञानी अर्थात् प्रेमी भक्त श्रेष्ठ आहे कारण तो नित्ययुक्त असतो. अर्थात् तो सदा-सर्वदा केवळ भगवंतातच मग्न असतो. भगवंताशिवाय तो कुठेही किंचिन्मात्रही रममाण होत नाही. जशा गोपी गायीची धार काढताना, दही घुसळताना, साळी कुटताना, इत्यादी सर्व लौकिक कार्य करत असतानाही भगवान् श्रीकृष्णाच्या ठिकाणी चित्त ठेवणाऱ्या होत्या* तसेच तो ज्ञानी भक्त लौकिक आणि पारमार्थिक क्रिया करताना सदा-सर्वदा भगवंताशी चिकटलेला असतो. भगवंताचा संबंध ठेवूनच त्याच्या सर्व क्रिया होत असतात.

**एकभक्तिर्विशिष्यते**—त्या ज्ञानी अर्थात् प्रेमी भक्ताचे आकर्षण केवळ भगवंताचे ठिकाणी असते. त्याची आपली कोणती व्यक्तिगत इच्छा नसते. म्हणून तो श्रेष्ठ आहे.

अर्थार्थी इत्यादी भक्तांचे ठिकाणी पूर्व संस्कारामुळे जोपर्यंत व्यक्तिगत इच्छा उत्पन्न होत राहतात तोपर्यंत त्यांची एकभक्ती नसते अर्थात् केवळ भगवंतात प्रेम नसते. परंतु त्या भक्तांत ह्या इच्छांना नष्ट करण्याविषयींचा भावही होत राहतो आणि इच्छा संपूर्णपणे नष्ट झाल्यावर सर्व भक्त भगवंताचे प्रेमी आणि भगवंताचे प्रेमास्पद होतात. त्यावेळी भक्त आणि भगवंत यात द्वैताचा भाव न राहता प्रेमाद्वैत (प्रेमात अद्वैत) होत असते.

तसे पाहिले तर चारही भक्त भगवंतात नित्य निरंतर मग्न असतात. परंतु तीन भक्तांच्या अंतःकरणात काही ना काही व्यक्तिगत इच्छा राहत असते. जसे अर्थार्थी भक्त अनुकूलतेची इच्छा करत असतात, आर्त भक्त प्रतिकूलता समाप्त करण्याची इच्छा करत असतात आणि जिज्ञासू भक्त आपल्या स्वरूपाला अथवा भगवत्तत्त्वाला जाणून घेण्याची इच्छा करत असतात. ज्ञानी अर्थात् प्रेमी भक्तात आपली स्वतः-ची कोणतीही इच्छा राहत नाही. म्हणून तो एकभक्ती आहे.

**प्रियो हि ज्ञानिनोऽत्यर्थमहं स च मम प्रियः**—त्या ज्ञानी (प्रेमी) भक्ताला मी अत्यंत प्रिय असतो. त्याचे ठिकाणी आपली स्वतःची थोडीही इच्छा नसते. केवळ माझ्या ठिकाणीच प्रेम असते. म्हणून तो मला अत्यंत आवडतो.

वास्तविक तर भगवंताचा अंश असल्याने सर्व जीव स्वाभाविकच भगवंताचे आवडते आहेत. भगवंताच्या प्रीतीमध्ये त्यांचा कोणता स्वतःचा स्वार्थ नसतो. जसे माता आपल्या मुलाचे पालन करत असते तसेच भगवान् कोणत्याही कारणाशिवाय सर्वांचे पालन-पोषण आणि व्यवस्था ठेवत असतात. परंतु जी माणसे कोण्या एखाद्या कारणाने भगवंताला सन्मुख होत असतात, त्यांच्या त्या सन्मुखतेच्या कारणानेच भगवंताचे ठिकाणी त्यांचेविषयी विशेष प्रेम उत्पन्न होत असते.

जेव्हा भक्त संपूर्णपणे निष्काम होत असतो, अर्थात् त्याचे ठिकाणी लौकिक पारलौकिक कोणत्याही प्रकारची इच्छा राहत नाही, तेव्हा त्याचे ठिकाणी स्वतःसिद्ध प्रेम पूर्णरूपाने जागृत होत असते. पूर्णरूपाने जागृत होण्याचा अर्थ असा आहे की, प्रेमात थोडीही उणीव राहत नाही. प्रेम कधी समाप्तही होत नाही. कारण ते अनंत आणि प्रत्येक क्षणाला वाढणारे असते. प्रत्येक क्षणाला वाढणारे म्हणण्याचे तात्पर्य प्रेमामध्ये प्रत्येक क्षणाला अलौकिक विलक्षणतेचा अनुभव येत राहतो अर्थात् इकडे आपले लक्ष गेलेच नाही, आता लक्ष गेले—याप्रमाणे प्रत्येक क्षणाला भाव आणि अनुभव होतच राहतो. म्हणून प्रेमाला अनंत म्हटले गेले आहे.

---

* या दोहनेऽवहनने मथनोपलेपप्रेङ्खेङ्खनार्भरुदितोक्षणमार्जनादौ।
गायन्ति चैनमनुरक्तधियोऽश्रुकण्ठ्यो धन्या व्रजस्त्रिय उरुक्रमचित्तयानाः॥ (श्रीमद्भा० १०। ४४। १५)

''ज्या गायीचे दूध काढताना, साळी इत्यादी कुटताना, दही घुसळताना, आंगण सारवताना, बालकाला पाळण्यात झोके देताना, रडणाऱ्या मुलांना गप्प बसविण्यासाठी अंगाई गाताना, तुळशी इत्यादीना पाणी घालताना, तसेच झाडणे इत्यादी सर्व कर्म करताना प्रेमपूर्ण चित्ताने डोळ्यांत अश्रू भरून गद्गद कंठाने श्रीकृष्णाच्या दिव्य लीलांचे गायन करीत असतात, त्या श्रीकृष्णाच्या ठिकाणी चित्त लावून राहणाऱ्या गोपी धन्य आहेत''

**परिशिष्ट भाव**—भगवंताने आपल्या प्रेमी भक्ताला 'ज्ञानी' नावाने यासाठी म्हटले आहे की, 'सर्व काही परमात्माच आहे'—हेच वास्तविक आणि अंतिम ज्ञान आहे, याच्यापुढे काहीही नाही. म्हणून असा अनुभव करणारा प्रेमी भक्तच वास्तविक ज्ञानी आहे. (गीता ७। १९) कारण अशा भक्ताच्या दृष्टीत एका परमात्म्याशिवाय दुसरी सत्ता नसतेच. परंतु विवेकी पुरुषाच्या दृष्टीत सत् आणि असत्—दोन सत्ता राहतात. तात्पर्य हे आहे की, येथे 'ज्ञानी' शब्द जीवन्मुक्त तत्त्वज्ञान्यासाठी आला नाही, तर '**वासुदेवः सर्वम्**' चा अनुभव करणाऱ्या ज्ञानी अर्थात् प्रेमी भक्तासाठी आला आहे. गीतेत भगवंताने मुख्यरूपाने भक्तालाच 'ज्ञानी' म्हटले आहे. (७। १६-१८) कारण तोच अंतिम आणि खरा ज्ञानी आहे. त्याचे केवळ भगवंतातच प्रेम असते. म्हणून तो श्रेष्ठ आहे—'**एकभक्तिर्विशिष्यते**'।

भगवंताचा अर्थार्थी भक्त अनित्ययुक्त (निरंतर भगवंतात न लागलेला) असतो. अर्थार्थीपेक्षा आर्त जास्त नित्ययुक्त असतो. आर्तपेक्षाही जिज्ञासू जास्त नित्ययुक्त असतो. परंतु ज्ञानी सर्वथा नित्ययुक्त असतो.

'**प्रियो हि ज्ञानिनोऽत्यर्थमहं स च मम प्रियः**' पदांचे तात्पर्य हे आहे की, '**वासुदेवः सर्वम्**' चा अनुभव झाल्यावर पुन्हा भक्त आणि भगवान्—दोघात परस्पर प्रेमच प्रेम शिल्लक राहते. यालाच शास्त्रात प्रतिक्षण वर्धमान प्रेम, अनंतरस इत्यादी नावाने म्हटले गेले आहे.

***संबंध**—पूर्व श्लोकात भगवंतांनी ज्ञानी भक्ताला आपला अत्यंत प्रिय असल्याचे सांगितले. यावरुन असेही वाटू शकते की, भगवंतांनी दुसऱ्या भक्तांचा आदर केला नाही. म्हणून त्याचा खुलासा पुढील श्लोकात करतात.*

## उदाराः सर्व एवैते ज्ञानी त्वात्मैव मे मतम्।
## आस्थितः स हि युक्तात्मा मामेवानुत्तमां गतिम् ॥ १८ ॥

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **एते** | = पूर्वी सांगितलेले | **मे** | = माझे | **युक्तात्मा** | = माझ्याशी अभिन्न आहे (आणि) |
| **सर्वे, एव** | = सर्वचे सर्व (चारीही) भक्त | **आत्मा एव** | = स्वरूपच आहे— | **अनुत्तमाम्, गतिम्** | = ज्याहून श्रेष्ठ दुसरी कोणती गती नाही, (अशा) |
| **उदाराः** | = फार उदार (श्रेष्ठ भाव ठेवणारे) आहेत. | **मतम्** | = (असे माझे) मत आहे. | | |
| **तु** | = परंतु | **हि** | = कारण की, | **माम्, एव** | = माझ्यातच |
| **ज्ञानी** | = ज्ञानी (प्रेमी) तर | **सः** | = तो | **आस्थितः** | = दृढ स्थित आहे. |

***व्याख्या**—* **उदाराः सर्व एवैते**—ते सर्वचे सर्व भक्त उदार आहेत, श्रेष्ठ भावाचे आहेत. भगवंतांनी या ठिकाणी जो "उदाराः" शब्दाचा प्रयोग केला आहे त्यात किती तरी विचित्र भाव आहेत जसे-

(१) चौथ्या अध्यायाच्या अकराव्या श्लोकात भगवंतांनी म्हटले आहे की, "भक्त ज्या रीतीने मला शरण येतात त्याच रीतीने मी त्यांचे भजन करतो." भक्त भगवंताला आवडतो आणि भगवंत भक्ताला आवडतात. परंतु या दोघांपैकी प्रथम भक्तानेच संबंध जोडलेला असतो आणि जो प्रथम संबंध जोडत असतो तो उदार असतो. तात्पर्य भगवंत संबंध जोडोत अथवा न जोडोत, याची परवा भक्त करत नाही. तो तर आपल्याकडून प्रथम संबंध जोडत असतो आणि स्वतः आपल्याला समर्पित करत असतो. म्हणून तो उदार आहे.

(२) देवतांचे भक्त सकामभावनेने विधीपूर्वक यज्ञ, दान, तप इत्यादी कर्म करत असतात. त्यावेळी देवतांना त्यांच्या कामनेनुसार ती वस्तू द्यावीच लागते. कारण देवतालोक त्यांचे हित-अहित पाहत नाहीत. परंतु भगवंताचा भक्त जर भगवंतास कोणती वस्तू मागत असेल तर भगवान् उचित असेल तर ती वस्तू देतात अर्थात् देण्याने त्याची भक्ती वाढत असेल तर देतात आणि भक्ती वाढत नसेल, संसारात फसवणूक होत असेल तर देत नाहीत. कारण भगवान् परम पिता आहेत आणि परम हितैषी आहेत. तात्पर्य हे झाले की, आपल्या कामनेची पूर्ती होवो की न होवो, तरीही ते भगवंताचेच भजन करत असतात, भगवंताच्या भजनाचा त्याग करत नाहीत—ही त्यांची उदारताच आहे.

(३) संसारातील भोग, रुपये-पैसे प्रत्यक्ष सुखदायी दिसतात आणि भगवंताच्या भजनापासून प्रत्यक्ष आणि लवकर सुख प्राप्त होत असल्याचे दिसत नाही, तरीपण संसाराच्या प्रत्यक्ष सुखाचा त्याग करून अर्थात् भोग भोगणे आणि संग्रह करण्याचा लोभ सोडून भगवंताचे भजन करत असतात ही त्यांची उदारताच आहे.

(४) भगवंताच्या दरबारात मागणाऱ्याला ही उदार म्हटले जाते. "**यहि दरबार दीनको आदर रीति सदा चलि**

आई'' (विनय पत्रिका १६५।५) अर्थात् कोणी काही मागतो, कोणी धनाची इच्छा करतो, कोणी दुःख दूर करण्याची इच्छा करतो. अशा मागणाऱ्या भक्तांनाही भगवान् उदार म्हणतात—ही भगवंताची विशेष उदारताच आहे.

(५) भक्तांचा लौकिक-पारलौकिक कामनापूर्तीसाठी इतरांकडे इच्छा करण्याचा मुळीच भाव राहत नाही. ते केवळ भगवंताकडून आपल्या कामनापूर्तीची इच्छा ठेवतात. भक्तांचा हा अनन्यभावच त्यांची उदारता आहे.

**ज्ञानी त्वात्मैव मे मतम्**—येथे ''**तु**'' पदाने ज्ञानी अर्थात् प्रेमी भक्ताची विलक्षणता दाखविली आहे की, दुसरे भक्त तर उदार आहेतच परंतु ज्ञानी भक्ताला उदार काय म्हणावे, तो तर माझे स्वरूपच आहे. स्वरूपाविषयी कोण्या निमित्ताने, एखाद्या विशेष कारणाने प्रियता नसते तर आपले स्वरूप असल्याने स्वतःस्वाभाविक प्रियता असते.

प्रेमात प्रेमी स्वतः आपल्याला प्रेमास्पदावर संपूर्णपणे अर्पित होत असतो अर्थात् प्रेमी आपली वेगळी सत्ता मानत नसतो. तसेच प्रेमास्पदही स्वतः प्रेमीवर संपूर्णपणे अर्पित होत असतो. त्यांना या प्रेमाद्वैताचा विलक्षण अनुभव होत असतो. ज्ञानमार्गाचा जो अद्वैत भाव आहे, तो नित्य-निरंतर अखंडरूपाने शांत, सम राहतो. परंतु प्रेमाचा जो अद्वैतभाव आहे तो एकमेकाच्या अभिन्नतेचा अनुभव करत प्रत्येक क्षणाला वाढणारा असतो. प्रेमाचा अद्वैतभाव एक असूनही दोन असतात आणि दोन असूनही एक असतो. म्हणून प्रेम-तत्त्व अनिर्वचनीय आहे. शरीराशी संपूर्णपणे अभिन्नता (एकता) मानत असतानाही निरंतर भिन्नता कायम राहते. त्याप्रमाणे प्रेमतत्त्वात भिन्नता राहत असतानाही अभिन्नता कायम राहत असते आणि अभिन्नतेचा अनुभव येत असतांनाही अभिन्नता कायम राहते.

जसे नदी समुद्रांत प्रविष्ट होत असते, तेव्हा प्रविष्ट होताच नदी आणि समुद्राच्या पाण्याची एकता होत असते. एकता झाल्यावरही दोन्ही बाजूंनी पाण्याचा एक प्रवाह चालू असतो अर्थात् कधी नदीचा समुद्राकडे तर कधी समुद्राचा नदीकडे एक विलक्षण प्रवाह चालत असतो. तसेच प्रेमीचा प्रेमास्पदाकडे आणि प्रेमास्पदाचा प्रेमीकडे प्रेमाचा एक विलक्षण प्रवाह चालत असतो. त्यांचा नित्ययोगात वियोग आणि वियोगात नित्ययोग अशा प्रकारे प्रेमाची एक विलक्षण लीला अनंतरूपाने अनंतकाळापर्यंत चालत असते. त्यात कोण प्रेमास्पद आहे आणि कोण प्रेमी आहे याचे भान राहत नाही. त्या ठिकाणी दोघेही प्रेमास्पद आणि दोघेही प्रेमी असतात. हेच ''**ज्ञानी त्वामैव मे मतम्**'' पदांचे तात्पर्य आहे.

**आस्थितः स हि युक्तात्मा मामेवानुत्तमां गतिम्**—कारण यापेक्षा दुसरी गती कोणती होऊच शकत नाही असा तो सर्वोपरी माझ्या ठिकाणी श्रद्धा, विश्वास आणि दृढ स्थिती असलेला असा असतो.

''केवळ भगवंतच माझे आहेत'' अशा प्रकारे माझ्या ठिकाणी त्याची जी आत्मीयता असते तिच्यावर अनुकूलता-प्रतिकूलतेमुळे कसलाही परिणाम होत नाही. उलट ती आत्मीयता वरचेवर दृढ होत जाते आणि वाढतही राहते.

तो युक्तात्मा आहे अर्थात् तो कोणत्याही अवस्थेत माझ्यापासून वेगळा होत नाही, तर माझ्याशी नित्य-निरंतर अभिन्न राहत असतो.

**परिशिष्ट भाव**—सांसारिक अर्थार्थी हा भगवंताला सोडून केवळ अर्थाचीच इच्छा करतो. म्हणून तो असत्य, कपट, बेईमानी इत्यादींचा भक्त होतो. त्याच्या अंतःकरणात धनाचे महत्त्व अधिक असल्याने तो उदार नसतो, तर महान कृपण असतो. म्हणून त्याच्यासाठी 'उदार' शब्द लागूच पडत नाही. परंतु जो अर्थार्थी भगवंताचा भक्त असतो त्याच्या अंतःकरणात अर्थाचे महत्त्व नसून भगवंताचे महत्त्व असते. म्हणून त्याच्यात कृपणता नसते, तर उदारता असते. म्हणून भगवंताने त्याला येथे उदार म्हटले आहे. येथे उदार भावाचा अर्थ आहे—त्याग. अर्थार्थी, आर्त आणि जिज्ञासू भक्त संसाराचा (भोग आणि संग्रहाचा) त्याग करून भगवंतात लागले—हा त्यांचा त्याग आहे. म्हणून ते सर्वच उदार आहेत—'**उदाराः सर्व एवैते**'। एकमात्र भगवंताचा संबंध मुख्य असल्यामुळे अर्थार्थी, आर्त आणि जिज्ञासू हेही कालान्तराने स्वतः 'ज्ञानी' होतात.

एक मार्मिक गोष्ट ही आहे की, भगवंताला न मानणे कामनेपेक्षाही अधिक दोषावह आहे. जे भगवंताला सोडून दुसऱ्या देवतांची उपासना करतात, त्यांच्यात जर कामना राहिली तर ते जन्म-मरणाला प्राप्त होतात—'**गतागतं कामकामा लभते**'। (गीता ९।२१) परंतु जे केवळ भगवंताचेच भजन करतात, त्यांच्यात जरी कामनाही राहिली तरी भगवंताच्या कृपेमुळे आणि भजनाच्या प्रभावामुळे ते भगवंतालाच प्राप्त होतात. कारण मनुष्याचा कोणत्याही रीतीने भगवंताशी संबंध जडला तर तो भगवंतालाच प्राप्त होतो.* कारण तो मूळात भगवंताचाच अंश आहे.

* कामाद् द्वेषाद् भयात् स्नेहाद् यथा भक्त्येश्वरे मनः।
आवेश्य तदघं हित्वा बहवस्तद्गतिं गताः॥ (श्रीमद्भा० ७।१।२९)

अर्थार्थी, आर्त आणि जिज्ञासू—या तिघांनाही भगवंतांनी येथे 'उदार' म्हटले आहे. परंतु जे भगवंताशिवाय ईतरांचे भजन करणारे आहेत, त्यांना भगवंताने उदार न म्हणता 'अल्पमेधा' म्हटले आहे (गीता ७।२३) आणि त्यांच्या भजनाला अविधीपूर्वक केले गेलेले भजन असे सांगितले आहे. (गीता ९।२३) देवतांना भगवंताहून वेगळे समजल्यामुळे अर्थात् देवतांमध्ये भगवद्बुद्धी नसल्यामुळे आणि कामनाही असल्यामुळे त्यांची उपासना अविधीपूर्वक आहे. तात्पर्य हे आहे की, सर्वात भगवद्बुद्धी न होणे सकामभावापेक्षाही अधिक घातक आहे. कारण चेतनाशी संबंध झाला नाही!

तत्त्वज्ञान्याची ब्रह्माशी 'तात्त्विक एकता' अर्थात् साधर्म्य होते. परंतु भक्ताची भगवंताशी 'आत्मीय एकता' असते –'**ज्ञानी त्वात्मैव मे मतम्**'। तत्त्वज्ञान्याच्या तात्त्विक एकतेत (साधर्म्यात) जीव आणि ब्रह्म यामध्ये अभेद होतो अर्थात् जसे ब्रह्म सत्-चित्-आनंदस्वरूप आहे, तसे तोही सत्-चित्-आनंदस्वरूप होतो आणि एकातत्त्वाशिवाय काही राहत नाही. परंतु भक्ताच्या आत्मीय एकतेत जीव आणि भगवंतात अभिन्नता होते. अभिन्नतेत भक्त आणि भगवान् एक असूनही प्रेमासाठी दोन होतात. त्यांच्यात दोघेही प्रेमी आणि दोघेही प्रेमास्पद होतात. म्हणून ते दोन असूनही एकच असतात.

अर्थार्थी, आर्त आणि जिज्ञासू यामध्ये क्रमाने स्वतःची स्वतंत्र सत्ता (अहंता) कमी होत जाते आणि ज्ञान्यात स्वतःची स्वतंत्र सत्ता मुळीच राहत नाही. म्हणून '**त्वात्मैव**' पदाचे तात्पर्य हे आहे की, प्रेमी भक्ताची स्वतंत्र सत्ता राहिली नाही तर केवळ भगवान्च राहिले अर्थात् प्रेमीच्या रूपात साक्षात् भगवानच आहेत—'**तस्मिंस्तज्जने भेदाभावात्**'। (नारद भक्तिसूत्र-४१) ही आत्मीयता भक्तीसाठी स्वीकृत असलेले द्वैत आहे, जे ज्ञानयोगाच्या अद्वैतापेक्षाही सुंदर आहे—'**भक्त्यर्थं कल्पितं (स्वीकृतम्) द्वैतमद्वैतादपि सुन्दरम्**'* (बोधसार भक्ति० ४२)

'**मामेवानुत्तमां गतिम्**'—भगवंताहून श्रेष्ठ उत्तम गती दुसरी नाही. 'गति' शब्दाचे तीन अर्थ होतात—ज्ञान, गमन आणि प्राप्ती. येथे 'गति' शब्द प्राप्तीच्या अर्थात् आला आहे. अंतिम प्रापणीय तत्त्व असल्यामुळे भगवान् सर्वोत्तम गती आहेत.

'**आस्थितः**'—एक दृढता अभ्यासाने होते आणि एक दृढता आपोआप होते. जसे सर्व प्राण्यांची 'मी आहे'—अशाप्रकारे आपली-आपल्यात सहज दृढ स्थिती असते, तसेच ज्ञानी भक्ताची भगवंतात सहज दृढ स्थिती असते.

***संबंध***—*पूर्व श्लोकात सांगितलेल्या ज्ञानी अर्थात् प्रेमी भक्ताची वास्तविकता आणि त्याच्या भजनाचा प्रकार पुढील श्लोकात सांगत आहेत.*

**बहूनां जन्मनामन्ते ज्ञानवान्मां प्रपद्यते।**
**वासुदेवः सर्वमिति स महात्मा सुदुर्लभः॥ १९॥**

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **बहूनाम्** | = पुष्कळ | **सर्वम्** | = सर्व काही | **माम्** | = मला |
| **जन्मनाम्** | = जन्मांच्या | **वासुदेवः** | = परमात्माच आहेत— | **प्रपद्यते** | = शरण होतो, |
| **अन्ते** | = अंतिम जन्मात अर्थात् मनुष्यजन्मात | **इति** | = अशाप्रकारे | **सः** | = तो |
| | | **ज्ञानवान्** | = (जो) ज्ञानवान् | **महात्मा** | = महात्मा |
| | | | | **सुदुर्लभः** | = अत्यंत दुर्लभ आहे. |

***व्याख्या***— **बहूनां जन्मनामन्ते**—मनुष्यजन्म संपूर्ण जन्मांचा अंतिम जन्म आहे. भगवंतांनी जीवाला मनुष्यशरीर देऊन त्याला जन्म-मृत्यूच्या प्रवाहातून तरून जाण्यासाठी भगवत्प्राप्तीचा पूर्ण अधिकार दिला आहे. परंतु हा मनुष्य भगवंताला प्राप्त न करता, आसक्तीमुळे पुनः जुन्या प्रवाहात अर्थात् जन्म-मृत्यूच्या प्रवाहात पडतो. म्हणून भगवान् म्हणतात, "**अप्राप्य मां निवर्तन्ते मृत्युसंसारवर्त्मनि**" (९।३) जेव्हा भगवान् आसुरी योनी आणि नरक यांच्या अधिकाऱ्यांचे वर्णन करतात तेव्हा दुर्गुण-दुराचारामुळे भगवत्प्राप्तीची संभावना दिसत नसतानाही भगवान् म्हणतात "**मामप्राप्यैव कौन्तेय ततो यान्त्यधमां गतिम्**" (१६।२०) अर्थात् मला प्राप्त करून घेतल्याशिवायच हे प्राणी अधम गतीला गेले अर्थात् मृत्यूनंतर मनुष्ययोनीला गेले असते तर कमीत कमी मनुष्य राहिले असते परंतु ते माझ्या प्राप्तीचा पूर्ण अधिकार प्राप्त करूनही अधम गतीला गेले.

संतांच्या वाणीत आणि शास्त्रांत असे वर्णन येते की,

'एक नव्हे, अनेक माणसे कामाने, द्वेषाने, भयाने आणि स्नेहाने आपल्या मनाला भगवंतात लावून तसेच आपले सर्व पाप धुवून तसेच भगवंताला प्राप्त झाले आहेत, जसे भक्त भक्तीने!'

* भक्तीची ही अद्वैत कल्पना नाही, तर स्वीकृती आहे. कल्पित अद्वैत तर असत्य असते, त्यात प्रेम नसते.

मनुष्यजन्म केवळ आपले कल्याण करून घेण्यासाठीच मिळाला आहे. विषयांचे सुख भोगण्यासाठी अथवा स्वर्गप्राप्ती-साठी नव्हे.* म्हणून गीतेने स्वर्गाच्या प्राप्तीची इच्छा करणाऱ्याला मूढ आणि तुच्छ बुद्धी असणारा म्हटले आहे—"**अविपश्चितः**" (२।४२) आणि "**अल्पमेधसाम्**" (७।२३)

हा मनुष्यजन्म संपूर्ण जन्मांचा आदि जन्मही आहे आणि अंतिम जन्मही आहे. संपूर्ण जन्मांचा आरंभ मनुष्य जन्मापासूनच होत असतो अर्थात् मनुष्यजन्मांत केलेले पाप चौऱ्यांशी लाख योनी आणि नरक भोगूनही समाप्त होत नाही, शिल्लकच राहते, म्हणून हा मनुष्यजन्म संपूर्ण जन्मांचा आदि जन्म आहे. ही माणसे, मनुष्यजन्मात, संपूर्ण पापांचा नाश करून, संपूर्ण वासनांचा नाश करून आपले कल्याण करून घेऊ शकतात. भगवंताला प्राप्त करू शकतात, म्हणून हा मनुष्यजन्म संपूर्ण जन्मांचा शेवटचा जन्म आहे.

भगवंतांनी आठव्या अध्यायाच्या सहाव्या श्लोकात म्हटले आहे की, "जो मनुष्य अंतकाळी ज्या ज्या भावाचे स्मरण करत असताना या शरीराचा त्याग करतो, त्या त्या भावालाच तो प्राप्त होत असतो". अशा प्रकारे मनुष्याला कोणत्याही भावाचे स्मरण करण्याची जी स्वतंत्रता दिली आहे यावरुन असे वाटते की, भगवंतांनी मनुष्याला पूर्ण अधिकार दिला आहे. अर्थात् मनुष्याच्या उद्धारासाठी भगवंतांनी आपल्याकडून हा शेवटचा जन्म दिला आहे. आता हा यापुढे नवीन जन्माची तयारी करणे, अथवा आपला उद्धार करून घेणे, या गोष्टीत तो संपूर्णपणे स्वतंत्र आहे† याच दृष्टिकोनातून गीता मनुष्यमात्राला परमात्मप्राप्तीचा अधिकारी मानते आणि जाहीररित्या घोषणा करते की, वर्तमान-काळातील अत्यंत दुराचारी, पूर्वजन्मीच्या पापाचे फल म्हणून नीच योनीत जन्मलेला पापयोनी मनुष्य आणि चारही वर्णांचे स्त्री-पुरूष हे सर्व भगवंताचा आश्रय घेऊन परमगतीला प्राप्त होऊ शकतात. (९।३०-३३). गीतेने (९।३२ मध्ये) असा विचित्र "पापयोनी" शब्द म्हटला आहे, ज्यात शूद्रापेक्षाही नीच म्हटले जाणारे आणि मानले जाणारे चांडाळ, यवन, इत्यादी तसेच पशु-पक्षी, कीट-पतंग, वृक्ष-लता इत्यादी सर्व घेतले जाऊ शकतात. मात्र ही गोष्ट वेगळी आहे की, पशु-पक्षी इत्यादी मनुष्येतर प्राण्याचे ठिकाणी परमात्मप्राप्तीची योग्यता नसते. परंतु परमात्म्याचे अंश असल्याने त्यांच्यासाठी परमात्म्याकडून मनाई नाही. त्यापैकी पुष्कळ प्राणी भगवान् आणि संत महापुरुषांच्या कृपेने तसेच तीर्थ आणि भगवद्धामाच्या प्रभावाने परमगतीला प्राप्त होतात. देवता भोगयोनी आहेत. ते भोगामध्येच मग्न असतात. म्हणून त्यांना "आपला उद्धार करून घ्यावयाचा आहे" असा विचार येत नाही. परंतु त्यांनी जर एखाद्या कारणाने भगवंताकडे वाटचाल केली, तर त्यांचाही उद्धार होतो. इंद्राला देखील ज्ञान प्राप्त झाले होते असे शास्त्रांत वर्णन येते.

भगवंताकडून मनुष्यमात्राचा जन्म अंतिम जन्म आहे. कारण भगवंताचा हा संकल्प आहे की, मी दिलेल्या या शरीराने याने आपले कल्याण करून घ्यावे. म्हणून हा आपला कोणताही संकल्प न ठेवता, निमित्तमात्र झाला तर भगवंताच्या संकल्पाने याचे कल्याण होते. जसे अकराव्या अध्यायाच्या चौतीसाव्या श्लोकात भगवंतांनी अर्जुनाला म्हटले आहे, माझ्याद्वारा मारलेल्यानाच तू मार—"**मया हतास्त्वं जहि**". तू चिंता करू नको "**मा व्यथिष्ठाः**" तू युद्ध कर, तुझा विजय होईल "**युध्यस्व जेतासि**". या रीतीने भगवंतांनी कृपा करून मनुष्यशरीर दिले आहे. जर मनुष्य भगवंताशी विमुख होऊन संसारात आसक्त झाला नाही तर भगवंताच्या त्या संकल्पानुसार सहजच मुक्त होऊन जाईल.

भगवंताचा संकल्प असा नाही की, साधकाच्या इच्छे-शिवाय त्याचे कल्याण होईल अर्थात् जसे शाप अथवा वरदान दिले जाते तसा हा संकल्प नव्हे. तर मग कसा आहे हा संकल्प? भगवंतांनी मनुष्याला आपले कल्याण करून घेण्याची स्वंतत्रता या मनुष्यजन्मात दिली आहे. जर ह्या प्राण्याने त्या स्वंतत्रतेचा दुरुपयोग केला नाही अर्थात् भगवंत आणि शास्त्र यांच्या विरुद्ध वर्तन केले नाही, कमीत-कमी आपल्या विवेकाच्या विरुद्ध वर्तन केले नाही, तर त्याचे-कडून भगवान् आणि शास्त्र यांचेशी वर्तन आपोआप अनुकूलच होईल. कारण भगवान् आणि शास्त्र यांच्या विपरीत वर्तन केले नाही तर दोन अवस्थापैकी एक अवस्था स्वाभाविक होईल. तो एक तर शरीर, इंद्रिये, मन, बुद्धीद्वारा काहीही करणार नाही किंवा दुसरे केवळ भगवान् आणि शास्त्र यांच्या अनुकूलच वर्तन करील.

काहीही न करण्याच्या स्थितीत अर्थात् काहीही करण्याची रुची नसलेल्या अवस्थेमध्ये मन, बुद्धी, इंद्रिये इत्यादीशी संबंध-विच्छेद होतो. कारण काही ना काही

* एहि तन कर फल बिषय न भाई। स्वर्गउ स्वल्प अंत दुखदाई ॥ (मानस ७।४४।१)

† नर तन सम नहि कवनिउ देही। जीव चराचर जाचत तेही॥
नरक स्वर्ग अपबर्ग निसेनी। ग्यान बिराग भगति सुभ देनी ॥ (मानस ७।१२१।५)

करण्याच्या इच्छेनेच कर्तृत्व अभिमान उत्पन्न होऊन अंत:करण आणि इंद्रियांशी संबंध जुटतो. काहीही न करण्याने कर्तृत्वाभिमान होणार नाही किंवा फलाची इच्छा राहणार नाही तर स्वरूपात आपोआप स्थिती होईल.

शास्त्राच्या आज्ञेनुसार, निष्कामभावपूर्वक कर्म करण्याच्या अवस्थेत करण्याचा प्रवाह समाप्त होतो आणि क्रिया तसेच पदार्थांशी संबंध-विच्छेद होतो. क्रिया आणि पदार्थांशी संबंध-विच्छेद झाल्याने नवीन कामना उत्पन्न होणार नाही आणि जुनी आसक्ती समाप्त होऊन जाईल, तेव्हा आपोआप बोध होईल—"**तत्स्वयं योगसंसिद्धः कालेनात्मनि विन्दति**" (४।३८)

गीतेत आले आहे की, निष्कामभावनेने विधीपूर्वक आपल्या कर्तव्यकर्माचे पालन केले तर अनादिकालापासून संचित असलेले संपूर्ण कर्म नष्ट होतात. (४।२३) ज्ञानयोगाने मनुष्य संपूर्ण पापापासून मुक्त होतो (४।३६) भगवंत भक्ताला संपूर्ण पापापासून मुक्त करतात (१८।६६) जो भगवंताला अज, अनादी जाणत असतो तो संपूर्ण पापापासून मुक्त होतो (१०।३) अशा प्रकारे कर्मयोग, ज्ञानयोग आणि भक्तियोग—तिन्ही योगाने पाप नष्ट होतात. तात्पर्य हे निघाले की, अंतिम मनुष्यजन्म केवळ कल्याण करून घेण्यासाठीच मिळाला आहे.

मनुष्यजन्मात सत्संग मिळाला, गीतेसारख्या ग्रंथाचा परिचय झाला, भगवन्नामाची आवड निर्माण झाली, तर साधकाने हे समजून घ्यावे की, भगवंतांनी आपल्यावर फार मोठी कृपा केली आहे. म्हणून आता तर आपला उद्धार होणारच, आता यापुढे आपल्याला जन्म-मरण राहणार नाही. कारण जर आपला उद्धार व्हायचा नसता तर अशी संधी आपल्याला मिळाली नसती. परंतु "भगवंताच्या कृपेने उद्धार होईलच" या भरवंशावर साधनेचा त्याग करता कामा नये, तर तत्परतेने आणि उत्साहाने साधनेत व्यस्त राहिले पाहिजे. वेळ सार्थक व्हावा, कोणताही समय वाया जाऊ नये अशी सावधानी नित्य ठेवली पाहिजे. परंतु आपल्या कल्याणाची चिंता करता कामा नये. कारण आत्तापर्यंत ज्याने इतकी व्यवस्था ठेवली तोच पुढेही व्यवस्था करेल. जसे एखाद्याने भोजनाचे निमंत्रण दिले, आसन मांडले, आसनावर बसवले, पत्रावळ टाकली, पाण्याचा तांब्या भरून जवळ ठेवला. अशा वेळी जर एखादा चिंता करू लागेल की, ही व्यक्ती भोजन देईल का नाही? तर ही चिंता करणे अयोग्य ठरते. कारण त्याला भोजन द्यावयाचे नसते तर त्याने निमंत्रण कशाला दिले असते? भोजनाची तयारी कशाला केली असती? परंतु ज्या-अर्थी त्याने निमंत्रण दिले आहे, बोलावले आहे, तयारी केली आहे तेव्हा त्याला भोजन द्यावेच लागणार. आपण भोजनाची चिंता कशाला करावयाची? आता जे जे पदार्थ येतील ते ते सेवन करावेत. तसेच आपल्याला भगवंतांनी मनुष्यशरीर दिले आहे आणि उद्धाराची सर्व सामग्री (सत्संग, भगवन्नाम इत्यादी) जुळवून दिली आहे तर आपला उद्धार होईलच. आता तर आपण संसार समुद्राच्या किनाऱ्यावर आलो आहोत. असा दृढ विश्वास करून निमित्तमात्र होऊन साधन केले पाहिजे.

ज्याच्या पूर्वजन्माच्या पुण्याचा उदय होतो तोच भगवंताकडे वाटचाल करू शकतो. असे जर मानले तर पूर्वजन्माच्या पाप-पुण्याचे फल तर पशु-पक्षी, कीट-पतंग इत्यादी योनीचे प्राणी भोगतच आहेत तर मग मनुष्य आणि त्या प्राण्यात काय फरक राहीला? भगवंताचे कृपा करून मनुष्य शरीर देण्याचे कुठे सार्थक झाले? तसेच मनुष्यजन्माची विलक्षणता, त्याचे माहात्म्य कुठे राहिले? **मनुष्यजन्माची सार्थकता** आणि माहात्म्य यातच आहे की, मनुष्याने भगवंताचा आश्रय घेऊन आपल्या कल्याणाच्या मार्गाला लागावे.*

"**वासुदेवः सर्वम्**"† महासर्गारंभी एक भगवानच अनेक रूपामध्ये प्रगट होतात. "**सदैक्षत बहु स्यां प्रजायेयेति**" (छांदोग्य० ६।२।३) आणि अंती अर्थात् प्रलयामध्ये एक

---

* (१) लब्ध्वा सुदुर्लभमिदं बहुसम्भवान्ते मानुष्यमर्थदमनित्यमपीह धीरः। तूर्णं यतेत न पतेदनुमृत्युयावन्निःश्रेयसाय विषयः खलु सर्वतः स्यात्॥
(श्रीमद्भा० ११।९।२९)

"अनेक जन्मानंतर ह्या परम पुरुषार्थाच्या साधनरूपी, अनित्य असूनही अत्यंत दुर्लभ अशा, मनुष्यशरीराला प्राप्त होऊन बुद्धिमान् पुरुषाने लवकरात लवकर, मृत्यू येण्यापूर्वीच आपल्या कल्याणासाठी प्रयत्न करावा. विषयभोग तर सर्वच योनीत प्राप्त होऊ शकतात म्हणून त्यांच्या संग्रहात ह्या अमूल्य मानव जीवनाला व्यर्थ घालवू नये"

(२) नृदेहमाद्यं सुलभं सुदुर्लभं प्लवं सुकल्पं गुरुकर्ण धारम्।
मयानुकूलेन नभस्वतेरितं पुमान् भवाब्धिं न तरेत् स आत्महा॥ (श्रीमद्भा० ११।२०।१७)

हे मनुष्यशरीर समस्त शुभ फळांच्या प्राप्तीचे मूळ आहे आणि अत्यंत दुर्लभ असतानाही सहज सुलभ झालेले आहे. ह्या संसारसागरातून तरून जाण्यासाठी ही एक सुदृढ नौका आहे, जिला गुरुरूपी नाविक चालवत असतो आणि मी (भगवान्) वायुरूप होऊन याला उद्देशाकडे वळण्यात साहाय्यता करतो. इतकी सुविधा असतानाही जो मनुष्य या संसारसागरातून तरून जात नाही तो आत्मघातकी अर्थात् आपले पतन करून घेणारा आहे.

† येथे "वासुदेवः" शब्द पुल्लिंगी आहे आणि "सर्वम्" शब्द नपुंसक लिंगात आला आहे. येथे "वासुदेवःसर्वः" ही म्हणू शकत होते परंतु असे न म्हणता "वासुदेवःसर्वम् " म्हटले आहे. याचे तात्पर्य "सर्वम्" शब्दात स्त्री, पुरुष, नपुंसक, स्थावर जंगम इत्यादी सर्वांचा समावेश होतो.

भगवान्च शेष राहतात ''**शिष्यते शेष संज्ञः**'' (श्रीमद्भा० १०।३।२५) अशा प्रकारे जर आदि आणि अंती एक भगवानच राहतात तर मध्यंतरी दुसरा कोण असणार ? कारण संसाराची रचना करतेवेळी भगवंताजवळ स्वत:शिवाय कोणतीही सामुग्री नव्हती. ते तर स्वतः संसाराच्या रूपात प्रगट झाले आहेत. म्हणून हे सर्व वासुदेवच आहे.

जी वस्तू आरंभी आणि शेवटी असते तीच मध्यातही असते. जसे सोन्याच्या दागिन्यात पूर्वी सोने असते आणि नंतर सोनेच राहते तर अलंकारात दुसरी वस्तू कोठून येणार ? केवळ सोनेच सोने आहे. मातीपासून तयार होणारी भांडी पूर्वी माती होती आणि शेवटी मातीच होते तर मग मध्यंतरी मातीशिवाय काय असणार ? केवळ मातीच माती आहे. साखरेपासून तयार झालेली खेळणी पूर्वी साखर होती आणि शेवटी साखरच होणार. तर मध्यंतरी साखरेशिवाय दुसरे काय असणार ? केवळ साखरच साखर आहे. त्याचप्रमाणे सृष्टीच्या पूर्वी भगवंत होते आणि शेवटी भगवंतच राहतील तर मध्यंतरी भगवंताशिवाय दुसरे काय असणार? केवळ भगवंतच भगवंत आहेत. जसे सोन्याला मग अलंकाराच्या रूपात पहा, लगडच्या रूपात पहा, अथवा वर्ख रूपात पहा, सोनेच असते. तसेच संसारामध्ये अनेक रूपात, अनेक आकृतीत एक भगवानच असतात.

जोपर्यंत मनुष्याची दृष्टी अलंकाराकडे, आकृतीकडे असते, त्यालाच महत्त्व देत असते तोपर्यंत ''हे सोनेच आहे'' याकडे त्याची दृष्टी राहत नाही. तसेच जोपर्यंत मनुष्याची दृष्टी संसाराकडे असते, त्यालाच महत्त्व देत असते, तोपर्यंत ''सर्व काही भगवानच आहेत'' याकडे त्याची दृष्टि जात नाही. परंतु जेव्हा अलंकाराकडे दृष्टी राहत नाही तेव्हा अलंकारात सोन्याची भावना होत नाही तर ''हे सोनेच आहे'' अशी भावना होते. तसेच जेव्हा संसाराकडे दृष्टी राहत नाही, तेव्हा संसारात भगवंताची भावना होत नाही तर ''सर्व काही भगवंतच आहेत, भगवंताशिवाय दुसरे काही नाहीच'' अशी भावना होते. कारण संसारात भगवंताची भावना केल्याने संसाराची सत्ता बरोबर राहते अर्थात् संसाराची भावना ठेवून, त्याची सत्ता मानून. त्यात भगवंताची भावना केली जाते. म्हणून जोपर्यंत संसाराची सत्ता मानली जाते, संसाराला महत्त्व देतो, तोपर्यंत संसारात भगवंताची भावना करत असतानाही ''**वासुदेवः सर्वम्**'' चा अनुभव येत नाही.

ब्रह्मभूत मनुष्य निर्वाणब्रह्माला प्राप्त होत असतो (५।२४). ब्रह्मभूत योग्याला उत्तम सुख मिळत असते (६।२७). ब्रह्मभूत भगवंताच्या पराभक्तीला प्राप्त होत असतो आणि त्या भक्तीने तत्त्वाला जाणून त्यात प्रवेश करत असतो (१८।५४-५५). गीतेच्या दृष्टीने ह्या तिन्हीही अवस्था आहेत. अवस्थेत परिवर्तन होत असते. परंतु ''**वासुदेवःसर्वम्**'' ही अवस्था नव्हे. तर वास्तविक तत्त्व आहे. यात कधीही परिवर्तन होत नाही.

हा जो काही संसार दिसत आहे ते सर्व भगवंताचेच स्वरूप आहे. भगवंताशिवाय या संसाराची स्वतंत्र सत्ता नव्हती, नाही आणि कधी असणारही नाही. म्हणून पाहण्यात, ऐकण्यात आणि समजण्यात जो काही संसार येतो तो सर्वचा सर्व भगवत्स्वरूपच आहे. भगवंताची आज्ञा आहे.

**मनसा वचसा दृष्ट्या गृह्यतेऽन्यैरपीन्द्रियैः।**
**अहमेव न मत्तोऽन्यदिति बुध्यध्वमञ्जसा॥**

(श्रीमद्भा० ११।१३।२४)

मनाने, वाणीने डोळ्याने तसेच अन्य इंद्रियानेही जे काही ग्रहण केले जाते ते सर्व मीच आहे. माझ्याहून वेगळे काहीही नाही. हा सिद्धांत आपण विचारपूर्वक समजून घ्या.

या आज्ञेनुसारच त्या ज्ञानी अर्थात् प्रेमीचे जीवन असते. तो सर्व ठिकाणी भगवंतालाच पाहतो—''**यो मां पश्यति सर्वत्र सर्वं च मयि पश्यति**'' (६।३०) तो सर्व काही करत असतानाही भगवंतातच राहत असतो—''**सर्वथा वर्तमानोऽपि स योगी मयि वर्तते**'' (६।३१)

एखाद्याला एका ठिकाणीच आपली प्रिय वस्तू मिळाली तर त्याला फार प्रसन्नता वाटते. मग ज्याला सर्व ठिकाणीच आपल्या आवडत्या इष्टदेवतेचा अनुभव होत असेल तर* त्याच्या प्रसन्नतेला आणि आनंदाला काय पारावार असणार? त्या आनंदात तल्लीन होऊन भगवंताचा प्रेमी भक्त कधी हसतो, कधी रडतो, कधी नाचतो तर

---

* जित देखौ तित स्याममई है।

स्याम कुंज बन जमुना स्यामा, स्याम गगन घन घटा छई है॥
सब रंगनमे स्याम भरो है, लोग कहत यह बात नई है।
हौं बौरी, कै लोगन ही की, स्याम पुतरिया बदल गयी है॥
चंद्रसार रबिसार स्याम है, मृगमद सार काम बिजई है।
नीलकंठको कंठ स्याम है, मनहु स्यामता बेल बई है॥
श्रुतिको अच्छर स्याम देखियत, दीप सिखापर स्यामतई है।
नर देबनकी कौन कथा है, अलख ब्रह्मछबि स्याममई है॥

कधी चुप राहून शांत होतो.* याप्रमाणे त्याचे जीवन अलौकिक आनंदाने परिपूर्ण होते. मग त्याच्यासाठी काही करणे, जाणणे आणि मिळविणे शेष राहत नाही. तो संपूर्णपणे परिपूर्ण होतो अर्थात् त्याच्यासाठी कोणत्याही अवस्थेत, कोणत्याही परिस्थितीत काहीही प्राप्त करावयाचे शिल्लक राहत नाही.

जो भक्तिमार्गावर आरूढ आहे तो "हे सत् आहे हे असत् आहे" या विवेकानुसार वर्तन करत नाही. त्याचे ठिकाणी विवेक, ज्ञानाची प्रधानता नसते. त्याचे ठिकाणी केवळ भगवद्भावाचीच प्रधानता असते. केवळ भगवद्भावाची प्रधानता असल्याकारणाने त्याच्यासाठी हा सर्व संसार चिन्मय होत असतो. त्याच्या दृष्टीत जडता राहत नाही. भगवंतामध्ये तल्लीनता असल्यामुळे भक्ताचे शरीरसुद्धा जड राहत नाही, तर चिन्मय होत असते. जसे मीराबाईचे शरीर (चिन्मय झाल्यामुळे) भगवंताच्या विग्रहामध्ये विलीन झाले होते.

ज्ञानमार्गात जेव्हा सत्-असत्चा विवेक असतो, तेव्हा परिणामी सत्-असत् दोन्हींची सत्ता राहत नाही. केवळ सत्-स्वरूपच राहत असते. परंतु भक्तिमार्गात सत्-असत् सर्व काही भगवत्स्वरूपच होत असते. मग भक्त भगवत्स्वरूप संसाराची सेवा करत असतो. सेवेत प्रथम तर सेवा, सेवक आणि सेव्य हे तीन असतात. परंतु जेव्हा भगवद्भावाची अत्यंत वृद्धी होते तेव्हा सेवकभावाची विस्मृती होते. मग भक्त स्वत: सेवारूप होऊन सेव्यात लीन होतो. केवळ एक भगवत्तत्त्वच शेष राहते. अशा प्रकारे भगवद्भावात तल्लीन झालेले भगवंताचे प्रेमी भक्त जेथे जेथे जातात तेथे त्यांचे दर्शन, स्पर्श आणि वाणी इत्यादीचा प्राण्यांवर फार मोठा परिणाम होतो.

जोपर्यंत मनुष्यांची पदार्थात भोगबुद्धी राहते, तोपर्यंत त्यांना त्या पदार्थांचे वास्तविक स्वरूप कळत नसते. परंतु भोगबुद्धी जेव्हा नष्ट होते तेव्हा केवळ भगवत्स्वरूपच दृष्टीस दिसते.

## मार्मिक गोष्ट

"**वासुदेवः सर्वम्**"—या तत्त्वाला समजण्याचे दोन प्रकार आहेत (१) संसाराचा अभाव करून परमात्माच मानणे अर्थात् संसार नाही आणि परमात्मा आहे. (२) सर्व काही भगवंतच भगवंत आहेत. यात जे परिवर्तन दिसते ते देखील भगवंताचे स्वरूपच आहे, कारण भगवंताशिवाय त्याची कोणती स्वतंत्र सत्ता नसते.

उपर्युक्त दोन्हीही प्रकार साधकांसाठी आहेत. ज्या साधकाला पदार्थांमुळे संसारात आकर्षण (आसक्ती) आहे त्याने "हे सर्व काही नाही केवळ परमात्माच आहे" या प्रणालीचा स्वीकार करावा. ज्या साधकाला पदार्थांमुळे संसारात मुळीच आकर्षण नाही आणि जो केवळ भगवंताचे स्मरण, चिंतन, जप, कीर्तन, इत्यादीमध्ये मग्न असतो त्याने "संसाररूपाने सर्व काही भगवंतच आहेत" या प्रणालीचा स्वीकार करावा. वास्तविक पाहिले तर ह्या दोन्ही प्रणाली तत्त्वाच्या दृष्टीने एकच आहेत. या दोन्हीत फरक एवढाच आहे की, जसे सोन्यात दागिने आणि दागिन्याचे नाम, रूप, आकृती इत्यादी वेगवेगळे असूनही सर्व काही सोनेच जाणणे. जेथे संसाराचा अभाव करून परमात्म्याला तत्त्वाने जाणायचे आहे तेथे "विवेका" ची प्रधानता असते आणि जेथे संसाराला भगवत्स्वरूप मानायचे आहे तेथे "भावा" ची प्रधानता असते. निर्गुणाच्या उपासकांत विवेकाची प्रधानता आणि सगुणाच्या उपासकांत भावाची प्रधानता असते.

संसाराचा अभाव करून परमात्मतत्त्वाला जाणणे, तत्त्वाने जाणणे आहे आणि संसाराला भगवत्स्वरूप मानणे-ही तत्त्वाने जाणणे आहे. कारण वास्तविक तत्त्व एकच आहे. फरक एवढाच आहे की, ज्ञानमार्गात जाणण्याची प्रधानता असते आणि भक्तिमार्गात मानण्याची प्रधानता असते. म्हणून भगवंतांनी ज्ञानमार्गात मानण्यालाही जाणण्याच्या अर्थात घेतले आहे—"**इति मत्वा न सज्जते**" (३।२८) आणि भक्तिमार्गात जाणण्यालाही मानण्याच्या अर्थात घेतले आहे. (५।२९, ९।१३, १०।३, ७, २४, २७, ४१). यात एक विशेष गोष्ट समजून घेण्याची आहे की, परमात्म्याला जाणणे अथवा मानणे—दोन्हीही ज्ञानच आहे. तसेच संसाराला सत्ता देऊन संसाराला जाणणे आणि मानणे—दोन्हीही अज्ञानच आहे.

संसाराला तत्त्वाने जाणल्यावर संसाराच्या स्वतंत्र सत्तेचा अभाव होत असतो आणि परमात्म्याला तत्त्वाने

---

* वाग् गद्गदा द्रवते यस्य चित्तं रुदत्यभीक्ष्णं हसति क्वचिच्च।
विलज्ज उद्गायति नृत्यते च मद्भक्तियुक्तो भुवनं पुनाति॥ (श्रीमद्भा० ११।१४।२४)

ज्याची वाणी माझे नाम, गुण, लीलांचे वर्णन करत करत गद्गद होत असते, ज्याचे चित्त माझे रूप, गुण, प्रभाव आणि लीलांना स्मरण करत करत द्रवित होते, जो वारंवार रडत असतो, कधी कधी हसूही लागतो, कधी लाज सोडून उच्च स्वरात गाऊही लागतो, कधी नाचूही लागतो, असा माझा भक्त साऱ्या संसाराला पवित्र करत असतो.

जाणल्यावर परमात्म्याचा अनुभव होतो. तसेच संसार भगवत्स्वरूप आहे—असे दृढतेने मानल्यावर संसाराच्या स्वतंत्र सत्तेचा अभाव होतो आणि मग संसार संसाररूपाने न दिसता भगवत्स्वरूप दिसू लागतो. तात्पर्य परमात्मतत्त्वाचा अनुभव झाल्यावर जाणणे आणि मानणे दोन्ही एक होतात.

**''इति ज्ञानवान्मां प्रपद्यते''**—जे प्रतिक्षण बदलणाऱ्या संसाराच्या सत्तेला मानतात ते अज्ञानी आहेत, मूर्ख आहेत परंतु ज्यांची दृष्टी कधी न बदलणाऱ्या भगवत्तत्त्वाकडे राहते ते ज्ञानी आणि मोहरहित आहेत.

**''ज्ञानवान्''** म्हणण्याचे तात्पर्य, ते तत्त्वाने समजतात की, सर्व ठिकाणी, सर्वात आणि सर्व रूपात वस्तुतः एक भगवान्‌च आहेत. अशा ज्ञानवानालाच पुढे पंधराव्या अध्यायाच्या एकोणीसाव्या श्लोकात **''सर्ववित्''** म्हटले गेले आहे.

ज्ञानवानाची शरणागती अर्थार्थी, आर्त आणि जिज्ञासू भक्ताप्रमाणे नसते. भगवंताने ज्ञान्याला आपला आत्मा मानले आहे. **''ज्ञानी त्वात्मैव मे मतम्''** (७।१८) जर ज्ञानी भगवंताचा आत्मा झाला तर ज्ञान्याचा आत्मा भगवान् झाले. म्हणून एका भगवत्तत्त्वाशिवाय दुसरी सत्ताच राहिली नाही. म्हणून ज्ञान्याची शरणागती त्या तिन्ही भक्तांपेक्षा विलक्षण असते. त्याच्या अनुभवात एका भगवत्तत्त्वाशिवाय दुसरी कोणतीच सत्ता नसते. हीच त्याची शरणागती आहे.

भगवंताच्या दृष्टीने आपल्याशिवाय दुसरे कोणते तत्त्व नाहीच. **''मयि सर्वमिदं प्रोतं सूत्रे मणिगणा इव''** (७।७) जसे सुताच्या माळेत मण्याऐवजी सुताच्या गाठी मारल्या तर माळेत सुताशिवाय काय राहिले? केवळ सुतच राहिले. मात्र दिसण्यात गाठी वेगळ्या दिसतील आणि दोरा वेगळा, दिसेल. परंतु तत्त्वाने एकच वस्तू (सुत) असते. तसेच परमात्मा संसारात व्यापून आहेत, परंतु तत्त्वदृष्टीने परमात्मा आणि संसार एकच आहे. त्यांचे ठिकाणी व्याप्य व्यापक भाव नसतो. म्हणून सर्व काही एक वासुदेवच आहे. असा ज्याचा अनुभव असतो तोही भगवत्स्वरूपच झाला. भगवत्स्वरूप होणे हीच त्याची शरणागती आहे.

**स महात्मा सुदुर्लभः**—पुष्कळसे लोक तर ''आपल्याला परमात्म्याची प्राप्ती करायची आहे'' याकडे दृष्टीच ठेवत नाहीत आणि असे इच्छितही नाहीत. जे इकडे लक्ष देतात तेही उत्कंठेने अनन्यभावाने आपल्या जीवनाला सफल करण्यास प्रवृत्त होत नाहीत. जे आपल्या कल्याणासाठी व्यस्त असतात तेही मूर्खतेमुळे परमात्मप्राप्तीपासून निराश होऊन आपल्या मिळालेल्या संधीला गमावून बसतात, ज्यामुळे ते परम लाभापासून वंचित राहतात.

याच अध्यायाच्या तीसऱ्या श्लोकात भगवंतांनी म्हटले आहे की, मनुष्यात हजारो आणि हजारोत कोणी एखादा मनुष्य वास्तविक सिद्धीसाठी प्रयत्न करतो. प्रयत्न करणाऱ्या त्या सिद्ध साधकातही कोणी एखादा मनुष्य ''सर्व काही वासुदेवच आहे'' असे तत्त्वाने जाणतो. असे तत्त्वाने जाणणारा महात्मा अत्यंत दुर्लभ आहे. याचे तात्पर्य असे नाही की, परमात्मा दुर्लभ आहे तर शुद्ध अंतःकरणाने परमात्मप्राप्तीसाठी प्रयत्न करणारे दुर्लभ आहेत. शुद्ध अंतःकरणाने परमात्मप्राप्तीसाठी प्रयत्न केल्यावर मनुष्यमात्राला परमात्मप्राप्ती होऊ शकते, कारण त्याच्या प्राप्तीसाठीच हे मनुष्यशरीर मिळाले आहे.

संसारात सगळी माणसे धनी होऊ शकत नाहीत. सांसारिक भोगसामुग्री सर्वांना सारखी मिळू शकत नाही. परंतु परमात्मतत्त्व जे भगवान् शंकर यांना प्राप्त झाले आहे, सनकादिकांना प्राप्त झाले आहे, नारद, वसिष्ठ इत्यादी देवर्षी, महर्षी यांना प्राप्त झाले आहे तेच तत्त्व सर्व मनुष्यांना समानरूपाने अवश्य प्राप्त होऊ शकते. म्हणून मनुष्याने अशी दुर्लभ संधी कधीही व्यर्थ घालवू नये.

भगवंताची ही एक अलौकिक विलक्षणता आहे की, ते भुकेल्याला अन्नरूपाने, तहानेल्याला पाणीरूपाने आणि विषयी मनुष्यासाठी शब्द, स्पर्श, रूप, रस आणि गंध या रूपाने समोर येतात. तेच मन, बुद्धी, इंद्रिय होतात. तेच संकल्प-विकल्परूप धारण करतात, तेच व्यक्तिरूपाने येतात. परंतु त्याबरोबरच दुःखरूपाने येऊन मनुष्याला चेतवितात की, जर तुम्ही या वस्तू भोग्य मानून यांचे भोक्ते व्हाल तर यांच्या फलरूपाने तुम्हाला दुःखच दुःख भोगावे लागेल. म्हणून मनुष्याला शरम वाटली पाहिजे की, मी भगवंताला भोगसामुग्री करत आहे, माझ्या सुखासाठी भगवंताला सुखाची सामुग्री व्हावे लागत आहे. भगवान् किती विशेष दयाळू आहेत की, हा प्राणी ज्याची इच्छा करतो तसेच ते बनतात.

पाहण्यात, ऐकण्यात आणि समजण्यात जे काही येत आहे आणि जे मन, बुद्धी, इंद्रियाचा विषय नाही ते सर्व भगवान्‌च आहेत आणि भगवंताचेच आहे असे मानले, वास्तविकतेने अनुभव घेतला तर मनुष्य विलक्षण होतो, **''स महात्मा सुदुर्लभः''** होतो.

एक बैरागी होते. ते गणपतीची पूजा करत असत. त्यांच्याजवळ सोन्याची बनविलेली एक गणपतीची आणि एक उंदराची मूर्ती होती. त्या दोन्ही मूर्ती वजनात सारख्या

होत्या. एकदा त्यांना तीर्थ यात्रेला जावयाचे होते. मूर्ती विक्री करण्याच्या हेतूने ते सोनाराकडे गेले. सोनाराने त्या मूर्तीचे वजन करून दोन्हींची किंमत एकच सांगितली. तेव्हा बैरागी बाबा रागावले व म्हणाले ''गणपती देव आहे आणि उंदीर त्यांचे वाहन आहे तेव्हा दोन्हींची किंमत सारखी कशी?'' सोनार म्हणाला ''बाबाजी! मी गणपती आणि उंदीर खरेदी करत नाही तर सोने खरेदी करत आहे. सोन्याचे जितके वजन असेल तितकेच त्याचे मूल्य राहील'' जर सोनार गणपती आणि उंदीर यांना पाहील तर त्याला सोने दिसणार नाही आणि जर सोन्याला पाहील तर त्याला गणपती आणि उंदीर दिसणार नाही. म्हणून सोनार गणपतीलाही पाहत नाही आणि उंदीरही पाहत नाही. तो तर केवळ सोनेच पाहतो. त्याचप्रमाणे भगवंताशी अभिन्न झालेला महात्मा संसाराला पाहत नाही, तर तो केवळ भगवंतालाच पाहतो.

कोणी एक महात्मा संत रस्त्याने जाताना एका शेतात लघुशंका करावयास बसले. त्या शेताच्या मालकाने त्यांना पाहिले तर ''टरबुज चोरणारा हाच माणूस आहे'' असे समजून पाठीमागून येऊन त्यांच्या डोक्यात त्याने काठी मारली. नंतर त्यांना पाहिल्यावर हे तर कोणी बाबाजी आहेत म्हणून त्याने हात जोडून म्हटले ''महाराज! मी आपल्याला ओळखले नाही आणि चोर समजून काठी मारली तेव्हा मला क्षमा करा'' संत म्हणाले ''क्षमा काय म्हणून करायची? तू मला मारले नाहीस तर चोराला मारले आहेस.'' शेतकरी म्हणाला—''आता काय करू महाराज?'' संत म्हणाले ''तुला जसे करायचे असेल तसे कर''. त्याने संताना बैल गाडीत नेऊन इस्पीतळात भरती केले. तेथे मलमपट्टी केल्यावर कोणी एक माणूस दूध घेऊन आला आणि म्हणाला—''महाराज! दूध घ्या''. संत म्हणाले ''तू मोठा चलाख आणि हुषार दिसतोस. तुझी विचित्र विचित्र रूपे आहेत, तू विचित्र विचित्र लीला करतोस, प्रथम तर तू लाठीने मारलेस आणि आता दूध घ्या म्हणतोस''. तो माणूस घाबरला आणि म्हणू लागला ''बाबाजी! मी मारले नाही''. संत म्हणाले ''अगदी खोटी गोष्ट आहे. मी ओळखतो तूच होतास. तूच मारलेस. तुझ्याशिवाय कोण आले? कोठून आले? कसे आले? पहिल्यांदा लाठीने मारलेस आणि आता दूध पाजण्यास आला आहेस. मी दूध तर पितो पण होतास तूच!'' अशा रीतीने संत आपल्या ''**वासुदेवःसर्वम्**'' च्या भाषेत बोलत होते आणि तो माणूस घाबरलेला होता की, बाबाजी आपल्याला कोठे फसवून देऊ नयेत! तात्पर्य संत केवळ भगवंतालाच पाहतात. लाठीने मारणारा, मलमपट्टी करणारा आणि दूध पाजणारा सर्व काही तोच आहे.

## महात्म्यांचा महिमा

ज्या ठिकाणी संत महात्म्यांचे वर्णन येते त्या ठिकाणी म्हटले गेले आहे.

(१) जे उच्च दर्जाचे तत्त्वज्ञ जीवन्मुक्त महापुरुष असतात ते अभिन्नभावाने आणि अखंडरूपाने केवळ आपल्या स्वरूपात अथवा भगवत्तत्त्वात स्थित राहतात त्यांचे जीवन, दर्शन, चिंतन, त्यांच्या शरीरावरुन आलेल्या वायूचा स्पर्श यांनी जीवांचे कल्याण होत असते.

(२) जे मनुष्य त्या महापुरुषांच्या माहात्म्याला जाणत नाहीत त्यांच्यासमोर ते महापुरुष आपल्या भावाहून खालच्या पातळीवर येतात आणि असे काही सांगत असतात की, जसे—''संत महात्म्यांनी असे केले. त्यांनी सांगितलेल्या वचनानुसार आणि केलेल्या आचरणानुसार शास्त्र तयार होतात'', इत्यादी.

(३) जेव्हा ते यापेक्षाही खाली उतरतात तेव्हा म्हणतात की ''संत महात्म्यांच्या आज्ञेचे पालन केले पाहिजे.''

(४) ज्यांचेकडून उपर्युक्त गोष्टीचे पालन होत नाही त्या साधकासमोर ते स्वत:असे विधान करतात की, ''असे करत जावे आणि असे करू नये.''

(५) जेव्हा ते यापेक्षाही खाली उतरतात तेव्हा ''असे करा आणि असे करू नका'' अशी आज्ञा करतात.

[संतांच्या आज्ञेत जो सिद्धांत भरलेला असतो तो आज्ञापालकात उतरत असतो. त्यांच्या आज्ञा पालनाविनाही त्यांच्या सिद्धांताचे पालन करणाऱ्याचे कल्याण होते. परंतु ते महात्मा आज्ञेच्या रूपात ज्यांना जे सांगतात त्यात एक विलक्षण शक्ती निर्माण होत असते. आज्ञा पालन करणाऱ्याला कोणतेही परिश्रम करावे लागत नाहीत आणि त्याच्याद्वारा आपोआप स्वाभाविकच तसे आचरण होऊ लागते.]

(६) जे त्यांच्या आज्ञेचे पालन करत नाहीत अशा नीच दर्जाच्या साधकांना ते कधी कधी, कोठे कोठे शाप अथवा वरदान देतात.

या परंपरेत पाहिले तर (१) जे काही करत नाहीत, निरंतर आपल्या स्वरूपात स्थित राहतात हा संत महापुरूषांचा उच्च दर्जा झाला (२) शास्त्रात असे म्हटले आहे, संत-महात्म्यांनी असे केले—अशा प्रकारे संकेत केल्याने त्या संतांचा दुसरा दर्जा झाला. (३) संत महात्म्यांच्या आज्ञेचे पालन केले पाहिजे असे म्हटल्याने संतांचा तीसरा दर्जा झाला (४) असे केले पाहिजे आणि असे करता कामा नये—अशा

प्रकारचे विधान केल्याने त्या संतांचा चौथा दर्जा झाला (५) तुम्ही असे करा आणि असे करू नका. असे म्हणणे त्या संतांचा पाचवा दर्जा झाला (६) शाप आणि वरदान देणे त्या संतांचा सहावा दर्जा झाला. या सर्व दर्जांमध्ये संत महात्म्यांचे जे खाली उतरणे आहे त्यात त्यांची क्रमाने अधिकाधिक दयाळूता आहे. त्यांचे शाप आणि वरदान देण्याने, रागावण्याने त्या संताचा दर्जा तर कमी होतो. परंतु यात त्यांचा अत्यधिक त्याग आहे. कारण त्यांनी जीवाचा उद्धार करण्यासाठी नीच दर्जाचा स्वीकार केलेला असतो. यात त्यांचा स्वतःचा यत्किंचितही स्वार्थ नसतो.

त्याचप्रमाणे भगवान्‌ही आपल्या स्वरूपांत नित्य निरंतर स्थित राहत असतात. ही त्यांच्या उच्च दर्जाची गोष्ट आहे. परंतु तेच भगवंत अत्यंत कृपाळूपणाने, कृपेला वश होऊन जीवाचा उद्धार करण्यासाठी अवतार घेऊन आदर्श लीला करतात. त्यांच्या लीलांना ऐकण्या-पाहण्याने लोकांचा उद्धार होत असतो. भगवान् त्यापेक्षा खाली उतरतात तेव्हा उपदेश देतात. त्यापेक्षाही खाली उतरतात तेव्हा आज्ञा देतात. त्याहीपेक्षा खाली उतरतात तेव्हा शासन करून लोकांना सरळ वाटेवर आणतात आणि त्याहूनही अत्यंत खाली उतरतात तेव्हा शाप आणि वरदान देतात अथवा त्याच्या आणि संसाराच्या हितासाठी त्याच्या शरीराचा वियोगसुद्धा करतात.

**परिशिष्ट भाव**—सोळाव्या श्लोकात भगवंताने अर्थार्थी, आर्त, जिज्ञासू आणि ज्ञानी—या चार प्रकारच्या भक्तांद्वारा आपले भजन होण्याचा विषय सांगितला होता—'**चतुर्विधा भजन्ते माम्**'। त्यात ज्ञान्याच्या भजनाचे काय स्वरूप आहे—हे या श्लोकात सांगत आहेत की, 'सर्व काही वासुदेवच आहे'—असा अनुभव करणे हेच ज्ञान्याचे भजन आहे, शरणागती आहे. खरी शरणागती तीच आहे ज्यात शरणागताची सत्ताच न रहावी, केवळ शरण्यच रहावे.

सर्व काही भगवान्‌च आहेत—हे वास्तविक ज्ञान आहे. असा वास्तविक ज्ञान असणारा महात्मा भक्त भगवंताला शरण होतो अर्थात् आपले स्वतःचे अस्तित्व (मीपणा) समाप्त करून भगवंतात लीन होतो. मग मीपणा राहत नाही अर्थात् प्रेम करणारा राहत नाही तर केवळ प्रेमस्वरूप भगवान् राहतात, ज्यामध्ये मी-तू-हा-तो चारीही नाहीत. हेच शरणागतीचे वास्तविक स्वरूप आहे.

'महात्मा' शब्दाचा अर्थ आहे—महान् आत्मा अर्थात् अहंभाव, व्यक्तित्व, एकदेशीयतेहून सर्वथा रहित आत्मा.* ज्यात अहंभाव, व्यक्तित्व, एकदेशीयता आहे, तो 'अल्पात्मा' आहे.

येथे '**वासुदेवः**' पद पुल्लिंगात आले आहे, म्हणून येथे '**वासुदेवः सर्वः**' पद यायला पाहिजे होते. परंतु येथे '**सर्वः**' पद न देता '**सर्वम्**' पद दिले गेले आहे, जे नपुंसकलिंग आहे. जर तिन्ही लिंगांचे (**सर्वः, सर्वा** आणि **सर्वम्** यांचे) एकत्रिकरण केले गेले तर नपुंसकलिंग (सर्वम्) हेच शिल्लक राहते. नपुंसकलिंगाच्या अंतर्गत तिन्ही लिंग येतात. म्हणून '**सर्वम्**' पदामध्ये स्त्री, पुरुष आणि नपुंसक—सर्वांचा संक्षेप होतो. गीतेत जगत्, जीव आणि परमात्मा या तिन्हींसाठी पुल्लिंग, स्त्रीलिंग आणि नपुंसकलिंग—या तीनही लिंगांचा प्रयोग झाला आहे.† यापासून हे तात्पर्य निघते की, जगत्, जीव आणि परमात्मा हे तिन्हीही '**सर्वम्**' शब्दाच्या अंतर्गत आहेत, म्हणून तिन्ही लिंगांनी सांगितल्या जाणाऱ्या सर्वच्या सर्व वस्तू, व्यक्ती, परिस्थिती इत्यादी परमात्माच आहेत.

'**वासुदेवः सर्वम्**' यामध्ये '**सर्वम्**' तर असत् आहे आणि '**वासुदेवः**' सत् आहे—'**नासतो विद्यते भावो नाभावो विद्यते सतः**' (गीता २। १६) तात्पर्य हे आहे की, सत्‌च सत् आहे असत् नाहीच. वासुदेवच वासुदेव आहे '**सर्वम्**' नाहीच. परंतु सांगणाऱ्या, ऐकणाऱ्या, वाचणाऱ्या साधकांच्या दृष्टीत '**सर्वम्**' (संसार) राहतो, म्हणून भगवान् '**सर्वम्**' ची धारणा समाप्त करण्यासाठी '**वासुदेवः सर्वम्**' म्हणतात.

कर्मयोगी, ज्ञानयोगी, ध्यानयोगी, लययोगी, हठयोगी, राजयोगी, मन्त्रयोगी, अनासक्तयोगी इत्यादी अनेक प्रकारचे योगी आहेत, ज्यांचे शास्त्रांमध्ये वर्णन झाले आहे. परंतु भगवान् त्यांना अत्यंत दुर्लभ सांगत नाहीत, तर 'सर्व काही वासुदेवच आहे'—याचा अनुभव करणारा महात्माच अत्यंत दुर्लभ सांगतात.

---

* गीतेत भगवंताने 'महात्मा' शब्दाचा प्रयोग केवळ भक्तासाठीच केला आहे. जे भक्तिमार्गावर चालतात, त्या साधकांनाही महात्मा म्हटले आहे—'**महात्मानस्तु मां पार्थ दैवीं प्रकृतिमाश्रिताः**' (९। १३), जे भगवंताशी अभिन्न झाले आहेत, त्यांनाही महात्मा म्हटले आहे—'**वासुदेवः सर्वमिति स महात्मा सुदुर्लभः**' (७। १९) आणि जे परमसिद्धीला (परम प्रेमाला) प्राप्त झाले आहेत, त्यांनाही महात्मा म्हटले आहे— '**नाप्नुवन्ति महात्मानः संसिद्धिं परमां गताः**'। (८। १५) त्याचप्रमाणे गीतेमध्ये भगवंताने '**सुकृतिनः**' (७। १६), '**उदाराः**' (७। १८), '**सुदुर्लभः**' (७। १९), '**युक्ततमः**' (६। ४७, १२। २), '**अद्वेष्टा**', '**मैत्रः**', '**करुणः**' (१२। १३), '**अतीव मे प्रियाः**' (१२। २०) इत्यादी पदांचा प्रयोगही केवळ भक्तासाठीच केला आहे.

† द्रष्टव्य—'गीता-दर्पण' ग्रंथात लेख-संख्या ९९—'गीतेत ईश्वर, जीवात्मा आणि प्रकृतीची अलिंगता.'

भगवान् संपूर्ण संसाराचे बीज आहेत—'**यच्चापि सर्वभूतानां बीजं तदहमर्जुन**' (गीता १० । ३९), '**बीजं मां सर्वभूतानां विद्धि पार्थ सनातनम्**' (गीता ७ । १०) बीजापासून जितके पदार्थ उत्पन्न होतात, ते सर्व बीजरूपच असतात. जसे गव्हापासून निर्माण झालेल्या पिकालाही गहूच म्हणतात. शेतकरी लोक म्हणतात की, गव्हाचे पीक फार उत्तम आले आहे. पहा! शेतात गहू उभा आहे. गव्हाने शेत भरून गेले आहे! परंतु कोणी शहरातील निवासी व्यापारी असेल, तो त्याला गहू कसा मानील? तो म्हणेल की, मी गव्हाचे पोतेचे पोते खरेदी आणि विक्री केले आहेत. मला काय गव्हाचे ज्ञान नाही? ते तर गवत आहे. पाने-काड्या इत्यादी आहेत, हा गहू नव्हे. परंतु जाणकार शेतकरी म्हणेल की, हे ते गवत नाही जे पशूचे खाद्य असते, हा तर गहू आहे, गव्हाचे पाक गायीने खाल्ले तर म्हणतात की, तुमच्या गायीने आमचा गहू खाल्ला, परंतु तिने गव्हाचा एक दाणाही खाल्लेला नसतो. शेतात जरी गव्हाचा एक दाणाही दिसला नाही तरी तो गहू आहे—यात संदेह राहत नाही. कारण तो पूर्वीही गहूच होता, शेवटीही गहू राहील म्हणून मध्यात पिकाच्या रूपाने वेगळे दिसत असूनही गहूच आहे. आत्ता तर ते हिरवे हिरवे गवत दिसते परंतु पीक तयार झाल्यावर यातून गहूच निघेल. त्याच प्रमाणे पूर्वीही परमात्मा होते—'**सदेव सोम्येदमग्र आसीदेक मेवाद्वितीयम्**' (छान्दोग्य० ६ । २ । १), अंतीही परमात्माच राहतील—'**शिष्यते शेष संज्ञः**' (श्रीमद्भा० १० । ३ । २५). म्हणून मध्यातही सर्व काही परमात्माच आहेत—'**वासुदेवः सर्वम्**'।

जोपर्यंत साधकात अहम् आहे, तोपर्यंत तो भोगी आहे. मी योगी आहे—हा योगाचा भोग आहे मी ज्ञानी आहे—हा ज्ञानाचा भोग आहे, मी प्रेमी आहे—हा प्रेमाचा भोग आहे. जोपर्यंत साधकात भोगवृत्ती राहते, तोपर्यंत त्याच्या पतनाची संभावना राहते. जो योगाचा भोगी आहे तो कधी विषयांचा भोगीही होऊ शकतो, जो ज्ञानाचा भोगी आहे तो कधी अज्ञानाचा भोगीही होऊ शकतो आणि जो प्रेमाचा भोगी आहे तो कधी आसक्तीचा (कामाचा) भोगीही होऊ शकतो. कारण त्याच्यात पूर्वीपासून भोगाची प्रवृत्ती, सवय राहिली आहे. जेव्हा भोगी राहत नाही तेव्हा केवळ योग राहतो. योग राहिला तर मनुष्य मुक्त होतो. परंतु मुक्त झाल्यावरही महापुरुषाने ज्या साधनेने मुक्ती प्राप्त केली आहे त्या साधनेचा एक संस्कार (अहम्‌चा सूक्ष्म गंध) राहतो, जो दुसऱ्या दार्शनिकांशी एकता होऊ देत नाही. या संस्कारामुळेच दार्शनिकात आणि त्यांच्या दर्शनात मतभेद राहतो. आपल्या मताचा संस्कार दुसऱ्या दार्शनिकांच्या मतांचा समान आदर करू देत नाही. परंतु प्रतिक्षण वर्धमान असलेल्या प्रेमाची प्राप्ती झाल्यावर आपल्या मताचा संस्कारही राहत नाही आणि सर्वांशी एकता होते अर्थात् संपूर्ण मतभेद समाप्त होतात आणि '**वासुदेवः सर्वम्**' चा अनुभव होतो. वास्तविक '**वासुदेवः सर्वम्**' चा अनुभव करणारा, हे जाणणारा, सांगणारा राहतच नाही, तर एक वासुदेवच राहतो, जो अनादिकालापासून जसाच्या तसा आहे. सर्वांत परमात्मा पाहिल्याने संपूर्ण मतांत समान आदरभाव होतो, कारण आपल्या इष्ट परमात्म्याशी विरोध संभवतच नाही—'**निज प्रभुमय देखहिं जगत केहि सन करहिं बिरोध**' (मानस उत्तर० ११२ ख)

ईश्वर आणि जीवाच्या विषयात दोन प्रकारचे वर्णन आहे—(१) ईश्वर समुद्र आहे आणि जीव त्याचा तरंग आहे अर्थात् तरंग समुद्राचा आहे. (२) जीव (स्वरूप) समुद्र आहे आणि ईश्वर त्याचा तरंग आहे अर्थात् समुद्र तरंगाचा आहे. या दोन्हीपैकी तरंग समुद्राचा आहे—असे मानणेच योग्य दिसते. समुद्र तरंगाचा आहे—असे मानणे योग्य वाटत नाही. कारण समुद्र सापेक्षात नित्य आहे आणि तरंग अनित्य (क्षणभंगुर) आहे. म्हणून तरंग-समुद्राचा असतो, समुद्र तरंगाचा नसतो. जर आपणाला समुद्र आणि ईश्वराला तरंग मानले तर या मान्यतेने अनर्थ होईल, कारण असे मानल्याने अभिमान उत्पन्न होईल आणि अहम् (चिज्जडग्रंथी) तर नित्य राहील आणि ईश्वर अनित्य होईल! कारण जीवात अनादिकालापासून अहम्‌चा (व्यक्तित्वाचा) अभ्यास पडलेला आहे. म्हणून जर स्वरूपाला अहम् म्हणू तर येथे तोच अहम् येईल जो अनादिकालापासून आहे. तो अहम् समाप्त झाल्यावरच मुक्ती होते. उपर्युक्त दोन्ही प्रकाराशिवाय तीसरा एक विलक्षण प्रकार आहे की, जलतत्त्वात समुद्रही नाही आणि तरंगही नाही अर्थात् येथे समुद्र आणि तरंगाचा भेद नाही. हीच वास्तविक गोष्ट आहे. समुद्र आणि तरंग तर सापेक्ष आहेत परंतु जलतत्त्व निरपेक्ष आहे.

जसे जलतत्त्वात समुद्र, नदी, पाऊस, दव, धुके, वाफ, ढग इत्यादी सर्व समाप्त होऊन एक होतात, तसेच '**वासुदेवः सर्वम्**' मध्ये सर्वच साधन, योगमार्ग समाप्त होऊन एक (वासुदेवरूप) होतात. जसे जलतत्त्वात कोणता भेद नाही, तसेच '**वासुदेवः सर्वम्**' मध्ये कोणता भेद नाही. मतभेदाने असंतोष निर्माण होतो, परंतु '**वासुदेवः सर्वम्**' मध्ये कोणता मतभेद नसल्यामुळे सर्वांना संपूर्णपणे संतोष होतो. '**वासुदेवः सर्वम्**' मध्ये योगीही नाही, ज्ञानीही नाही, प्रेमीही नाही. म्हणून याचा अनुभव करणारा महात्मा अत्यंत दुर्लभ आहे.

एकच जल, बर्फ, धुके, ढक, गारा, पाऊस, नदी, तलाव, समुद्र इत्यादी अनेक रूपात होते. कढईत बर्फ ठेवून ती अग्नीवर

ठेवली तर बर्फ पघळून पाणी होईल. मग पाणीही वाफ होईल आणि वाफ परमाणू होऊन निराकार होईल. पाणी हेच धुकेरूपात असते, तेच ढगरूपात असते, तेच निराकाररूपात असते, तेच बर्फरूपाने असते, तेच गाररूपाने असते, तेच वर्षारूप घेऊन पृथ्वीवर वर्षते, तेच नदीरूपाने वहाते, तेच समुद्ररूपाने असते. अनेक रूपात राहूनही तत्त्व दृष्टीने जल एकच राहते. त्याचप्रमाणे एक असलेले भगवान् अनेक रूपाने बनतात. जसे जल थंडीने घट्ट होऊन बर्फ बनते आणि उष्णतेने पघळून आणि वाफ बनून परमाणुरूप होते. तसेच अज्ञानरूपी थंडीने भगवान् स्थूल व जड संसाररूपाने दिसतात आणि ज्ञानरूपी अग्नीने सूक्ष्म व चेतन वासुदेवरूपाने दिसतात. जल मग बर्फरूपाने दिसो अथवा वाफ, ढग इत्यादीरूपाने दिसो, आहे ते जलच! जलाशिवाय काही नाही. तसेच भगवान् मग संसाररूपाने दिसोत अथवा अन्यरूपात दिसोत ते भगवान्च आहेत. भगवंताशिवाय काही नाही.

साधकाकडून एक चूक होत असते की, तो स्वत:ला वेगळे ठेवून संसाराला भगवत्स्वरूप पाहण्याचा प्रयत्न करतो अर्थात् **'वासुदेवः सर्वम्'** ला आपल्या बुद्धीचा विषय बनवितो. वास्तविक दिसणारा संसारच भगवत्स्वरूप नाही तर पाहणाराही भगवत्स्वरूप आहे—**'सकलमिदमहं च वासुदेवः'**। (विष्णुपुराण ३।७।३२) म्हणून साधकाने असे मानावे की, आपल्या शरीरासह सर्व काही भगवानच आहेत अर्थात् शरीरही भगवत्स्वरूप आहे, इंद्रियेही भगवत्स्वरूप आहेत, मनही भगवत्स्वरूप आहे, बुद्धीही भगवत्स्वरूप आहे, प्राणही भगवत्स्वरूप आहे आणि अहम्ही (मीपणाही) भगवत्स्वरूप आहे. सर्व काही भगवानच आहे—हे मानण्यासाठी साधकाने बुद्धीला जोर देऊ नये, तर सहजरूपाने जसे आहे तसे स्वीकार केले पाहिजे. म्हणून श्रीमद्भगवतात आले आहे—

**सर्वं ब्रह्मात्मकं तस्य विद्ययाऽऽत्ममनीषया।**
**परिपश्यन्नुपरमेत् सर्वतो मुक्तसंशयः॥** (११।२९।१८)

जर 'सर्व काही भगवानच आहे'—असा निश्चय झाला तर साधकाने या अध्यात्मविद्याद्वारा (ब्रह्मविद्याद्वारा) सर्व प्रकाराने संशयरहित होऊन सर्व ठिकाणी भगवंताला चांगल्याप्रकारे पाहत उपराम व्हावे अर्थात् 'सर्व काही भगवान्च आहेत'—हे चिंतनही राहू नये तर साक्षात् भगवान्च दिसू लागावेत.

तात्पर्य हे आहे की, 'सर्व काही भगवान्च आहेत'—या भावापासूनही उपराम व्हावे अर्थात् द्रष्टाही (पाहणाराही) राहू नये, दृश्यही (दिसणारेही) राहू नये आणि दर्शनही (दिसण्याची वृत्तीही) राहू नये, केवळ भगवान्च रहावेत.

**'वासुदेवः सर्वम्'** चा अनुभव अनेक दृष्टिकोनातून होऊ शकतो. जसे—

(१) क्रिया, पदार्थ आणि व्यक्ती यांचा तर आदि आणि अंत होत असतो, परंतु सत्ता निरंतर जशीच्या तशीच राहते. म्हणून सर्व मनुष्यांना क्रिया, पदार्थ आणि व्यक्तीच्या अभावाचा तर अनुभव होतो. परंतु आपल्या सत्तेच्या अभावाचा अनुभव कधी कोणाला येत नाही. ह्या नित्य निरंतर राहणाऱ्या सत्तेचा अनुभव होणे विवेकाच्या दृष्टीने **'वासुदेवः सर्वम्'** आहे.

(२) सृष्टीच्या पूर्वीही केवळ भगवान् होते आणि नंतरही केवळ भगवान् राहतील, मग मध्यात भगवंताशिवाय दुसरा कसा येऊ शकतो?—हे युक्तीच्या दृष्टीने **'वासुदेवः सर्वम्'** आहे.

(३) माझे तर एक भगवान्च आहेत, भगवंताशिवाय माझे कोणी नाहीच आणि दुसरा कोणी असेल तर असो मला त्याच्याशी काय मतलब?—हे साध्या सरळ, विश्वासी भक्तांच्या दृष्टीने **'वासुदेवः सर्वम्'** आहे. जसे, व्रजामध्ये एक साधू विहीरीवर कोणाशी बोलत होता की, ब्रह्म असे असते, जीव असा असतो इत्यादी-इत्यादी. तेथे पाणी भरण्यासाठी आलेल्या एका गोपीने ह्या गोष्टी ऐकल्या तर तिने दुसऱ्या गोपीला विचारले—अरी सखी! हे ब्रह्म, जीव इत्यादी काय आहेत? ती गोपी म्हणाली की, हे आपल्या लालाचे कोणी सगे-संबंधी असतील. म्हणूनच साधूलोक त्यांची चर्चा करतात, नाही तर साधूंना लालाशिवाय ईतरांशी काय मतलब?

(४) ज्याच्या अंत: करणात भगवत्तत्त्व जाणून घेण्याची व्याकूळता आहे, दिवसा भूक लागत नाही, रात्री झोप येत नाही, तो कोण्या संताकडून ऐकून अथवा पुस्तकात वाचून दृढतापूर्वक मानतो की, सर्व काही भगवान्च आहेत. भगवान् कसे आहेत—याचे त्याला ज्ञान नाही. परंतु भगवंताशिवाय काही नाही—हे संताच्या वचनावर विश्वासाच्या दृष्टीने **'वासुदेवः सर्वम्'** आहे. संत-वचनावर प्रत्यक्षापेक्षाही अधिक विश्वास झाल्यावर मग तसेच दिसू लागते अर्थात् अनुभव होतो.

दार्शनिक दृष्टीने विचार केला तर सत्ता एकच होऊ शकते, दोन नव्हे. श्रद्धा-विश्वासाच्या (भक्तीच्या) दृष्टीने पाहिले तर सर्व काही भगवान्च आहेत, भगवंताशिवाय काही नाही. भक्ताची दृष्टी भगवंताला सोडून दुसरीकडे जातच नाही आणि भगवंताशिवाय दुसरा कोणी त्याच्या दृष्टीत येतच नाही.

***संबंध***—*जे भगवंताची महत्ता समजून भगवंताला शरण येतात, अशा भक्तांचे वर्णन सोळाव्यापासून एकोणीसाव्या श्लोकापर्यंत केल्यानंतर आता भगवान् पुढील तीन श्लोकांत देवतांना शरण होणाऱ्या माणसांचे वर्णन करतात.*

**कामैस्तैस्तैर्हृतज्ञानाः प्रपद्यन्तेऽन्यदेवताः।**
**तं तं नियममास्थाय प्रकृत्या नियताः स्वया॥ २०॥**

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **तैः, तैः** | = त्या त्या | **प्रकृत्या** | = प्रकृती अर्थात् स्वभावाला | **नियमम्** | = नियमांना |
| **कामैः** | = कामनांनी | | | **आस्थाय** | = धारण करून (स्वीकारून) |
| **हृतज्ञानाः** | = ज्यांचे ज्ञान झाकले गेले आहे, (अशी माणसे) | **नियताः** | = परवश होऊन | | |
| | | **तम्, तम्** | = त्या त्या अर्थात् देवतांच्या त्या त्या | **अन्य देवताः** | = दुसऱ्या देवतांना |
| **स्वया** | = आपापल्या | | | **प्रपद्यन्ते** | = शरण होतात* |

***व्याख्या*—कामैस्तैस्तैर्हृतज्ञानाः**—त्या त्या अर्थात् या लोकाच्या आणि परलोकाच्या कामनानी ज्यांचे ज्ञान झाकले गेले आहे, आच्छादित झालेले आहे. तात्पर्य परमात्म्याच्या प्राप्तीसाठी जे विवेकयुक्त मनुष्यशरीर मिळाले आहे, त्या शरीरात येऊन परमात्म्याची प्राप्ती न करता ते आपल्या कामनांच्या पूर्ती करण्यातच व्यस्त झालेले असतात.

संयोगजन्य सुखाच्या इच्छेला कामना म्हणतात. कामना दोन प्रकारची असते. याठिकाणचे भोग भोगण्यासाठी धन संग्रहाची कामना आणि स्वर्गादी परलोकाचे भोग भोगण्यासाठी पुण्य-संग्रहाची कामना.

धन-संग्रहाची कामना दोन प्रकारची असते. पहिली—या ठिकाणी वाटेल तसे भोग भोगावेत, वाटेल तेव्हा, वाटेल तेथे आणि वाटेल तितका पैसा खर्च करावा, सुख-आरामाने दिवस जावेत इत्यादीसाठी अर्थात् संयोगजन्य सुखासाठी धन-संग्रहाची कामना होत असते आणि दुसरी—मी श्रीमंत व्हावे, श्रीमंत म्हणून माझा मोठेपणा रहावा इत्यादीसाठी अर्थात् अभिमानजन्य सुखासाठी धन-संग्रहाची कामना होत असते. तसेच पुण्य-संग्रहाची कामनासुद्धा दोन प्रकारची असते. पहिली या ठिकाणी मी पुण्यवान् म्हणविला जावे आणि दुसरी परलोकांत मला भोग प्राप्त व्हावेत. या सर्व कामनांनी सत्-असत्, नित्य-अनित्य, सार-असार बंध-मोक्ष इत्यादीचा विवेक झाकला जातो. विवेक झाकला गेल्याने त्यांना हे समजूच शकत नाही की, ज्या पदार्थांची आपण कामना करत आहोत ते पदार्थ आपल्याबरोबर कोठपर्यंत राहतील आणि आपण त्या पदार्थाबरोबर कोठपर्यंत राहू शकू?

**प्रकृत्या नियताः स्वया**†—कामनेमुळे विवेक झाकला गेल्याने ते आपल्या प्रकृतीला परवश राहतात अर्थात् आपल्या स्वभावाला परवश राहतात. येथे "प्रकृति" शब्द व्यक्तिगत स्वभावाचा वाचक आहे. समष्टी प्रकृतीचा वाचक नव्हे. हा व्यक्तिगत स्वभाव सर्वात मुख्य असतो "**स्वभावो मूर्ध्नि वर्तते**". म्हणून व्यक्तिगत स्वभावाला कोणीही सोडू शकत नाही—"**या यस्य प्रकृतिः स्वभावजनिता केनापि न त्यज्यते**". परंतु या स्वभावात जे दोष आहेत त्यांचा तर मनुष्य त्याग करू शकतो. जर मनुष्य त्या दोषांचा त्याग करू शकला नसता तर मनुष्यजन्माचे महत्त्वच काय राहिले असते? मनुष्य आपल्या स्वभावाला निर्दोष, शुद्ध बनविण्यात पूर्णपणे स्वतंत्र आहे. परंतु जोपर्यंत मनुष्याच्या अंतःकरणात कामनापूर्तीचा उद्देश राहतो तोपर्यंत तो आपल्या स्वभावाला सुधारू शकत नाही आणि तोपर्यंतच स्वभावाची प्रबलता आणि आपल्या ठिकाणी निर्बलता दिसते. परंतु ज्याचा उद्देश कामना नष्ट करण्याचा असतो तो आपल्या प्रकृती (स्वभाव) चा सुधार करू शकतो अर्थात् त्याच्यात प्रकृतीची परवशता राहत नाही.

**तं तं नियममास्थाय**—कामनेमुळे आपल्या प्रकृतीला वश झाल्यावर मनुष्य कामनापूर्तीचे अनेक उपाय आणि विधी (नियम) शोधत राहतो. अमुक यज्ञ करण्याने कामना पूर्ण होईल की अमुक तप करण्याने? अमुक दान देण्याने कामना पूर्ण होईल का अमुक मंत्राचा जप केल्याने? इत्यादी इत्यादी उपाय शोधत राहतो. त्या उपायांचे विधी अर्थात् नियम वेग वेगळे असतात. जसे अमुक कामना पूर्तीसाठी अमुक विधीने यज्ञ इत्यादी केले पाहिजेत आणि अमुक स्थानावर केले पाहिजेत इत्यादी. अशा रीतीने मनुष्य आपल्या कामना-पूर्तीसाठी अनेक उपायांचा आणि नियमांचा स्वीकार करतो.

**प्रपद्यन्तेऽन्यदेवताः**—कामनापूर्तीसाठी अनेक उपाय आणि नियम स्वीकार करून मनुष्य अन्य देवतांना शरण

* याच अध्यायाच्या पंधराव्या श्लोकात वर्णन केलेल्या पुरुषांचे ज्ञान तर मायेने झाकलेले असते आणि येथे वर्णन केलेल्या पुरुषांचे ज्ञान कामनेने झाकलेले आहे. त्या ठिकाणचे पुरुष तर कामनापूर्तीसाठी जड पदार्थांचा आश्रय घेतात आणि येथील पुरुष कामनापूर्तीसाठी देवतांचा आश्रय घेतात. तेथील पुरुष दुष्टतेमुळे नरकात जातात आणि येथील पुरुष कामनेमुळे वारंवार जन्म-मरणाला प्राप्त होतात.

† येथे जे "प्रकृत्या नियताः स्वया" म्हटले आहे. यालाच सतराव्या अध्यायाच्या तीसऱ्या श्लोकात "यो यच्छ्रद्धः स एव सः" म्हटले आहे. "स्वया" म्हणण्याचे तात्पर्य आपापल्या प्रकृतीनुसार सर्वांच्या कामनाही वेगवेगळ्या असतात.

जातात, भगवंताना शरण जात नाहीत. येथे "**अन्यदेवताः**" म्हणण्याचे तात्पर्य, ते देवतांना भगवत्स्वरूप मानीत नाहीत तर त्यांची वेगळी सत्ता मानतात. म्हणूनच त्यांना अंत होणारे (नाशवान्) फल मिळत असते "**अन्तवत्तु फलं तेषाम्**" (७। २३). जर त्यांनी देवतांची वेगळी सत्ता न मानता त्यांना भगवत्स्वरूपच मानले तर मग त्यांना नाशवान फल मिळणार नाही तर अविनाशी फल मिळेल.

या ठिकाणी देवातांना शरण जाण्यात दोन कारण मुख्य झाले—एक कामना आणि दुसरे आपल्या स्वभावाची परवशता.

**परिशिष्ट भाव**—भगवंताच्या अर्थार्थी आणि आर्त भक्तात ज्या कामना आहेत, त्याच कामना या श्लोकात वर्णित मनुष्यातही आहेत. परंतु दोघात हा फरक आहे की, अर्थार्थी आणि आर्त भक्तात कामनेची मुख्यता नाही, तर भगवंताची मुख्यता आहे. म्हणून ते '**हृतज्ञानाः**' नाहीत. परंतु येथे वर्णित मनुष्यात कामनेची मुख्यता आहे. म्हणून हे '**हृतज्ञानाः**' आहेत.

अर्थार्थी आणि आर्त भक्त तर केवळ भगवंतालाच शरण होतात. परंतु ही माणसे भगवंताला सोडून दुसऱ्या देवतांना शरण होतात. कामना, देवता, मनुष्य आणि नियम—हे सर्व अनेक असतात. जर अनेक कामना असूनही उपास्य देव एक परमात्मा असेल तर ते उपासकाचा उद्धार करतील. परंतु कामनाही अनेक असतील आणि उपास्य देवही अनेक असतील तर उद्धार कोण करेल?

एका भगवंताशिवाय दुसरी कोणती वस्तू नाहीच—हे ज्ञान सुखाच्या कामनेमुळे झाकले जाते. ही कामना प्रकृतीकडूनही बनविलेली नाही आणि परमात्म्याकडूनही बनविलेली नाही, तर मनुष्याने स्वतः बनविली आहे. म्हणून हिला समाप्त करण्याची जवाबदारी मनुष्यावरच आहे. '**हृतज्ञानाः**' म्हणण्याचे तात्पर्य हे आहे की, हे ज्ञान नष्ट झालेले नाही कामनेमुळे झाकले गेले आहे. ही गोष्ट गीतेत '**मायया पहृतज्ञानाः**' (७। १५), '**अज्ञानेनावृतं ज्ञानम्**' (५। १५) इत्यादी पदांनीही म्हटली गेली आहे.

याच अध्यायाच्या पंधराव्या श्लोकात आलेल्या '**माययापहृतज्ञानाः**' पदात तमोगुणाची प्रधानता आणि रजोगुणाची गौणता आहे. परंतु येथे आलेल्या '**कामैस्तैस्तैर्हृतज्ञानाः**' पदात रजोगुणाची प्रधानता आणि तमोगुणाची गौणता आहे. '**माययापहृतज्ञानाः**' पदात अर्थाची इच्छा मुख्य आहे आणि '**कामैस्तैस्तैर्हृतज्ञानाः**' पदात भोगांची इच्छा मुख्य आहे. दोन्हीत फरक हा आहे की, मायेने ज्यांचे ज्ञान हरण झाले आहे अशी माणसे देवतांचे पूजन करीत नाहीत. परंतु कामनांनी ज्याचे ज्ञान हरण झाले आहे अशी माणसे देवतांचे पूजन करू शकतात. कारण अर्थापासून त्यांची अरुची होत नाही—*'जिमि प्रतिलाभ लोभ अधिकाई'* परंतु भोगापासून अरुची होतेच. '**माययापहृतज्ञानाः**' यात तर आसुरभावाचा, असत्य, कपट, बेईमानी इत्यादींचा आश्रय आहे. परंतु '**कामैस्तैस्तैर्हृतज्ञानाः**' यात देवतांचा आश्रय आहे. म्हणून '**मायया पहृतज्ञानाः**' यात तर विशेष जडता आहे. परंतु '**कामैस्तैस्तैर्हृतज्ञानाः**' यात त्यापेक्षा चेतनता आहे.*

## यो यो यां यां† तनुं भक्तः श्रद्धयार्चितुमिच्छति।
## तस्य तस्याचलां श्रद्धां तामेव विदधाम्यहम्॥ २१॥

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **यः, यः** | = जो जो | **अर्चितुम्** | = पूजन करू | **अहम्** | = मी |
| **भक्तः** | = भक्त | | | **ताम्** | = त्या |
| **याम् याम्** | = ज्या ज्या | **इच्छति** | = इच्छितो, | **श्रद्धाम्** | = श्रद्धेला |
| **तनुम्** | = देवतेचे | **तस्य, तस्य एव** | = त्या त्या देवतेतच | **अचलाम्** | = दृढ |
| **श्रद्धया** | = श्रद्धापूर्वक | | | **विदधामि** | = करतो |

*व्याख्या*— **यो यो यां यां तनुंभक्तः...तामेव विदधाम्यहम्**—जो जो मनुष्य ज्या ज्या देवतेचा भक्त होऊन श्रद्धेने यजन-पूजन करू इच्छितो त्या त्या मनुष्याची श्रद्धा त्या त्या देवतेच्या ठिकाणी मी अचल (दृढ) करून देतो. ते दुसऱ्याकडे न जाता माझ्याकडेच यावे—असे मी करीत नाही. जरी त्या त्या देवतांच्या भक्तीपासून कामना असल्या-कारणाने त्यांचे कल्याण होत नाही तरीपण मी त्यांना त्यांच्या इच्छेप्रमाणे त्या त्या देवतेकडेच जाऊ देतो. तर मग जे

* जे स्वतःला आणि दुसऱ्यालाही जाणते, ते 'चेतन' आहे आणि जे स्वतःला आणि दुसऱ्यालाही जाणत नाही ते 'जड' आहे.

†जसे येथे "यो यः यां याम्" आले आहे असेच आठव्या अध्यायाच्या सहाव्या श्लोकात "यं यं वापि स्मरन्भावम्" आले आहे. दोन वेळा "यत्" शब्दाचा अर्थात् "यो यो" "यां याम्" आणि "यं यम्" शब्दाचा प्रयोग करण्याचे तात्पर्य जसा मनुष्य उपासना करण्यात स्वतंत्र आहे अर्थात् देवतांची उपासना करा अथवा माझी उपासना करा यात स्वतंत्र आहे, तसेच अंतकाळी स्मरण करण्यातही मनुष्य संपूर्णपणे स्वतंत्र आहे, अर्थात् माझे स्मरण करा अथवा इतरांचे करा त्यात तो स्वतंत्र आहे.

माझ्याविषयी श्रद्धा-प्रेम ठेवतात, आपले कल्याण करून घेऊ इच्छितात त्यांची श्रद्धा मी माझ्याविषयी कशी दृढ करणार नाही ? अर्थात् अवश्य करेन. कारण मी प्राणीमात्राचा सुहृद आहे "**सुहृदं सर्वभूतानाम्**" (५।२९)

यावर एक शंका निर्माण होते की, आपण सर्वांची श्रद्धा आपल्याठिकाणीच का दृढ करीत नाहीत ? या संबंधात भगवान् जणू हे म्हणतात की, जर मी सर्वांची श्रद्धा आपल्या ठिकाणी दृढ करू तर मनुष्यजन्माची स्वतंत्रता, सार्थकता-च कुठे राहिली ? तसेच माझ्या स्वार्थपरतेचा त्याग कुठे झाला ? जर लोकांना मी आपल्या ठिकाणीच श्रद्धा ठेवण्याचा आग्रह धरेन, तर ही काही फार मोठी गोष्ट नव्हे. कारण असे वर्तन तर जगातील सर्व स्वार्थी जीवांचे स्वाभाविक असते म्हणून मी अशा स्वार्थीपणाचा भाव नष्ट करून असा स्वभाव ठेवण्यास शिकवतो की, कोणताही मनुष्य पक्षपात करून दुसऱ्याकडून केवळ आपली पूजा प्रतिष्ठा करवून घेण्यातच व्यस्त राहू नये आणि कोणालाही पराधीन करू नये.

आता दुसरी शंका ही की, आपण त्यांची श्रद्धा त्या देवतेकडे दृढ करता यावरुन आपली साधूता तर सिद्ध झाली पण त्या जीवांचे आपल्यापासून विमुख होण्याने अहितच झाले की नाही ? याचे समाधान असे आहे की, जर मी त्यांची श्रद्धा दुसऱ्याकडून कमी करून माझ्या ठिकाणी लावण्याचा भाव ठेवेन, तर त्यांची माझ्याविषयी अश्रद्धा होईल. परंतु जर मी माझ्या ठिकाणी लावण्याचा भाव ठेवला नाही आणि त्यांना स्वतंत्रता दिली तर त्या स्वतंत्रतेचा लाभ मिळालेल्यामध्ये जे बुद्धिमान् असतील ते माझ्या ह्या वर्तनाला पाहून माझ्याकडेच आकृष्ट होतील. म्हणून त्यांच्या उद्धाराची हीच रीत उत्तम आहे.

आता तीसरी शंका ही की, जर आपण स्वत:त्यांच्या श्रद्धेला दुसऱ्यांच्या ठिकाणी दृढ करता तर मग त्या श्रद्धेला कोणी समाप्त करूच शकत नाही. मग तर त्यांचे पतनच होत राहणार ? याचे समाधान असे आहे की, मी त्यांची श्रद्धा देवतेच्याच ठिकाणी दृढ करतो, दुसऱ्याचे ठिकाणी नव्हे असे नाही. मी तर त्यांच्या इच्छेनुसारच त्यांच्या श्रद्धेला दृढ करत असतो आणि स्वत:ची इच्छा बदलण्यात मनुष्य स्वतंत्र आहे, योग्य आहे. इच्छा बदलण्यात ते परवश, निर्बल आणि अयोग्य नाहीत. जर इच्छा बदलण्यात ते परवश असते तर मग मनुष्यजन्माचे काय महत्त्व राहिले ? आणि इच्छेचा (कामना) त्याग करण्याची आज्ञाही मी कशी करू शकत होतो—"**जहि शत्रुं महाबाहो कामरूपं दुरासदम्**" (३।४३) ?

**परिशिष्ट भाव**—बहुधा माणसे दुसऱ्या माणसांना आपल्याकडे लावू इच्छितात, आपला शिष्य अथवा दास बनवू इच्छितात, आपल्या सांप्रदायात आणू इच्छितात, आपल्यात श्रद्धा करवू इच्छितात, आपले पूजन, आदर, मान-सन्मान करवू इच्छितात, आपले म्हणणे स्वीकार करवू इच्छितात. परंतु भगवान् सर्वोपरी असूनही कोणाला आपल्या अधीन करू इच्छित नाहीत, तर जो जेथे श्रद्धा ठेवतो तिथेच ती दृढ करतात—ही भगवंताची केवढी उदारता आहे, निष्पक्षता आहे !

भगवंताच्या दृष्टीत सर्व काही त्यांचेच स्वरूप आहे—'**मत्तः परतरं नान्यत्किञ्चिदस्ति**'। म्हणून भगवंतामध्ये कोणाविषयी किंचिन्मात्रही पक्षपात नाही. परंतु भगवंताचा हा पक्षपातरहित स्वभाव सहजच समजत नाही, तर सखोल विचार केल्यावरच समजतो. जर हा स्वभाव कोणाला समजला तर तो भगवंताचा भक्त होतो—

**उमा राम सुभाउ जेहिं जाना। ताहि भजनु तजि भाव न आना॥**

(मानस सुंदर० ३४। २)

**स सर्वविद्भजति मां सर्वभावेन भारत॥** (गीता १५। १९)

दुसऱ्याला आपला दास तोच बनवितो, ज्याच्यात काही उणीव आहे. भगवंतात कोणती कमी नाहीच. म्हणून ते आपल्याकडून कोणाला आपला दास (अधीन) कसे बनवू शकतात ? परंतु कोणी त्यांचा दास बनू इच्छिल तर ते मना करीत नाहीत आणि दयापूर्वक त्याला दास स्वीकार करतात. ही त्यांची विशेष उदारता आहे. जसे छोट्याशा बालकाला पाहून कोणी व्यक्ती प्रसन्न होतो तर याचा असा अर्थ नाही की, त्या बालकाशी त्याचा कोणता स्वार्थभाव आहे. तसेच जो भगवंताचा दास बनतो, त्याच्या सरळभावाने भगवान् प्रसन्न होतात—*'मोरे अधिक दास पर प्रीती'* (मानस उत्तर० १६। ४). गीतेच्या आठराव्या अध्यायात जेव्हा भगवान्द्वारा '**यथेच्छसि तथा कुरू**' ऐकून अर्जुन घाबरले तेव्हा भगवान् दयापरवश अर्जुनला म्हणाले की, तू मला शरण हो—'**मामेकं शरणं व्रज**' (१८। ६६). परंतु असे म्हणण्यापूर्वी भगवान् म्हणाले की, ही सर्वांपेक्षा अत्यंत गोपनीय गोष्ट आहे (१८। ६४) आणि नंतरही म्हणाले की, हे प्रत्येकास सांगू नकोस. (१८। ६७) यावरुन सिद्ध होते की, दुसऱ्याला आपला दास बनविण्याचा इरादा नसूनही जर दुसरा कोणता आधार न मिळाल्यामुळे मनुष्य घाबरला आणि त्यांचा दास होऊ इच्छिल तर भगवान् दयापरवश त्याचा स्वीकार करतात. तात्पर्य हे झाले की, जो कोण्या देवतेवर श्रद्धा ठेवतो, त्याच्या श्रद्धेला भगवान्

त्या देवतेतच दृढ करतात आणि जे भगवंतावर श्रद्धा ठेवतात, त्याच्या श्रद्धेला भगवान् आपल्यात दृढ करतील—यात संदेहच कोणता आहे! कारण भगवंताची दृष्टी भक्ताच्या हितासाठीच असते, आपल्या स्वार्थासाठी नव्हे.

**स तया श्रद्धया युक्तस्तस्याराधनमीहते।**
**लभते च ततः कामान्मयैव विहितान्हि तान्॥ २२॥**

| | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|
| **तया** | = त्या (माझ्याद्वारा दृढ केलेल्या) | | **आराधनम्** | = (सकामभावपूर्वक) उपासना | | **लभते** | = पूर्णही होते, |
| | | | | | | **हि** | = परंतु |
| **श्रद्धया** | = श्रद्धेने | | **ईहते** | = करतो | | **तान्** | = ती कामनापूर्ती |
| **युक्तः** | = युक्त होऊन | | **च** | = आणि | | **मया एव** | = माझ्याद्वाराच |
| **सः** | = तो मनुष्य | | **ततः** | = त्याची | | **विहितान्** | = विहित केलेली असते |
| **तस्य** | = त्या देवतेची | | **कामान्** | = ती कामना | | | |

*व्याख्या*— **स तया श्रद्धया युक्तः .....मयैव विहितान्हि तान्**—माझ्याकडून दृढ केलेल्या श्रद्धेने संपन्न होऊन तो मनुष्य त्या देवतेच्या आराधनेचा प्रयत्न करत असतो आणि त्या देवतेकडून ज्या कामनापूर्तीची आशा ठेवतो त्या कामनेची पूर्ती होत असते. वास्तविक पाहिले तर त्या कामनेची पूर्ती माझ्याकडूनच झालेली असते. परंतु तो त्या देवतेकडूनच पूर्ण झालेली मानतो. वास्तविक देवतांच्या ठिकाणी माझीच शक्ती असते. आणि माझ्याच विधानाने ते त्यांची कामनापूर्ती करतात.

जसे सरकारी अधिकाऱ्यांना एक सीमित अधिकार दिलेला असतो की, तुम्ही अमुक विभागात अमुक प्रसंगी इतका खर्च करू शकता, इतके बक्षिस देऊ शकता. तसेच देवतांच्या ठिकाणी एका मर्यादेपर्यंतच देण्याची शक्ती असते म्हणून ते तितकेच देऊ शकतात अधिक नव्हे. देवतांच्या ठिकाणी अधिकाती अधिक एवढी शक्ती असते की, ते आपापल्या उपासकांना आपापल्या लोकांत घेऊन जाऊ शकतात. परंतु आपल्या उपासनेचे फल भोगल्यावर त्यांना तेथून परत संसारात यावे लागते (८।१६)

येथे "**मयैव**" म्हणण्याचे तात्पर्य संसारात आपोआप जे काही संचालन होत आहे ते सर्व मीच केलेले आहे. म्हणून ज्या कोणाला जे काही मिळत असते ते सर्व माझ्या विधानानुसारच मिळत असते. कारण माझ्याशिवाय विधान करणारा दुसरा कोणीच नाही. जर एखादा मनुष्य ह्या रहस्याला समजून घेईल तर मग तो माझ्याकडेच ओढला जाईल.

**परिशिष्ट भाव**—भगवंताने सर्व देवतांना वेगळे-वेगळे आणि सीमित अधिकार दिले आहेत. परंतु भगवंताचा अधिकार असीम आहे. भगवंतात ही विशेषता आहे की, ते कोणावर शासन करीत नाहीत, कोणाला आपला दास बनवीत नाहीत, कोणाला आपला शिष्य बनवीत नाहीत, तर प्रत्येकाला आपला मित्र बनवितात, आपल्यासारखे बनवितात. जसे निषादराज सिद्ध भक्त होता, बिभीषण साधक होता आणि सुग्रीव विषयी होता. परंतु भगवान् श्रीरामाने तिघांनाही आपला सखा बनविले. ही विशेषता देवता इत्यादी कोणातही नाही. म्हणून वेदांमध्येही भगवंताला जीवाचा सखा म्हटले गेले आहे—

**द्वा सुपर्णा सयुजा सखाया समानं वृक्षं परिषस्वजाते।**

(मुण्डक० ३।१।१, श्वेता० ४।४)

गीतेतही भगवंताने अर्जुनाला म्हटले आहे—'**भक्तोऽसि मे सखा चेति**' (४।३). येथे भगवंताने 'भक्त' तर अर्जुनच्या दृष्टीने म्हटले आहे.* परंतु आपल्या दृष्टीने 'सखा' म्हटले आहे. '**ममैवांशो जीवलोके**' (१५।७)—या पदात ही भगवंताने '**एव**' पदाने जीवाला साक्षात आपले स्वरूप सांगितले आहे. हा माझाच अंश आहे—असे म्हणण्याचे तात्पर्य हे आहे की, यात प्रकृतीचा अंश मुळीच नाही.

***संबंध***—*आता भगवान् उपासनेनुसार फलाचे वर्णन करत आहेत.*

**अन्तवत्तु फलं तेषां तद्भवत्यल्पमेधसाम्।**
**देवान्देवयजो यान्ति मद्भक्ता यान्ति मामपि॥ २३॥**

* अर्जुनाच्या दृष्टीने यासाठी 'भक्त' म्हटले आहे की, अर्जुनाने भगवंताची शरणागती स्वीकार केली होती—'शाधि मां त्वां प्रपन्नम्'। (गीता २।७)

| | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|
| **तु** | = परंतु | **फलम्** | = फल | **देवान्** | = देवतांना |
| **तेषाम्** | = त्या | **अन्तवत्** | = अंत असणारेच (नाशवानच) | **यान्ति** | = प्राप्त होतात (आणि) |
| **अल्पमेधसाम्** | = अल्पबुद्धी असणाऱ्या मनुष्यांना | **भवति** | = मिळते | **मद्भक्ताः** | = माझे भक्त |
| **तत्** | = त्या देवतांच्या आराधनेचे | **देव यजः** | = देवतांचे पूजन करणारे | **माम् अपि** | = मलाच |
| | | | | **यान्ति** | = प्राप्त होतात |

*व्याख्या*—**अन्तवत्तु फलं तेषां तद्भवत्यल्पमेधसाम्**—देवतांची उपासना करणाऱ्या अल्पबुद्धी असणाऱ्या माणसांना समाप्त होणारे अर्थात् सीमित आणि नाशवान् फल मिळत असते. येथे शंका होते की, भगवंतद्वारा विधान केलेले फल तर नित्यच असावयास पाहिजे मग त्यांना अनित्य फल का मिळते? याचे समाधान असे की, एक तर त्याचे ठिकाणी नाशवान् पदार्थांची कामना असते आणि दुसरी गोष्ट ते देवतांना भगवंतापेक्षा वेगळे मानतात. म्हणून त्यांना नाशवान् फल मिळते. परंतु त्यांना दोन उपायांनी अविनाशी फल मिळू शकते. एक तर त्यांनी कामना न ठेवता (निष्कामभावनेने) देवतांची उपासना करावी तर त्यांना अविनाशी फल मिळेल आणि दुसरे त्यांनी देवतांना भगवंतापेक्षा वेगळे न समजता अर्थात् भगवत्स्वरूपच समजून त्यांची उपासना करावी, म्हणजे जरी कामना राहिली तरीही योग्य काळी त्यांना अविनाशी फल मिळू शकते अर्थात् भगत्प्राप्ती होऊ शकते.

येथे "**तत्**" म्हणण्याचे तात्पर्य फल तर मी विधान केलेलेच मिळत असते परंतु कामना असल्याने ते नाशवान् होत असते.

या ठिकाणी "**अल्पमेधसाम्**" म्हणण्याचे तात्पर्य त्यांना नियम तर अधिक पाळावे लागतात तसेच विधी विधानही अधिक करावे लागतात परंतु फल मात्र मर्यादित आणि नाशवान् मिळत असते. परंतु माझी आराधना करण्यात इतक्या नियमांची आवश्यकता लागत नाही तसेच तितक्या विधी विधानांचीही जरूरी लागत नाही परंतु फल मात्र अमर्यादित आणि अविनाशी मिळत असते. या रीतीने देवतांच्या उपासनेत नियम अधिक फल मात्र थोडे आणि जन्म-मरणरूपी बंधन होते आणि माझ्या आराधनेत नियम कमी, फल अधिक आणि कल्याण होत असते. असे असूनही ते त्या देवतांच्या उपासनेत लागतात आणि माझ्या उपासनेत लागत नाहीत. म्हणून त्यांची बुद्धी अल्प असते, तुच्छ असते.

**देवान्देवयजो यान्ति मद्भक्ता यान्ति मामपि**—देवतांचे पूजक देवतांना प्राप्त होतात आणि माझे पूजक मलाच प्राप्त होतात. येथे "अपि" पदाने हे सिद्ध होते की, माझी उपासना करणाऱ्यांची कामनापूर्तीही होऊ शकते आणि माझी प्राप्ती तर होतेच अर्थात् माझे भक्त सकाम असोत अथवा निष्काम; ते सर्वचे सर्व मलाच प्राप्त होतात. परंतु भगवंताच्या उपासकांच्या सर्व कामना पूर्ण होतीलच, हा काही नियम नाही. भगवंताला योग्य वाटेल तर पूर्णही करतात अथवा करतही नाहीत अर्थात् त्यांचे हित होत असेल तर पूर्ण करतात आणि अहित होत असेल तर कितीही टाहो फोडला अथवा धावा केला तरी पूर्ण करत नाहीत.

हा नियम आहे की, भगवंताचे भजन केल्याने भगवंताच्या नित्यसंबंधाची स्मृती होत असते. कारण भगवंताचा संबंध नित्य राहणारा आहे. म्हणून भगवंताची प्राप्ती झाल्यावर मग पुनः संसारामध्ये परत यावे लागत नाही. "**यद्गत्वा न निवर्तन्ते**" (१५।६) परंतु देवतांचा संबंध नित्य राहणारा नाही. कारण तो कर्मजन्य आहे. म्हणून देवता- लोकाची प्राप्ती झाल्यावर संसारात परत यावेच लागते—"**क्षीणे पुण्ये मर्त्यलोकं विशन्ति**" (९।२१) माझे भजन करणारे मलाच प्राप्त होतात—याच भावनेने भगवंतांनी अर्थार्थी, आर्त, जिज्ञासू आणि ज्ञानी—या चारही प्रकारच्या भक्तांना सुकृती आणि उदार म्हटले आहे (७।१६, १८)

येथे "**मद्भक्ता यान्ति मामपि**" चे तात्पर्य जीव कशाही आचरणाचा का असेना अर्थात् तो अत्यंत दुराचारी का असेना पण शेवटी माझाच तर अंश आहे. त्याने केवळ आसक्ती आणि आग्रहाने संसाराशी संबंध जोडला आहे. जर संसाराची आसक्ती आणि आग्रह नसेल तर, त्याला माझीच प्राप्ती होईल.

## विशेष गोष्ट

सर्व काही भगवत्स्वरूपच आहे आणि भगवंताचे विधानही भगवत्स्वरूप आहे—असे असतानाही भगवंतापेक्षा संसाराची सत्ता भिन्न मानणे आणि आपली कामना ठेवणे हे दोन्हीही पतनाला कारण आहेत. यापैकी जर कामना संपूर्णपणे नष्ट झाली, तर संसार भगवत्स्वरूप दिसू लागेल आणि जर संसार भगवत्स्वरूप दिसू लागला तर कामना नष्ट होईल. मग मात्र केवळ क्रियेद्वाराच भगवंताची सेवा होऊ लागेल. जर संसाराचे भगवत्स्वरूप दिसणे आणि

कामना नष्ट होणे दोन्ही बरोबरच झाले तर मग काय सांगावयाचे आहे ?

**परिशिष्ट भाव**—देवतांची उपासना करणारे तर अधिकाती-अधिक देवतांच्या पुनरावर्ती लोकातच जाऊ शकतात. परंतु भगवंताची उपासना करणारे भगवंतालाच प्राप्त होतात. हां, जर साधकाची देवतांमध्ये भगवद्बुद्धी असेल अथवा स्वत: निष्कामभाव असेल तर त्याचा उद्धार होईल अर्थात् तोही भगवंताला प्राप्त होईल. परंतु देवतांमध्ये भगवद्बुद्धी नसेल आणि स्वत:मध्ये निष्कामभावही नसेल तर उद्धार होणार नाही.

देवतांच्या उपासनेचा दोष हा आहे की, त्याचे फल अंत करणारे अर्थात् नाशवान असते. कारण देवता स्वत:च सीमित अधिकार असणाऱ्या आहेत. म्हणून जे भगवंताला सोडून ईतर देवतांची उपासना करतात, ते अल्पबुद्धी असणारे आहेत. जर ते अल्पबुद्धी असणारे नसते तर त्यांनी नाशवान फल देणाऱ्या देवतांची उपासना का केली असती ? भगवंताचीच उपासना केली असती अथवा देवतांमध्ये भगवद्बुद्धी केली असती. भगवंताची उपासना तर फार सुगम आहे, त्यात विधीची, नियमाची, परिश्रमाची जरूरी नाही. त्यात तर केवळ भावाचीच प्रधानता आहे. परंतु देवतांच्या उपासनेत क्रिया, विधी आणि पदार्थ यांची प्रधानता आहे.

मनुष्याला संसारातील कितीही विद्यांचे, कला-कौशल्य इत्यादींचे ज्ञान झाले तरीही तो '**अल्पमेधा**' च (अल्पबुद्धी असणाराच) आहे. ते ज्ञान वास्तविक अज्ञानाला दृढ करणारे आहे. परंतु ज्याने भगवंताला जाणले, त्याला कोणत्या सांसारिक विद्या, कला-कौशल्य इत्यादींचे ज्ञान झाले नसेल तरीही तो '**सर्ववित्**' सर्वकाही जाणणारा आहे. (१५। १९)

***संबंध***—*जरी देवतांच्या उपासनेचे फल मर्यादित आणि नाशवान् असते तरीही माणसे त्यातच का घोटाळतात? भगवंताकडे का आकृष्ट होत नाहीत? याचे उत्तर पुढील श्लोकात देतात.*

**अव्यक्तं व्यक्तिमापन्नं मन्यन्ते मामबुद्धयः।**
**परं भावमजानन्तो ममाव्ययमनुत्तमम्॥ २४॥**

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **अबुद्धयः** | = बुद्धिहीन माणसे | **भावम्** | = भावाला | **माम्** | = मला (सच्चिदानन्दघन परमात्म्याला) |
| **मम** | = माझ्या | **अजानन्तः** | = न जाणता | | |
| **परम्** | = परम, | **अव्यक्तम्** | = अव्यक्त (मन-इंद्रियांच्या पलीकडे असणाऱ्या) | **व्यक्तिम्** | = मनुष्याप्रमाणे शरीर |
| **अव्ययम्** | = अविनाशी (आणि) | | | **आपन्नम्** | = धारण करणारा |
| **अनुत्तमम्** | = सर्वश्रेष्ठ | | | **मन्यन्ते** | = मानतात. |

***व्याख्या***—**अव्यक्तं व्यक्तिमापन्नं....ममाव्ययमनुत्तमम्**—जे मनुष्य निर्बुद्ध आहेत आणि ज्यांची माझ्याठिकाणी श्रद्धा-भक्ती नाही, ते अल्पबुद्धीच्या कारणाने अर्थात् समज कमी असल्यामुळे, मला सामान्य मनुष्याप्रमाणे अव्यक्तापासून व्यक्त होणारा अर्थात् जन्मणारा आणि मरणारा मानतात. माझा जो अविनाशी अव्ययभाव आहे अर्थात् ज्याच्यापेक्षा दुसरा कोणी श्रेष्ठ असूच शकत नाही आणि जो देश, काल, वस्तू, व्यक्ती इत्यादीमध्ये परिपूर्ण राहत असून या सर्वाहून अतीत, सदा एकरूप राहणारा, निर्मळ आणि असम्बद्ध आहे—अशा माझ्या अविनाशी भावाला ते जाणत नाहीत आणि माझे अवतार घेण्याचे जे तत्त्व आहे त्याला जाणत नाहीत. म्हणून ते मला सामान्य मनुष्य समजून माझी उपासना करत नाहीत तर देवतांची उपासना करतात.

**अबुद्धयः**—या पदाचा अर्थ असा नाही की, त्यांच्या ठिकाणी बुद्धीचा अभाव आहे तर बुद्धीत विवेक राहत असूनही अर्थात् संसाराला उत्पत्ति-विनाशशील जाणत असूनही त्याला मानत नाहीत—हेच त्यांच्यात बुद्धिरहितपणा, मूर्खपणा आहे.

दुसारा भाव हा आहे की, कामनेला कोणी कायम ठेवू शकत नाही, कामना राहू शकत नाही. कारण कामना पूर्वी नव्हती आणि कामनापूर्ती झाल्यावरही कामना राहणार नाही. वास्तविक कामनेला सत्ताच नाही, तरीही त्याचा त्याग करू शकत नाहीत, हाच निर्बुद्धपणा आहे.

माझ्या स्वरूपाला न जाणल्याने ते इतर देवतांच्या उपासनेत व्यस्त झाले आणि उत्पत्ती विनाशशील पदार्थांच्या कामनेत व्यस्त झाल्याने ते बुद्धिहीन मनुष्य माझ्यापासून विन्मुख झाले. जरी ते माझ्यापासून वेगळे होऊ शकत नाहीत तसेच मीही त्यांच्यापासून वेगळा होऊ शकत नाही., तरी-पण कामनेमुळे ज्ञान झाकले गेल्याने ते देवतांकडे ओढले जातात. जर त्यांनी मला जाणले असते तर मग केवळ माझेच भजन त्यांनी केले असते.

(१) जी माणसे भगवंताला शरण जातात ती बुद्धिवान् असतात. ती भगवंतालाच सर्वश्रेष्ठ मानतात.

(२) जी देवतांना शरण जातात ती माणसे अल्पबुद्धी असतात. ती देवतांना आपल्यापेक्षा मोठे मानतात ज्यामुळे त्यांच्यात थोडी नम्रता, सरळता असते.

(३) जी माणसे भगवंताला देवतेसारखेही मानीत नाहीत तर सामान्य माणसासारखी समजतात आणि आपल्यालाच सर्वश्रेष्ठ, सर्वोपरी मानतात ती निर्बुद्ध असतात. ( १६। १४-१५) हेच तिन्हीत अंतर आहे.

**परं भावमजानन्तः**—याचे तात्पर्य, मी अज असून आणि अविनाशी असून आणि लोकांचा ईश्वर असतानाही आपल्या प्रकृतीला वश करून योगमायेने प्रगट होत असतो. ह्या माझ्या श्रेष्ठभावाला बुद्धिहीन माणसे जाणत नाहीत.

**अनुत्तमम्**—म्हणण्याचे तात्पर्य, पंधराव्या अध्यायात ज्याला क्षराहून अतीत आणि अक्षरापेक्षा उत्तम म्हटले आहे, अर्थात् ज्याच्यापेक्षा दुसरे उत्तम काहीच नाही अशा माझ्या अनुत्तमभावाला ते जाणत नाहीत.

## विशेष गोष्ट

ह्या (चोवीसाव्या) श्लोकाचा अर्थ कोणी असा करतात की, "**( ये ) अव्यक्तं मां व्यक्तिमापन्नं मन्यन्ते ( ते ) अबुद्धयः**" अर्थात् जो सदा निराकार राहणारा मला केवळ साकार मानतात, ते निर्बुद्ध आहेत, कारण ते माझ्या अव्यक्त, निर्विकार आणि निराकार स्वरूपाला जाणत नाहीत. दुसरे कोणी असा अर्थ करतात की, "**( ये ) व्यक्तिमापन्नं माम् अव्यक्तं मन्यन्ते ( ते ) अबुद्धयः**" अर्थात् मी अवतार घेऊन तुझा सारथी झालो आहे—अशा मला केवळ निराकार मानतात, ते निर्बुद्धी आहेत, कारण ते माझ्या सर्वश्रेष्ठ अविनाशी भावाला जाणत नाहीत.

उपर्युक्त दोन्ही अर्थांपैकी कोणताही अर्थ योग्य नाही, कारण असा अर्थ घेतल्यावर केवळ निराकाराला मानणारे साकाररूपाची आणि साकाररूपाच्या उपासकांची निंदा करतील आणि केवळ साकार मानणारे निराकाररूपाची आणि निराकाररूपाच्या उपासकांची निंदा करतील. हा सर्व एकदेशीयपणाच आहे.

पृथ्वी, आप, तेज, इत्यादी जी महाभूते आहेत, जी विनाशी आणि विकारी आहेत तेही दोन दोन प्रकारची असतात. स्थूल आणि सूक्ष्म. जसे स्थूलरूपाने पृथ्वी साकार आणि परमाणुरूपाने निराकार आहे. आप—बर्फ, थेंब, ढग आणि वाफरूपाने साकार आहे आणि परमाणुरूपाने निराकार आहे. तेज (अग्नितत्त्व) लाकूड आणि आगपेटी यात राहत असून निराकार आहे आणि प्रज्वलित झाल्यावर साकार होतो इत्यादी. अशा रीतीने भौतिक सृष्टीचीही दोन्ही रूपे होतात आणि दोन असूनही वास्तविक ते दोन नसतात. साकार झाल्याने निराकाराला काहीही बाधा होत नाही. मग परमात्म्याच्या साकार आणि निराकार होण्यात काय बाधा होणार? अर्थात् काहीही बाधा येत नाही. ते साकारही आहेत आणि निराकारही आहेत, सगुणही आहेत आणि निर्गुणही आहेत.

गीता साकार-निराकार, सगुण-निर्गुण दोन्हींना मानते. नवव्या अध्यायाच्या चौथ्या श्लोकात भगवंतांनी आपल्याला "अव्यक्तमूर्ति" म्हटले आहे. चौथ्या अध्यायाच्या सहाव्या श्लोकात भगवंतांनी म्हटले आहे की, "मी अज असूनही प्रगट होत असतो, अविनाशी असूनही अंतर्धान होत असतो आणि सर्वांचा ईश्वर असूनही आज्ञापालक (पुत्र अथवा शिष्य) होतो." म्हणून निराकार असताना साकार होण्यात आणि साकार असताना निराकार होण्यात भगवंताचे ठिकाणी काहीही फरक पडत नाही. अशा भगवंताच्या स्वरूपाला न जाणल्यामुळे लोक त्यांच्या विषयात निरनिराळ्या कल्पना करत असतात.

**परिशिष्ट भाव**—भगवान् व्यक्तही आहेत आणि अव्यक्तही आहेत, लौकिकही आहेत आणि अलौकिकही आहेत—**'वासुदेवः सर्वम्'** (गीता ७। १९), **'सदसच्चाहमर्जुन'**। (गीता ९। १९) परंतु बुद्धिहीन मनुष्य भगवंताला त्या प्राण्यांप्रमाणे अव्यक्तातून व्यक्त होणारा अर्थात् लौकिक (जन्मणारा-मरणारा) मानतात, ज्यांच्यासाठी भगवंताने म्हटले आहे—

**अव्यक्तादीनि भूतानि व्यक्तमध्यानि भारत।**
**अव्यक्त निधनान्येव तत्र का परिदेवना॥** (गीता २। २८)

'हे भारत! सर्वच प्राणी जन्मापूर्वी अप्रकट होते आणि मृत्यूनंतर अप्रकट होतील, केवळ मध्यातच प्रकट दिसतात. म्हणून यात शोक करण्याचे कारणच काय आहे?'

भगवान् मनुष्याप्रमाणे अव्यक्तातून व्यक्त होत नाहीत, तर अव्यक्त राहूनच व्यक्त होतात आणि व्यक्त दिसत असले तरीही अव्यक्त राहतात.

**'परम्'**—भगवान् देवतांची उपासना करणाऱ्यांना श्रद्धाही प्रदान करतात आणि त्यांच्या उपासनेचे फलही देतात—हा भगवंताचा परम अर्थात् पक्षपातरहित भाव आहे.

**'अव्ययम्'**—देवता सापेक्ष अविनाशी (अमर) आहेत, सर्वथा अविनाशी नाहीत. परंतु भगवान् निरपेक्ष अविनाशी आहेत. त्यांच्यासारखा अविनाशी दुसरा कोणी नाही आणि होऊही शकत नाही.

**'अनुत्तमम्'**—भगवान् प्राणिमात्राचे हित इच्छितात—हा भगवंताचा सर्वश्रेष्ठ भाव आहे. याहून श्रेष्ठ दुसरा कोणता भाव होऊच शकत नाही.

***संबंध***—*भगवंताला सामान्य मनुष्य मानण्याचे काय कारण आहे? यावर पुढील श्लोक सांगतात.*

**नाहं प्रकाशः सर्वस्य योगमायासमावृतः।**
**मूढोऽयं नाभिजानाति लोको मामजमव्ययम्॥ २५॥**

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **अयम्** | = हा जो मूढ | **न, अभिजानाति** | = योग्य रीतीने जाणत नाही (मानीत नाही), | **समावृतः** | = चांगल्या रीतीने झाकलेला |
| **लोकः** | = मनुष्यसमुदाय | | | **अहम्** | = मी |
| **माम्** | = मला | | | | |
| **अजम्** | = अज (आणि) | **सर्वस्य** | = त्या सर्वांच्या समोर | **प्रकाशः** | = प्रकट |
| **अव्ययम्** | = अविनाशी | **योगमाया-** | = योगमायेने | **न** | = होत नाही |

*व्याख्या*—**मूढोऽयं नाभिजानाति लोको मामजमव्यम्**—मी अज आणि अविनाशी आहे. अर्थात् जन्म-मरणरहित आहे. असे असूनही मी प्रगट आणि अंतर्धान होण्याची लीला करतो अर्थात् जेव्हा मी अवतार घेतो, तेव्हा अज (अजन्मा) असतानाही अवतार घेतो आणि अव्ययात्मा असतानाही अंतर्धान होतो. जसे सूर्य भगवान उदय होतात तेव्हा आपल्यासमोर येतात आणि अस्त होतात त्यावेळी आपल्या डोळ्याच्या समोर अदृश्य होतात, लपतात. याप्रमाणे मी प्रगट आणि अंतर्धान होण्याची लीला करत असतो. जे मला अशा प्रकारे जन्म-मरणरहित मानतात ते तर असम्मूढ आहेत (१०।३, १५।१९) परंतु जे मला सामान्य प्राण्याप्रमाणे जन्म-मरण असणारा मानतात, ते मूर्ख आहेत (९।११)

भगवंताला अज, अविनाशी न मानण्याचे कारण या मनुष्याची भगवंताशी जी स्वाभाविक आत्मीयता असते तिला विसरून तो शरीराला आपले मानतो की, "हे शरीरच मी आहे आणि हे शरीर माझे आहे." म्हणून त्याच्यासमोर पडदा आला आहे ज्यामुळे तो भगवंतालाही आपल्याप्रमाणे जन्मणारा-मरणारा मानू लागला.

मूर्ख माणसे मला अज आणि अविनाशी जाणत नाहीत. त्यांच्या न जाणण्यात दोन कारणे आहेत. एक तर माझे योगमायेच्या योगाने लपून राहणे आणि दुसरी त्यांची मूर्खता! जसे एखाद्याचे एका शहरात घर आहे आणि तो आपल्या घरात बसलेला असून दार बंद आहे. तसेच शहरातील सर्व घरे शहराच्या चार भिंतीच्या (परकोट्यात) आत असून परकोट्याचे दार बंद आहे. जर त्या मनुष्याने बाहेर निघण्याची इच्छा केली तर तो आपल्या घराच्या बाहेर पडू शकेल. परंतु परकोट्याच्या बाहेर निघणे त्याच्या आवाक्यातली गोष्ट नाही. कारण परकोट्याचे दार बंद असते. मात्र जर त्या शहराचा जो राजा असेल, तो परकोट्याचे दारही आपल्या इच्छेने उघडू शकतो आणि या व्यक्तीच्या घराचेही दार उघडू शकतो. जर हा मनुष्य आपल्या घराचे दार उघडू शकला नाही, तर राजा त्याचे दार तोडूही शकतो. तसेच हा प्राणी आपल्या मूर्खपणाला नष्ट करून आपल्या नित्य स्वरूपाला जाणून घेऊ शकतो. परंतु संपूर्णपणे भगवत्तत्त्वाचा बोध तर भगवंताच्या कृपेनेच होऊ शकतो. भगवंत ज्याला जाणून देऊ इच्छितील तोच त्यांना जाणून घेऊ शकतो—**"सोई जानइ जेहि देहु जनाई"** (मानस २।१२७।२) जर मनुष्य संपूर्णपणे भगवंताला शरण होईल तर भगवान् त्याच्या अज्ञानालाही नष्ट करून टाकतात आणि आपल्या मायेलाही बाजूला सारतात.

**नाहं प्रकाशः सर्वस्य योगमायासमावृतः**—त्या सर्वांच्यासमोर अर्थात् त्या मूर्ख समुदायासमोर मी भगवद्रूपाने प्रगट होत नाही. कारण ते मला अज, अविनाशी, भगवद्रूपाने जाणूही अथवा मानूही इच्छित नाहीत म्हणून ते मला सामान्य मनुष्य समजून माझी अवहेलना करतात. यामुळे मी त्यांच्यासमोर आपल्या भगवत्स्वरूपाने कशाला प्रगट होऊ? तात्पर्य जे मला अज, अविनाशी मानत नाहीत, तर मला जन्मणारा-मरणारा मानतात त्यांच्यासमोर मी आपल्या योगमायेने लपलेला असतो आणि सामान्य मनुष्यासारखाच राहत असतो. परंतु जे मला अज, अविनाशी आणि संपूर्ण प्राण्यांचे ईश्वर मानतात, माझ्या ठिकाणी श्रद्धा विश्वास ठेवतात, त्यांच्या भावनेनुसार मी त्यांच्यासमोर

प्रगट राहत असतो.

भगवंताची योगमाया विचित्र, विलक्षण आणि अलौकिक आहे. मनुष्याचा भगवंताचे ठिकाणी जसा भाव असतो, त्यानुसारच ते योगमाया-समावृत भगवंताला पाहतात.*

येथे भगवंतांनी म्हटले आहे की, जो मला अज, अविनाशी जाणत नाही तो मूर्ख आहे आणि दहाव्या अध्यायाच्या दुसऱ्या श्लोकात म्हटले आहे की, देवता आणि महर्षी माझा प्रभव (उत्पत्ती) जाणू शकत नाहीत. यावर शंका येते की, भगवंताला अज, अविनाशी न जाणणे आणि त्यांचा प्रभव न जाणणे ह्या दोन्ही गोष्टी तर एकच झाल्या. परंतु येथे न जाणणाऱ्याला मूर्ख म्हटले आहे आणि तेथे त्यांना मूर्ख म्हटले नाही असे का? याचे समाधान असे आहे की, भगवंताचा प्रभव अर्थात् प्रगट होण्याला न जाणणे दोष नव्हे कारण तेथे भगवंतांनी स्वतः म्हटले आहे की, मी सर्व तऱ्हेने देवता आणि महर्षी यांचा आदि आहे. जसे बालक आपल्या वडिलांच्या जन्माला कसा पाहू शकतो? कारण तो त्यावेळी उत्पन्नच झाला नव्हता. तो तर पित्यापासून उत्पन्न झालेला असतो. म्हणून त्याचे पित्याच्या जन्माला न जाणणे हा दोष नाही. त्याचप्रमाणे भगवंताच्या प्रगट होण्याच्या कारणाना पूर्णपणे न जाणणे, देवता आणि महर्षींसाठी, कोणताही दोष नाही. भगवंताच्या प्रगट होण्याला कोणीही संपूर्णपणे जाणूच शकत नाही. म्हणून तेथे देवता आणि महर्षी यांना मूर्ख म्हटले नाही. मनुष्य भगवंताला अज आणि अविनाशी जाणू शकतो अर्थात् मानू शकतो. जर तो भगवंताला अज-अविनाशी मानत नाही तर त्याचा हा दोष आहे. म्हणून त्याला येथे मूर्ख म्हटले आहे.

**परिशिष्ट भाव**—जी बुद्धिहीन माणसे भगवंताला मानीत नाहीत, भगवान् अवतारकाळात सर्वांच्यासमोर प्रकट असूनही त्यांच्यासमोर प्रकट होत नाहीत—'**ये यथा मां प्रपद्यन्ते तांस्तथैव भजाम्यहम्**' (गीता ४। ११). वास्तविक भगवान् अप्रकट राहू इच्छित नाहीत, परंतु जे त्यांना मानीत नाहीत त्यांच्यासमोर ते कशाला प्रकट होतील?

अवतारकाळात भगवान् लौकिकरूपात दिसत असले तरीही वास्तविक सदा अलौकिकच राहतात. परंतु राग-द्वेषामुळे अज्ञानी माणसांना भगवान् लौकिक दिसतात अर्थात् भगवान्‌रूपाने न दिसता मनुष्यरूपाने दिसतात.

*संबंध—जे भगवंताला अज, अविनाशी मानत नाहीत त्यांच्याच समोर मायेचा पडदा असतो परंतु भगवंतासमोर तो पडदा नसतो याचे वर्णन पुढील श्लोकात करतात.*

**वेदाहं समतीतानि वर्तमानानि चार्जुन।**
**भविष्याणि च भूतानि मां तु वेद न कश्चन॥ २६॥**

| | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|
| **अर्जुन** | = हे अर्जुन! | **च** | = तसेच | **तु** | = परंतु |
| **भूतानि** | = जे प्राणी | **भविष्याणि** | = जे भविष्यात होतील, (त्या सर्व प्राण्यांना तर) | **माम्** | = मला |
| **समतीतानि** | = भूतकाळात होऊन गेले आहेत | | | **कश्चन** | = (भक्ताशिवाय) कोणीही |
| **च** | = आणि | **अहम्** | = मी | **वेद** | = जाणत |
| **वर्तमानानि** | = जे वर्तमानात आहेत | **वेद** | = जाणतो. | **न** | = नाही. |

*व्याख्या*— **वेदाहं समतीतानि..........मां तु वेद न कश्चन**—या ठिकाणी भगवंतांनी प्राण्यांसाठी तर भूत, वर्तमान आणि भविष्य काळाची तीन विशेषणे दिली आहेत. परंतु आपल्यासाठी "**अहं वेद**" पदांनी केवळ वर्तमानकाळाचाच प्रयोग केला आहे. याचे तात्पर्य, भगवंताच्या दृष्टीत भूत, भविष्य आणि वर्तमान हे तीन काळ वर्तमानकाळच आहेत. म्हणून भूतकाळाचे प्राणी असोत भविष्यकाळाचे प्राणी असोत अथवा वर्तमानकाळाचे प्राणी असोत, सर्व भगवंताच्या दृष्टीत वर्तमानकाळाचे असल्याने भगवान् सर्वांना जाणतात. भूत, भविष्य आणि वर्तमान हे तीन काळ तर प्राण्यांच्या दृष्टीने आहेत

* (१) मल्लानामशनिर्नृणां नरवरः स्त्रीणां स्मरो मूर्तिमान् गोपानां स्वजनोऽसतां क्षितिभुजां शास्ता स्वपित्रोः शिशुः।
मृत्युर्भोजपतेर्विराडविदुषां तत्त्वं परं योगिनां वृष्णीनां परदेवतेति विदितो रङ्गं गतः साग्रजः॥ (श्रीमद्भा० १०। ४३। १७)

"ज्यावेळी भगवान् श्रीकृष्ण बलरामाबरोबर रंगभूमीमध्ये उतरले, त्यावेळी ते पहलवानांना वज्रकठोर शरीर असलेले, साधारण मनुष्यांना नर-रत्न, स्त्रीयांना मूर्तिमान कामदेव, गोपांना स्वजन, दुष्ट राजांना दंड देणारे शासक, माता-पिता समान जे वृद्ध होते त्यांना बालकाप्रमाणे, कंसाला मृत्यू, अज्ञान्यांना विराट, योग्यांना परमतत्त्व आणि भक्त शिरोमणी वृष्णिवंशीयांना आपले इष्ट देव, वाटले."

(२) जिन्ह के रही भावना जैसी। प्रभु मूरति तिन्ह देखी तैसी॥ (मानस १। २४१। २)

भगवंताच्या दृष्टीत नाहीत. जसे सिनेमा पाहणाऱ्यासाठी भूत, वर्तमान आणि भविष्यकाळाचा भेद राहतो. परंतु सिनेमाच्या फिल्ममध्ये सर्व काही वर्तमान आहे. तसेच प्राण्यांच्या दृष्टीत भूत, वर्तमान आणि भविष्याचा भेद राहतो परंतु भगवंताच्या दृष्टीत सर्व काही वर्तमानच राहत असते. कारण संपूर्ण प्राणी काळाच्या अंतर्गत येतात आणि भगवान् काळातीत आहेत. देश, काळ, वस्तू, व्यक्ती, घटना, परिस्थिती इत्यादी बदलत राहतात आणि भगवान् नित्य जसेच्या तसे राहतात. काळाच्या अंतर्गत असलेल्या प्राण्यांचे ज्ञान सीमित असते आणि भगवंताचे ज्ञान असीम आहे. त्या प्राण्यांपैकी कोणी योगाचा अभ्यास करून ज्ञान वाढवीले तर ते—''युञ्जान योगी'' होतील आणि ज्यावेळी ज्या वस्तूला जाणू इच्छितील त्यावेळी त्या वस्तूला ते जाणतील. परंतु भगवान् तर ''युक्त योगी'' आहेत अर्थात् योगाचा अभ्यास केल्याशिवायच ते सर्व जीवांना आणि सर्व संसाराला सर्व समयी आपोआप जाणतात.

भूत, भविष्य आणि वर्तमान काळातील सर्व जीव नित्य निरंतर भगवंतातच राहतात, भगवंतापासून कधी वेगळे होऊच शकत नाहीत. भगवंतातही अशी शक्ती नाही की, ते जीवापासून वेगळे होतील म्हणून प्राणी कुठेही असोत ते कधीही भगवंताच्या दृष्टिआड होऊ शकत नाहीत.

**मां तु वेद न कश्चन**—याचे तात्पर्य पूर्व श्लोकात सांगितलेल्या मूढ समुदायापैकी मला कोणीही जाणत नाही. अर्थात् जे मला अज आणि अविनाशी जाणत नाहीत, तर मला सामान्य मनुष्यासारखा जन्मणारा-मरणारा मानतात. त्या मूढांपैकी मला कोणीही जाणत नाहीत, परंतु मी सर्वांना जाणतो.

जसे वेळूपासून बनविलेला पडदा दारावर लावला असता आतल्या लोकांना बाहेरचे दृष्य पूर्ण दिसते पण बाहेरच्या व्यक्तीला केवळ पडदाच दिसतो, आतले काहीही दिसत नाही. तसेच योगमायारूपी पडद्याने चांगल्या रीतीने झाकले गेल्यामुळे भगवंताला अज्ञानी लोक पाहू शकत नाहीत., परंतु भगवान् सर्वांना पाहत असतात.

याठिकाणी अशी शंका आहे की, भगवान् जर भविष्य-काळात जन्मणाऱ्या सर्व प्राण्यांना जाणतात तर कोण मुक्त होईल आणि कोण बंधनात राहील हेही जाणतच असतात. कारण त्यांचे ज्ञान नित्य असते. म्हणून ते ज्याची मुक्ती जाणतात, त्यांची तर मुक्ती होईल आणि जे बंधनात राहणार असे ते जाणत असतील, ते तर बंधनात राहतील. भगवंताच्या या सर्वज्ञतेने तर मनुष्याची मुक्ती परतंत्र झाली, मनुष्याच्या प्रयत्नाने साध्य राहिली नाही.

याचे समाधान असे आहे की, भगवंतांनी मनुष्याला शेवटचा जन्म दिला आहे. आता या जन्मात मनुष्याने आपला उद्धार करून घ्यावा अथवा पतन करून घ्यावे हे त्याच्यावर अवलंबून आहे. (७।२७, ८।६) त्याच्या उद्धाराचा अथवा पतनाचा निर्णय भगवान् करत नाहीत.

याच अध्यायाच्या एकोणीसाव्या श्लोकात भगवंतांनी हे सांगितले आहे की, अनंत जन्मांच्या ह्या शेवटच्या मनुष्य-जन्मात जे ''सर्व काही वासुदेवच आहे'' असे समजून मला शरण येतात ते महात्मा दुर्लभ आहेत. याचे तात्पर्य मनुष्य-शरीरात संपूर्ण प्राण्यांना ही स्वतंत्रता आहे की, ते आपल्या अनंत जन्मांच्या संचितकर्म समुदायाचा नाश करून भगवंताला प्राप्त करू शकतात, आपली मुक्ती करून घेऊ शकतात. जर असेच मानले गेले तर कोणता प्राणी पुढे कोण्या गतीला जाईल—असा भगवंताचा संकल्प असेल तर मग आपला उद्धार करून घेण्याची मनुष्याला स्वतंत्रताच राहणार नाही आणि ''असे करा आणि असे करू नका'' अशा प्रकारचा भगवंत, संत, शास्त्र, गुरू इत्यादीचा उपदेशही व्यर्थ जाईल. याशिवाय ''जे जे मनुष्य ज्या ज्या देवतेची उपासना करू इच्छितात त्या त्या देवताविषयी मी त्यांची श्रद्धा दृढ करतो'' (७।२१) आणि ''अंतकाळी मनुष्य ज्या ज्या भावात शरीराचा त्याग करतो, तो त्या त्या भावाला प्राप्त होतो'' (८।६) अशा प्रकारे उपासना आणि अंतकालीन स्मरणात स्वतंत्रताही राहणार नाही, जी भगवंताने मनुष्यमात्राला दिली आहे.

कारणाशिवाय कृपा करणारे भगवान् जीवाला मनुष्य शरीर देतात.* ज्यायोगाने हा जीव मनुष्यशरीर मिळवून स्वतंत्रतेने आपले कल्याण करून घेईल. गीतेत अकराव्या अध्यायाच्या तेहतीसाव्या श्लोकात जसे भगवंतांनी अर्जुनाला म्हटले आहे ''**मयैवैते निहताः पूर्वमेव निमित्तमात्रं भव सव्यसाचिन्**'' अर्थात् हे माझ्याकडून पूर्वीच मारले गेले आहेत. तू केवळ निमित्तमात्र हो. तसेच मनुष्यमात्राला विवेक आणि उद्धाराची पूर्ण सामुग्री देऊन भगवंतांनी म्हटले आहे की, तू आपला उद्धार करून घे. अर्थात् आपल्या उद्धारात केवळ निमित्तमात्र हो, माझी कृपा तुझ्या-बरोबर आहे. या मनुष्य शरीररूपी नौकेला मिळवून माझ्या कृपारूपी अनुकूल हवेने जो भवसागरातून तरून जात नाही अर्थात् आपला उद्धार करून घेत नाही तो आत्महत्यारा आहे—''**मयानुकूलेन नभस्वतेरितं पुमान् भवाब्धिं न तरेत् स आत्महा**'' (श्रीमद्भा० ११।२०।१७) गीतेतही भगवंतांनी

* कबहुँक करि करुना नर देही। देत ईस बिनु हेतु सनेही॥ (मानस ७।४४।३)

म्हटले आहे की, जो परमात्म्याला सर्व ठिकाणी समान रीतीने परिपूर्ण पाहतो तो आपली हत्या करत नाही, म्हणून तो परमगतीला प्राप्त होतो (१३।२८). यावरुनही हे सिद्ध झाले की, मनुष्यशरीर प्राप्त झाल्यावर आपला उद्धार करून घेण्याचा अधिकार, सामर्थ्य, समज इत्यादी पूरी सामुग्री मिळत असते. अशी अमूल्य संधी मिळूनही जो आपला उद्धार करुन घेत नाही, तो आपली हत्या करतो आणि यामुळेच जन्म-मरणाच्या चक्रात सापडतो. जर ह्या जीवाने मनुष्यशरीर मिळवून शास्त्र आणि भगवंत यांच्या विरुद्ध वर्तन केले नाही, तसेच मिळालेल्या सामुग्रीचा योग्य उपयोग केला, तर याची मुक्ती सहज होत असते. यात कोणतीही बाधा येऊ शकत नाही.

मनुष्यासाठी ही एक विशेष गोष्ट आहे की, भगवंतांनी कृपा करून जे सामर्थ्य, समज इत्यादी सामुग्री दिली आहे त्याचा मी दुरुपयोग करणार नाही, भगवंताच्या सिद्धांताविरुद्ध वर्तन करणार नाही—असा त्याने अटळ निश्चय करावा आणि त्या निश्चयावर दृढ रहावे. जर आपल्या असामर्थ्याने कधी दुरुपयोग ही झाला, तर मनात त्याविषयी खंत वाटली पाहिजे आणि भगवंताना प्रार्थना केली पाहिजे की, हे नाथ! माझ्याकडून चूक झाली, आता पुन्हा अशी चूक कधीही करणार नाही. हे नाथ! अशी शक्ती द्या की, ज्यायोगे मी कधीही आपल्या सिद्धांताविरुद्ध वर्तन करणार नाही, तर त्याचे प्रायश्चित होऊन जाते आणि भगवंताकडून साहाय्यता मिळत असते.

मनुष्याची दुर्बलता दोन प्रकारची असते. एक तर तो करूच शकत नाही. जसे एखाद्या नोकराला मालकाने असे म्हटले की, या घराला उचलून एका मैलावर नेऊन ठेव, तर हे काम तो करूच शकत नाही. दुसरे तो करू तर शकतो आणि करूही इच्छितो, तरी पण प्रमादामुळे वेळेवर करत नाही. ही असमर्थता साधकात येत असते. हिला दूर करण्यासाठी साधकाने भगवंताला प्रार्थना करावी की, "हे नाथ! मी असा प्रमाद पुन: केव्हाही करू नये, अशी मला शक्ती द्या"

भगवंतानीच दिलेल्या स्वातंत्र्यामुळे भगवंत असा संकल्प कधीही करूच शकत नाहीत की, या जीवाचे इतके जन्म होतील. एवढेच नव्हे तर चर-अचर अनंत जीवासाठीही भगवान असा संकल्प करू शकत नाहीत की, त्यांचे अनेक जन्म होतील. मात्र ही गोष्ट जरूर आहे की, मनुष्याशिवाय दुसऱ्या प्राण्यांच्या मागे परंपरेने कर्मफलाची साखळी लागलेली असते ज्यामुळे तें वारंवार जन्मत आणि मरत राहतात. अशा परंपरेत पडलेल्या जीवांपैकी एखादा जीव एखाद्या कारणाने मनुष्यशरीरात अथवा एखाद्या अन्य योनीतही भगवंताच्या चरणाला शरण होतो त्यावेळी भगवंत त्याच्या अनंत जन्माच्या पापांना नष्ट करून टाकतात.

**कोटि बिप्र बध लागहिं जाहू। आएँ सरन तजऊँ नहिं ताहू॥**
**सनमुख होइ जीव मोहि जबहि। जन्म कोटि अघ नासहिं तबही॥**
(मानस ५।४४।१)

**परिशिष्ट भाव**—येथे शंका होऊ शकते की, जर भगवान् सर्व जीवांना जाणतातच तर मग ज्याला बद्ध जाणतात तो बद्धच राहील आणि ज्याला मुक्त जाणतात तोच मुक्त होईल. कारण भगवंताचे ज्ञान नित्य आहे! ही शंका वस्तुत: संसाराची सत्ता आणि महत्ता गृहीत धरुनच (आपल्या दृष्टीत) आहे. वास्तविक भगवान् आणि महात्मा—दोघांच्याही दृष्टीत संसार नाही, केवळ भगवान्च आहेत—'वासुदेव: सर्वम्'। आपणच अहम्मुळे संसाराला सत्ता आणि महत्ता दिली आहे. म्हणून भगवान् आमच्या भाषेत भूत-भविष्य-वर्तमान यासंबंधी कथन करतात. जर ते आमच्या भाषेत बोलले नाहीत तर आपण कसे समजू? जसे आपणाला इंग्रजी भाषा शिकविणारा जर इंग्रजी भाषेतच बोलला तर आपण इंग्रजी शिकूच शकणार नाही.

भगवंताचे ज्ञान नित्य आहे. सर्व काही भगवंताच्या ज्ञानांतर्गत आहे. त्यांच्या ज्ञानाच्या बाहेर काहीही नाही. भगवंताच्या ज्ञानात त्यांच्याशिवाय काही नाही—**'मत्त: परतरं नान्यत्किञ्चिदस्ति'** (गीता ७।७) जीवानेच अहम्मुळे (अज्ञानाने) जगताला धारण केले आहे—**'ययेदं धार्यते जगत्'** (गीता ७।५). म्हणून बन्धन आणि मोक्ष जीवानेच बनविले आहेत. तत्त्वदृष्टीने बन्धनही नाही आणि मोक्षही नाही, तर केवळ परमात्माच आहेत.*

दोनदा 'च' पद देण्याचे तात्पर्य हे आहे की, कोणताही काल स्थायी नाही. भूतकालही सदा राहत नाही, वर्तमानकाळही सदा राहत नाही आणि भविष्यकाळही सदा राहत नाही. परंतु भगवान् सदा राहतात. जसे भूतकाळ आणि भविष्यकाळ आत्ता नाहीत तसेच वर्तमानकाळही नाही. भूतकाळ आणि भविष्यकाळाच्या संधीलाच वर्तमानकाळ म्हणतात. पाणिनि व्याकरणाचे एक सूत्र आहे—**'वर्तमानसामीप्ये वर्तमानवद्वा'** (३।३।१३१) अर्थात् वर्तमान सामीप्यसुद्धा वर्तमानाप्रमाणेच असते. जसे

---

* न निरोधो न चोत्पत्तिर्न बद्धो न च साधक:।
न मुमुक्षुर्न वै मुक्त इत्येषा परमार्थता॥ (आत्मोपनिषद् ३१)
'प्रलयही नाही आणि उत्पत्तीही नाही, बद्धही नाही आणि साधकही नाही, मुमुक्षूही नाही आणि मुक्तही नाही—हीच परमार्थता अर्थात् वास्तविक तत्त्व आहे.'

भूतकाळाला अनुसरून म्हणतात की, 'मी आत्ता आलो' आणि भविष्यकाळाला अनुसरून म्हणतात की, 'मी आत्ता जात आहे'—हे वर्तमान सामीप्य आहे. वास्तविक वर्तमान सामीप्यालाच वर्तमानकाळ म्हणतात. जर वर्तमानकाळ वास्तविक असता तर तो कधी भूतकाळात परिणत होत नव्हता. वास्तविक काळ वर्तमान नाही तर भगवान्‌च वर्तमान आहेत. तात्पर्य हे आहे की, जो प्रतिक्षण बदलतो, तो वर्तमान नसतो, तर तो कधी बदलत नाही तोच वर्तमान असतो. म्हणून भगवंताने श्लोकाच्या आरंभी वर्तमान-क्रिया दिली आहे—'**वेदाहम्**' (मी जाणतो) भगवान् भूत, भविष्य आणि वर्तमान—या सर्वांत सदा वर्तमान आहेत. परंतु भगवंतात भूतही नाही, भविष्यही नाही आणि वर्तमानही नाही. भगवंताचा वर्तमानपणा काळाधीन नसतो, कारण भगवान् काळातीत आहेत. काळ भगवंताच्या दृष्टीतही नाही किंवा महात्म्याच्या दृष्टीतही नाही.

***संबंध***—*पूर्व श्लोकात भगवंतांनी हे म्हटले आहे की, मला कोणीही जाणत नाही तर भगवंताला न जाणण्यात मुख्य कारण काय आहे? याचे उत्तर पुढील श्लोकात देत आहेत.*

**इच्छाद्वेषसमुत्थेन द्वन्द्वमोहेन भारत।**
**सर्वभूतानि सम्मोहं सर्गे यान्ति परन्तप॥ २७॥**

कारण—

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **भारत** | = हे भरतवंशात उत्पन्न | | उत्पन्न होणारे, | | (अनादिकालापासून) |
| **परन्तप** | = शत्रुतापन अर्जुन! | **द्वन्द्वमोहेन** | = द्वन्द्व-मोहाने (मोहित) | **सम्मोहम्** | = मूढतेला अर्थात् |
| **इच्छाद्वेष-** | = इच्छा (आसक्ति) | **सर्वभूतानि** | = संपूर्ण प्राणी | | जन्म-मरणाला |
| **समुत्थेन** | आणि द्वेषाने | **सर्गे** | = संसारात | **यान्ति** | = प्राप्त होत आहेत. |

*व्याख्या*— **इच्छाद्वेषसमुत्थेन...........सर्गे यान्ति परन्तप**—इच्छा आणि द्वेषापासून द्वन्द्वमोह उत्पन्न होतो, ज्यामुळे प्राणी मोहित होऊन भगवंताशी एकदम विमुख होतात आणि विमुख झाल्याने वारंवार जन्म-मरणाला प्राप्त होतात.

मनुष्याने संसाराशी विमुख होऊन केवळ भगवंताकडे सन्मुख होण्याची आवश्यकता आहे. भगवंताकडे सन्मुख न होण्यात मुख्य बाधा काय आहे? हे मनुष्यशरीर विवेकप्रधान आहे. म्हणून मनुष्याची प्रवृत्ती आणि निवृत्ती पशुपक्ष्याप्रमाणे नसून आपल्या विवेकानुसार असली पाहिजे. परंतु मनुष्य आपल्या विवेकाला महत्त्व न देता राग-द्वेषाच्या अधीन होऊनच प्रवृत्त आणि निवृत्त होत असतो, ज्यामुळे त्याचे पतन होत असते.

मनुष्याच्या दोन मनोवृत्ती असतात. एकाकडे सन्मुख होणे आणि दुसऱ्याकडून विन्मुख होणे. मनुष्याने आपली वृत्ती तर परमात्म्याकडे वळवली पाहिजे आणि संसारातून आपली वृत्ती काढून घेतली पाहिजे अर्थात् परमात्म्याशी प्रेम केले पाहिजे आणि संसारापासून विरक्त झाले पाहिजे. परंतु या दोन्ही वृत्तींना जेव्हा मनुष्य केवळ संसाराकडेच वळवितो तेव्हा तेच प्रेम आणि विरक्ती क्रमाने राग आणि द्वेषाचे रूप धारण करतात. ज्यामुळे मनुष्य संसारात गुंतून पडतो आणि भगवंताशी संपूर्णपणे विन्मुख होतो. मग भगवंताकडे वाटचाल करण्यासाठी अवसरच मिळत नाही. कधी कधी सत्संगाच्या गोष्टीही ऐकतो, शास्त्राचेही अवलोकन करतो, चांगल्या गोष्टीवर विचारही करतो, मनांत चांगल्या वृत्ती निर्माण झाल्या तर त्याला योग्यही वाटू लागतात. तरीसुद्धा त्याच्या मनात आसक्तीमुळे ही गोष्ट पक्की बसलेली असते की, मला तर सांसारिक अनुकूलता प्राप्त करून घ्यायची आहे आणि प्रतिकूलता नाहीशी करायची आहे हे माझे मुख्य ध्येय आहे. कारण याशिवाय माझा जीवननिर्वाह होणार नाही. अशा प्रकारे तो अंतःकरणात दृढतेने राग-द्वेषांना धारण करतो ज्यामुळे ऐकून, वाचून आणि विचार करूनही त्याची वृत्ती राग-द्वेषरूप द्वन्द्वाचा त्याग करत नाही. म्हणूनच तो परमात्म्याकडे वाटचाल करू शकत नाही.

द्वन्द्वांतही जर त्याची आसक्ती मुख्यरूपाने एकाच विषयात झाली तर तीही योग्य आहे. जसे भक्त बिल्वमंगलाची वृत्ती चिंतामणी नावाच्या वेश्येचे ठिकाणी आसक्त झाली. त्यामुळे त्यांची वृत्ती संसारापासून हटली. जेव्हा वेश्येने त्यांची कानउघाडणी केली की, "अशा हाड मांसाच्या शरीरावर तू आकृष्ट झाला आहेस. जर भगवंताचे ठिकाणी इतका आकृष्ट झाला असतास तर तू मुक्त झाला असतास" तेव्हा त्यांची वृत्ती वेश्येपासून परावृत्त होऊन भगवंताकडे सन्मुख झाली आणि त्यांचा उद्धार झाला. त्याप्रमाणे गोपींची भगवंताविषयी आसक्ती झाली, तर ती आसक्तीही कल्याण करणारी झाली. शिशुपालाचे भगवंताशी वैर (द्वेष) होते, तर वैरपूर्वक भगवंताचे चिंतन करण्यानेही त्याचे कल्याण झाले. कंसाला भगवंतापासून भय निर्माण

झाले. तर भयवृत्तीने भगवंताचे चिंतन करण्यानेही त्याचे कल्याण झाले. मात्र ही गोष्ट जरूर आहे की, वैर आणि भयाने चिंतन करण्याने शिशुपाल आणि कंस भक्तीचा आनंद घेऊ शकले नाहीत. तात्पर्य, कोणत्याही प्रकारे का होईना, भगवंताकडे आकर्षण झाले तर मनुष्याचा उद्धार होतो. परंतु संसारात राग-द्वेष, काम-क्रोध, योग्य-अयोग्य, अनुकूल-प्रतिकूल इत्यादी द्वन्द्व राहिल्याने मूढता दृढ होत असते आणि मनुष्याचे पतन होते.

दुसऱ्या रीतीने असे समजा की, संसाराचा संबंध द्वन्द्वाने दृढ होतो. जर कामना ठेवून मनोवृत्तीचा प्रवाह संसाराकडे झाला तर सांसारिक अनुकूलता आणि प्रतिकूलता याविषयी राग-द्वेष निर्माण होतात अर्थात् एकच पदार्थ केव्हा अनुकूल वाटतो आणि केव्हा प्रतिकूल वाटतो, केव्हा त्याच्याविषयी आसक्ती होते, केव्हा द्वेष निर्माण होतो. ज्यामुळे संसाराचा संबंध दृढ होत असतो. म्हणून भगवंतांनी दुसऱ्या अध्यायामध्ये "**निर्द्वन्द्वः**" (२।४५) पदाने द्वन्द्वरहित होण्याची आज्ञा केली आहे. निर्द्वन्द्व पुरुष सुखाने मुक्त होतो. "**निर्द्वन्द्वो हि महाबाहो सुखं बन्धात्प्रमुच्यते**" (५।३) सुख-दुःख इत्यादी द्वन्द्व-रहित होऊन भक्तलोक अविनाशी पदाला प्राप्त होतात— "**द्वन्द्वैर्विमुक्ताः सुखदुःखसञ्ज्ञैर्गच्छन्त्यमूढाः पदमव्ययं तत्**" (१५।५) भगवंतांनी द्वन्द्वाला मनुष्याचा प्रमुख शत्रू म्हटले आहे (३।३४). जे द्वन्द्वमोहापासून रहित असतात ते दृढव्रती होऊन भगवंताचे भजन करतात (७।२८) इत्यादी रूपाने गीतेत द्वन्द्वरहित होण्याविषयीचा उल्लेख पुष्कळ वेळा आलेला आहे.

जन्म-मरणाचे कारण काय आहे? शास्त्राच्या दृष्टीने तर जन्म-मरणाचे कारण अज्ञान आहे परंतु संत वाणीकडे पाहिले तर, जन्म-मरणाचे मुख्य कारण आसक्तीने प्राप्त परिस्थितीचा दुरुपयोग करणे, हे आहे. फलेच्छेने शास्त्रविहित कर्म केल्याने आणि प्राप्त परिस्थितीचा दुरुपयोग केल्याने अर्थात् भगवत् आज्ञेविरुद्ध कर्म केल्याने सत्-असत् योनींची प्राप्ती होत असते अर्थात् देवतांची योनी, चौऱ्यांशी लाख योनी आणि नरक प्राप्त होत असतो.

प्राप्त परिस्थितीचा सदुपयोग करण्याने सम्मोह अर्थात् जन्म-मरण समाप्त होते. त्याचा सदुपयोग कसा करावा? आपल्याला जी अवस्था, परिस्थिती मिळाली आहे त्याचा दुरुपयोग न करण्याचा निश्चय करावा की, "आपण दुरुपयोग करणार नाही अर्थात् शास्त्र आणि लोकमर्यादेविरुद्ध काम करणार नाही" अशा प्रकारे रागरहित होऊन दुरुपयोग न करण्याचा निश्चय झाल्यावर सदुपयोग आपोआप होऊ लागेल अर्थात् शास्त्र आणि लोकमर्यादेनुकूल काम होऊ लागेल. जेव्हा सदुपयोग होऊ लागेल तेव्हा आपल्याला अभिमान होणार नाही. कारण आपण तर दुरुपयोग न करण्याचा विचार केला आहे, सदुपयोग करण्याचा विचार तर आपण केलाच नाही मग करण्याचा अभिमान कोठून निर्माण होईल? यामुळे तर कर्तृत्व अभिमानाचा त्याग होईल. जर आपण सदुपयोग केलाच नाही तर त्याच्या फलाची इच्छा आपण कशी करणार? कारण सदुपयोग झाला आहे, केला नाही. म्हणून यामुळे फलेच्छेचा त्याग होईल. कर्तृत्व अभिमान आणि फलेच्छेचा त्याग झाल्याने अर्थात् बंधनाचा अभाव झाल्याने मुक्ती स्वतः सिद्ध आहे.

बहुतेक साधकांत ही गोष्ट पक्की बसलेली आहे की, साधन-भजन, जप-ध्यान इत्यादी करण्याचा विभाग वेगळा आहे आणि सांसारिक काम धंदा करण्याचा विभाग वेगळा आहे. या दोन विभागामुळे साधक भजन-ध्यान इत्यादी तर वाढवतो, परंतु सांसारिक काम धंदा करताना राग-द्वेष, काम-क्रोध इत्यादीकडे लक्ष देत नाही. तर अशी निश्चित भावना करून घेतात की, "काम-धंदा करत असताना तर राग-द्वेष होतच असतात. हे नष्ट होणारे थोडेच आहेत?" या भावनेने फार मोठा अनर्थ असा होतो की, साधकाचे राग-द्वेष कायम राहतात. ज्यामुळे साधनेत लवकर उन्नती होत नाही. वास्तविक, साधक मग पारमार्थिक कार्य करो अथवा सांसारिक कार्य करो त्याच्या अंतः-करणात राग-द्वेष रहावयास नको.

पारमार्थिक आणि सांसारिक क्रियेत भेद झाला तरी साधकाच्या भावात भेद व्हावयास नको. अर्थात् पारमार्थिक आणि सांसारिक दोन्ही क्रिया करतेवेळी साधकाचा भाव एकच रहावा की, "मी साधक आहे आणि मला भगवत्प्राप्ती करून घ्यावयाची आहे" अशा प्रकारे क्रिया भेद तर राहीलच आणि राहिलाच पाहिजे परंतु भाव भेद राहू नये. भाव भेद न राहिल्यास अर्थात् एका भगवत्प्राप्तीचाच भाव (उद्देश) राहिल्याने पारमार्थिक आणि सांसारिक दोन्हीही क्रिया साधन होतील.

**परिशिष्ट भाव**—जरी संसारबंधनाचे मूळ कारण अज्ञान आहे, तरी अज्ञानापेक्षाही मनुष्य राग-द्वेषरूप द्वन्द्वामुळे संसारात अधिक फसतो. कोण्या देश, काल, वस्तू, व्यक्ती, परिस्थिती इत्यादीला अपल्या सुख-दुःखाचे कारण मानल्याने राग-द्वेष पैदा होतात. ज्याला आपण आपल्या सुखाचे कारण मानतो त्यात 'राग' (आसक्ती) होतो आणि ज्याला दुःखाचे कारण मानतो त्यात 'द्वेष' होतो. राग-द्वेष समाप्त झाल्यावर मनुष्य सुखपूर्वक संसारबंधनातून मुक्त होतो—'**निर्द्वन्द्वो हि महाबाहो सुखं**

**बन्धात्प्रमुच्यते**' (गीता ५ । ३).

पूर्वी तेराव्या श्लोकातही भगवंतांनी सांगितले आहे की, तिन्ही गुणांनी मोहित प्राणी मला जाणत नाही. असे मोहित प्राणी संसाराला जाणत नाहीत आणि भगवंतालाही जाणत नाहीत. संसारात बुडालेले राहून मनुष्य संसाराला जाणू शकत नाही आणि भगवंतापासून वेगळे (दूर) राहून मनुष्य भगवंताला जाणू शकत नाही. वास्तविक संसाराचे ज्ञान संसारापासून वेगळे झाल्यावर आणि भगवंताचे ज्ञान भगवंताशी अभिन्न झाल्यावरच होते. संसार नाही—हेच संसाराचे ज्ञान आहे. वास्तविक जे नाहीच, राहतच नाही, त्याचे ज्ञान कसे? संसार आहे—असे मानणे हेच अज्ञान आहे.

***संबंध***—*पूर्व श्लोकात भगवंतांनी द्वन्द्वमोहाने मोहित होणाऱ्याविषयी सांगितले. आता पुढील श्लोकात द्वन्द्वमोहापासून रहित होणाऱ्याविषयी सांगत आहेत.*

## येषां त्वन्तगतं पापं जनानां पुण्यकर्मणाम्।
## ते द्वन्द्वमोहनिर्मुक्ता भजन्ते मां दृढव्रताः॥ २८॥

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **तु** | = परंतु | **पापम्** | = पापे | | माणसे |
| **येषाम्** | = ज्या | **अन्तगतम्** | = नष्ट झाली आहेत | **दृढव्रताः** | = दृढव्रती होऊन |
| **पुण्यकर्मणाम्** | = पुण्यकर्मा | **ते** | = ती | **माम्** | = माझे |
| **जनानाम्** | = मनुष्यांची | **द्वन्द्वमोहनिर्मुक्ताः** | = द्वन्द्वमोहरहित झालेली | **भजन्ते** | = भजन करतात. |

*व्याख्या*—**येषां त्वन्तगतं पापं जनानां पुण्यकर्मणाम्**—द्वन्द्वमोहाने मोहित झालेली माणसे तर भजन करत नाहीत आणि जे द्वन्द्वमोहरहित आहेत, ते भजन करत असतात. तर भजन न करणाऱ्यापेक्षा भजन करणाऱ्यांची विलक्षणता दाखविण्यासाठी येथे "**तु**" पद आले आहे.

ज्या माणसांनी "आपल्याला तर भगवत्प्राप्तीच करावयाची आहे" या उद्देशाला ओळखले आहे अर्थात् ज्यांना ह्या उद्देशाची आठवण झाली आहे की, हे मनुष्यशरीर भोग भोगण्यासाठी नव्हे तर भगवंताच्या कृपेने त्यांच्या प्राप्तीसाठीच मिळाले आहे, असा ज्यांचा दृढ निश्चय झाला आहे ती माणसेच "पुण्यकर्मा" आहेत. तात्पर्य आपल्या स्वतःच्या एका निश्चयाने जी शुद्धी होते, पवित्रता येते, ती यज्ञ, दान, तप इत्यादी क्रियेने येत नाही. कारण "आपल्याला तर एका भगवंताकडेच वाटचाल करावयाची आहे" हा निश्चय "स्व" मध्ये होत असतो आणि यज्ञ, दान इत्यादी क्रिया बाहेरुन होत असतात.

"**अन्तगतं पापम्**" म्हणण्याचा भाव हा आहे की, जेव्हा हा निश्चय झाला की "मला तर केवळ भगवंताकडेच वाटचाल करावयाची आहे" तर या निश्चयाने भगवंताची सम्मुखता झाल्यामुळे विमुखता समाप्त झाली, ज्यामुळे पापाचे मूळ नष्ट झाले, कारण भगवंताशी विमुखताच पापाला प्रमुख कारण आहे. संतांनी म्हटले आहे की, दीडच पाप आहे आणि पुण्यही दीडच आहे. भगवंताशी विन्मुख होणे पूर्ण पाप आहे आणि दुर्गुण-दुराचारामध्ये प्रवृत्त होणे अर्धे पाप आहे. तसेच भगवंताच्या सन्मुख होणे पूर्ण पुण्य आहे आणि सद्गुण सदाचाराचे आचरण करणे अर्धे पुण्य आहे. तात्पर्य जेव्हा मनुष्य भगवंताला संपूर्णपणे शरण येतो तेव्हा त्याची पापे समाप्त होतात.

दुसरा भाव असा आहे की, ज्यांचा उद्देश केवळ परमात्मा आहे ते पुण्यकर्मा आहेत कारण भगवंताचा उद्देश असल्याने सर्व पाप नष्ट होते. भगवंताचा उद्देश असल्यावर जुन्या एखाद्या संस्काराने पाप जरी घडले तरी ते राहणार नाही, कारण अंतःकरणात विद्यमान असलेले भगवान त्या पापाला नष्ट करून टाकतात. "**विकर्म यच्चोत्पतितं कथञ्चिद् धुनोति सर्वं हृदि सन्निविष्टः**" (श्रीमद्भा० ११।५।४२)

तीसरा भाव हा आहे की, मनुष्याने अंतःकरणपूर्वक हा दृढ निश्चय करावा की, "आता मी यापुढे कधीही पाप करणार नाही" तर त्याचे पाप राहत नाही.

**ते द्वन्द्वमोहनिर्मुक्ता भजन्ते मां दृढव्रताः**—पुण्यकर्मा-लोक द्वन्द्वरूपी मोहाने रहित होऊन आणि दृढव्रती होऊन भगवंताचे भजन करतात. द्वन्द्व अनेक प्रकारची असतात. जसे—

(१) भगवंताला सन्मुख व्हावे का संसाराला सन्मुख व्हावे? कारण परलोकासाठी भगवंताचे भजन आवश्यक आहे आणि इहलोकासाठी संसाराचे काम आवश्यक आहे.

(२) वैष्णव, शैव, शाक्त, गाणपत्य आणि सौर—या संप्रदायांपैकी कोणत्या संप्रदायाचा स्वीकार करावा आणि कोणत्या संप्रदायाचा स्वीकार करू नये?

(३) परमात्म्याच्या स्वरूपाच्या विषयात द्वैत, अद्वैत, विशिष्टाद्वैत, शुद्धाद्वैत, अचिंत्यभेदाभेद इत्यादी किती तरी प्रकारचे सिद्धांत आहेत. यापैकी कोणत्या सिद्धांताचा स्वीकार करावा आणि कोणत्या सिद्धांताचा स्वीकार करू नये?

(४) परमात्म्याच्या प्राप्तीचे भक्तियोग, ज्ञानयोग, कर्मयोग, ध्यानयोग, हठयोग, लययोग, मंत्रयोग इत्यादी किती तरी मार्ग आहेत. त्यापैकी कोणत्या मार्गाचा स्वीकार करावा आणि कोणत्या मार्गाचा स्वीकार करू नये?

(५) संसारात येणारे अनुकूल-प्रतिकूल, हर्ष-शोक, योग्य-अयोग्य, सुख-दुःख, राग-द्वेष इत्यादी सर्व द्वन्द्व आहेत.

उपर्युक्त सर्व पारमार्थिक आणि सांसारिक द्वन्द्वरूपी मोहापासून मुक्त झालेली माणसे दृढव्रती होऊन भगवंताचे भजन करतात.

मनुष्याचा एकच पारमार्थिक उद्देश असल्यास पारमार्थिक आणि सांसारिक सर्व द्वन्द्व नष्ट होतात. पारमार्थिक उद्देश असणाऱ्या साधकाने आपापल्या रुची, योग्यता आणि श्रद्धा-विश्वासानुसार आपापल्या इष्टाला सगुण माना, साकार माना, निर्गुण माना, निराकार माना, द्विभुज माना, चतुर्भुज माना, अथवा सहस्त्र भुज इत्यादी कसेही माना परंतु संसाराच्या विमुखतेत आणि परमात्म्याच्या सम्मुखतेत ते सर्व एक आहेत. उपासनेच्या पद्धती भिन्न भिन्न असल्या तरी उद्देश सर्वांचा एक असल्यामुळे कोणतीही पद्धती लहान अथवा मोठी नाही. ज्या साधकाचा ज्या पद्धतीवर श्रद्धा-विश्वास असतो त्याच्यासाठी तीच पद्धती श्रेष्ठ आहे आणि त्याने त्याच पद्धतीचे अनुसरण केले पाहिजे. परंतु दुसऱ्यांच्या पद्धतीची अथवा निष्ठेची निंदा करणे, त्याला कनिष्ठ समजणे दोष आहे. जोपर्यंत हे साधनसंबंधी द्वन्द्व राहत असते आणि साधकात आपल्या पक्षाचा आग्रह आणि दुसऱ्यांचा निरादर राहतो तोपर्यंत भगवंताच्या समग्ररूपाचा अनुभव त्याला येत नाही. म्हणून सर्व पद्धती आणि निष्ठांचा आदर केला पाहिजे, परंतु अनुसरण आपल्या पद्धतीचे आणि निष्ठेचेच केले पाहिजे. असे केल्याने साधनविषयक द्वन्द्व समाप्त होते.

एकंदर माणसाची ही प्रकृती असते, असा एक स्वभाव असतो की, जेव्हा तो पारमार्थिक गोष्टी ऐकतो तेव्हा तो हे समजतो की, साधन करून आपले कल्याण करून घ्यावयाचे आहे. कारण मनुष्यजन्माची सफलता यातच आहे. परंतु जेव्हा तो व्यवहारात वावरतो, तेव्हा तो असा विचार करतो की, "साधन भजनाने काय होणार आहे? सांसारिक काम तर करावे लागेल, कारण संसारात वावरत आहोत, पदार्थ-वस्तूंची आवश्यकता पडत असते, त्याशिवाय काम कसे चालेल? म्हणून संसाराचे काम राहणारच आणि भजन स्मरणाचा नित्य-नियम तर वेळेवर तेवढा करायचा असतो. कारण सांसारिक कामाची जितकी आवश्यकता असते तितकी भजन-स्मरण, नित्य-नियमाची नव्हे" अशी धारणा ठेवून भगवंताकडे सन्मुख झालेले लोक पुष्कळ असतात.

भगवंताकडे वाटचाल करणाऱ्यामध्येही ज्यांनी असा एक निश्चय केला आहे की, मला तर आपले कल्याण करून घ्यावयाचे आहे, सांसारिक लाभ-हानी काहीही होवो, याची काहीही परवा नाही. कारण सांसारिक जेवढ्या काही सिद्धी आहेत डोळे बंद करताच त्यांचे काहीच अस्तित्व नाही—"**सम्मीलने नयनयोर्नहि किञ्चिदस्ति**" आणि ह्या सांसारिक वस्तूंना प्राप्त करून घेतल्याने किती दिवस आपले काम चालणार आहे? असा विचार करून जो एका भगवंता-कडेच सन्मुख होतो आणि सांसारिक आदर-निरादर याकडे लक्ष देत नाही, असाच मनुष्य द्वन्द्वमोहातून सुटलेला असतो.

**दृढव्रताः**—हे म्हणण्याचे तात्पर्य आपल्याला तर केवळ परमात्म्याकडेच वाटचाल करायची आहे, आपला दुसरा कोणताही उद्देशच नाही. तो परमात्मा द्वैत आहे का अद्वैत आहे, शुद्धाद्वैत आहे का विशिष्टाद्वैत आहे, सगुण आहे की निर्गुण आहे, द्विभुज आहे की चतुर्भुज आहे, याच्याशी आपल्याला काही कर्तव्य नाही.* तो आपल्यासाठी कोणतीही परिस्थिती निर्माण करो, आपल्याला कुठेही ठेवो आणि कसेही ठेवो याच्याशीही आपल्याला काही कर्तव्य नाही. बस, आपल्याला तर केवळ परमात्म्यालाच सम्मुख व्हायचे आहे. अशा निश्चयाने ते दृढव्रती होतात.

परमात्म्याशी सम्मुख होणाऱ्यासाठी तीन प्रश्न निर्माण होतात. परमात्मा कसे आहेत? जीव कसा आहे? आणि जगत् कसे आहे? तर याचे सरळ उत्तर त्यांच्या अंतः-करणात असे असते की "परमात्मा आहेत." ते कोठे राहतात, काय करतात, इत्यादीविषयी आपल्याला काही कर्तव्य नाही. आपल्याला तर परमात्म्याशी कर्तव्य आहे.

---

* जसे गजेंद्राने म्हटले होते

यः कश्चनेशो बलिनोऽन्तकोरगात् प्रचण्डवेगादभिधावतो भृशम्। भीतं प्रपन्नं परिपाति मद्भयान्मृत्युः प्रधावत्यरणं तमीमहि॥

(श्रीमद्भा० ८।२।३३)

जो कोणी ईश्वर प्रचंड वेगाने (सर्वांना गिळून टाकण्यासाठी) धावत येऊन, अत्यंत बलवान कालरूपी सापाने भयभीत होऊन शरण आलेल्याचे रक्षण करतो आणि ज्याला भिऊन मृत्यू देखील धावत आहे त्यालाच मी शरण जात आहे.

जीव म्हणजे काय, त्याचे स्वरूप कसे आहे. तो कोठे राहतो या बाबतीतही आपल्याला काही कर्तव्य नाही. आपले एवढेच कर्तव्य आहे की ''मी आहे'' जगत् कसे आहे, चांगले आहे की वाईट आहे, आपल्याला त्यासंबंधी काही कर्तव्य नाही. आपल्याला तर एवढेच समजून घ्यावयाचे आहे की, ''जगत् त्याज्य आहे'' आणि आपल्याला त्याचा त्याग करावयाचा आहे. तात्पर्य, परमात्म्याकडे सम्मुख व्हायचे आहे, संसाराचा त्याग करायचा आहे आणि पुढे मार्ग आक्रमण करायचा आहे अर्थात् ''आपल्याला संसारापासून विमुख होऊन परमात्म्याशी सम्मुख व्हायचे आहे'' हाच सर्व दर्शनांचा सार आहे आणि हेच दृढव्रती होणे आहे. दृढव्रती होण्याने त्यांचे द्वन्द्व नष्ट होतात, कारण एक पक्का निश्चय नसल्यानेच द्वन्द्व होत असतात.

दुसरा भाव असा आहे की, त्यांना निर्गुणाचे ज्ञान नसते अथवा सगुणाचे दर्शन झालेले नसते, परंतु त्यांच्या मान्यतेत संसार निरंतर नष्ट होत आहे, निरंतर अभावात जात आहे आणि सर्व देश, काळ, वस्तू, व्यक्ती इत्यादीत भावरूपाने एक परमात्माच आहे. असे समजून ते दृढव्रती होऊन भजन करत असतात. जसे पतिव्रता स्त्री पतिपरायण असते तसेच भगवत्परायण राहणेच त्यांचे भजन आहे.

## विशेष गोष्ट

शास्त्रात, संतवाणीत आणि गीतेतही असा उल्लेख येतो की, पापी मनुष्य बहुधा भगवंताकडे वळत नाही. परंतु हा एक स्वाभाविक सामान्य नियम आहे. वास्तविक कितीही पाप झाले तरी ते भगवंतापासून विमुख करूच शकत नाही. कारण जीव परमात्म्याचा साक्षात अंश आहे. म्हणून त्याची शुद्धी पापामुळे भलेही आच्छादित झाली असली, तरी ती शुद्धी नाहीशी होऊ शकत नाही. म्हणून दुराचारीही दुराचाराचा त्याग करून भगवंताकडे वळला तर तो फारच लवकर धर्मात्मा (भक्त) होत असतो **''क्षिप्रं भवति धर्मात्मा''** (९।३१) *म्हणून मनुष्याने कधीही असे मानू नये की, मागील पापामुळे माझे भजन होत नाही, कारण मागील पापे केवळ प्रतिकूल परिस्थितीरूपी फल देण्यासाठीच असतात, भजनात बाधा देण्यासाठी नव्हे. प्रतिकूल परिस्थिती देऊन ते पाप नष्ट होत असते. जर असे मानले की पापामुळे भजन होत नाही तर **''अपि चेत्सुदुराचारो भजते मामनन्यभाक्''** (९।३०) ''दुराचाराती दुराचारी पुरुष अनन्यभावाने माझे भजन करत असेल'' हे म्हणणे शक्य झाले नसते. पापामुळे भजन-ध्यानात बाधा लागू लागली तर फार अवघड होईल. कारण पापाशिवाय प्राणी नसतोच. पाप-पुण्यानेच मनुष्यशरीर मिळत असते. यावरुन सिद्ध होते की, मागील पाप भजनात बाधक होऊ शकत नाही. म्हणून जे दृढव्रती पुरुष भगवंताला शरण होऊन वर्तमानकाळात भगवंताच्या भजनाला लागतात, त्यांच्या मागील पापांचा नाश होत असतो. मनुष्यशरीर भजन करण्यासाठीच मिळालेले आहे. म्हणून ज्या परिस्थिती शरीरापर्यंतच राहणाऱ्या आहेत, त्या भजनात बाधा आणतील असे कधी शक्यच होत नाही.

सकाम पुण्यकर्मांची मुख्यता असल्यास जीव स्वर्गात जातो आणि पापकर्मांची मुख्यता असल्यास नरकात जातो. परंतु भगवंत विशेष कृपा करून, पाप आणि पुण्याचे पूर्ण फलभोग झाले नसतानाही, अर्थात् चौऱ्यांशी लक्ष योनीच्या मध्यंतरीच जीवाला मनुष्यशरीर देतात. मनुष्यशरीरातच भगवद्भजनाचा अवसर विशेषतेने प्राप्त होत असतो. म्हणून मनुष्यशरीर प्राप्त झाल्यावर भगवत्प्राप्तीविषयी कधीही निराश होऊ नये. कारण भगवत्प्राप्तीसाठीच मनुष्यशरीर मिळत असते.

हे मनुष्यशरीर भोगयोनी नव्हे याला सामान्यपणे कर्म-योनी म्हणतात. परंतु संतांच्या वाणीनुसार आणि सिद्धांतानुसार मनुष्यशरीर केवळ भगवत्प्राप्तीसाठीच आहे. यात मागील पुण्यानुसार जी अनुकूल परिस्थिती येत असते आणि मागील पापानुसार जी प्रतिकूल परिस्थिती येत असते ही दोन्हीही साधन-सामुग्री असते. या दोन्हीपैकी अनुकूल परिस्थिती प्राप्त झाल्यास जगाची सेवा करणे आणि प्रतिकूल परिस्थिती प्राप्त झाली असता अनुकूलतेच्या इच्छेचा त्याग करणे—हे साधकाचे काम आहे. असे केल्याने ह्या दोन्ही परिस्थिती साधनसामुग्री होऊन जातील. यातही खरे पाहिले तर, अनुकूल परिस्थिती प्राप्त झाली असता मागील पुण्यांचा नाश होत असतो आणि वर्तमानकाळात भोगात फसण्याची शक्यता देखील राहते. परंतु प्रतिकूल परिस्थितीत मागील पापांचा नाश होत असतो आणि वर्तमानकाळात अधिक जागरुकपणा, सावधगिरी राहते, ज्यामुळे साधन सुगमतेने पूर्ण होत असते. या दृष्टीने संतजन सांसारिक प्रतिकूल परिस्थितीचा आदर करीत आले आहेत.

* अन्य योनीत पाप नष्ट झाल्यावरही स्वभाव सुधरेल हा नियम नाही. जसे चौऱ्यांशी लाख योनी आणि नरक भोगत असताना पाप तर नष्ट होते परंतु स्वभाव सुधरत नाही. परंतु मनुष्ययोनीत पाप असतानाही साधकाचा स्वभाव सुधरू शकतो. जसे पाप शिल्लक असल्याने त्याचे फल म्हणून प्रतिकूल परिस्थिती (आजार इत्यादी) येत असते, परंतु सत्संगाने, साधनपरायणतेने, अहंतापरिवर्तनाने पारमार्थिक साधकाचा स्वभाव सुधरतो.

**परिशिष्ट भाव**—भगवंताच्या सम्मुख होणे हे सर्वात मोठे पुण्य आहे. कारण हे सर्व पुण्यांचे मूळ आहे.* परंतु भगवंतापासून विन्मुख होणे हे सर्वात मोठे पाप आहे. कारण हे सर्व पापांचे मूळ आहे. ज्या माणसांची पापे नष्ट झाली आहेत अर्थात् जी संसारापासून विन्मुख होऊन भगवंताला सन्मुख झाली आहेत, ती राग-द्वेष, हर्ष-शोक, सुख-दुख इत्यादी द्वन्द्वापासून रहित होऊन भगवंताचे भजन करतात. भजन करणाऱ्यांच्या प्रकाराचे वर्णन भगवंताने सोळाव्या श्लोकात '**चतुर्विधा भजन्ते माम्**' पदांनी केले आहे.

राग-द्वेष मनुष्याला संसाराकडे खेचत राहतात. जोपर्यंत एका वस्तूत राग (आसक्ती) राहतो तोपर्यंत दुसऱ्या वस्तूत द्वेष राहतच असतो. कारण मनुष्य एखाद्या वस्तूशी सन्मुख होतो तेव्हा दुसऱ्या कोण्या तरी वस्तूशी विन्मुख होतोच. जोपर्यंत मनुष्याच्या अंत:करणात राग-द्वेष राहतात, तोपर्यंत तो भगवंताला सर्वथा सन्मुख होऊ शकत नाही. कारण त्याचा संबंध संसाराशी जडलेला राहतो. त्याचा जितक्या अंशात संसारात राग (आसक्ती) राहतो, तितक्या अंशात भगवंताशी द्वेष अर्थात् विन्मुखता राहते.

'**दृढव्रता:**'—ढील्या प्रकृतीचा अर्थात् शिथिल स्वभावाचा मनुष्य असत्चा त्याग लवकर करू शकत नाही. एक विचार करतो त्याला लगेच सोडून देतो. मग दुसरा विचार करतो, त्याला सोडून देतो. अशाप्रकारे वारंवार विचार करण्याने आणि त्याला सोडून देण्याने सवय बिघडून जातो. या बिघडलेल्या सवयीमुळेच तो असत्च्या त्यागाच्या गोष्टी तर शिकतो परंतु असत्चा त्याग करू शकत नाही. असत्चा त्याग त्याने कदाचित जरी केला तरी स्वभावाच्या ढिलेपणामुळे पुन्हा त्याला सत्ता देतो. स्वभावाची ही शिथिलता स्वयं साधकाने बनविली आहे. म्हणून साधकासाठी हे आवश्यक आहे की, त्याने आपला स्वभाव दृढ राहील असा बनवावा. एकदा विचार केला की त्यावर त्याने दृढ रहावे. लहानातल्या लहान गोष्टीतही त्याने दृढ (पक्के) रहावे. म्हणजे असा स्वभाव बनल्याने त्याच्यात असत्चा त्याग करण्याची, संसारापासून विन्मुख होण्याची शक्ती निर्माण होईल.

***संबंध**—सातव्या अध्यायाच्या आरंभी भगवंतांनी साधकासाठी तीन गोष्टी सांगितल्या होत्या "मय्यासक्तमना:" माझ्या ठिकाणी प्रेम ठेवून आणि "मदाश्रय:" माझा आश्रय घेऊन जो "योगं युञ्जन्" योगाचे अनुष्ठान करतो, तो माझ्या समग्ररूपाला जाणतो. त्याच तिन्ही गोष्टींचा उपसंहार आता पुढील दोन श्लोकांत करतात.*

**जरामरणमोक्षाय मामाश्रित्य यतन्ति ये।**
**ते ब्रह्म तद्विदुः कृत्स्नमध्यात्मं कर्म चाखिलम्†॥ २९॥**

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **जरामरणमोक्षाय** | = वृद्धावस्था आणि मृत्यूपासून मुक्त होण्यासाठी | **आश्रित्य** | = आश्रय घेऊन | **कृत्स्नम्** | = संपूर्ण |
| **ये** | = जी माणसे | **यतन्ति** | = प्रयत्न करतात, | **अध्यात्मम्** | = आध्यात्माला |
| **माम्** | = माझा | **ते** | = ती | **च** | = आणि |
| | | **तत्** | = त्या | **अखिलम्** | = संपूर्ण |
| | | **ब्रह्म** | = ब्रह्माला, | **कर्म** | = कर्माला |
| | | | | **विदुः** | = जाणतात |

*व्याख्या*— **जरामरणमोक्षाय मामाश्रित्य यतन्ति ये**—येथे जरा (वृद्धावस्था) आणि मरणापासून मुक्ती मिळण्याचे हे तात्पर्य नाही की, ब्रह्म, अध्यात्म आणि कर्म यांचे ज्ञान झाल्यावर वृद्धावस्था प्राप्त होणार नाही, शरीराला मृत्यू येणार नाही. याचे तात्पर्य असे आहे की, बोध झाल्यावर शरीराला प्राप्त होणारी वृद्धावस्था आणि मृत्यू तर येईलच परंतु ह्या दोन्ही अवस्था त्याला दु:खी करू शकणार नाहीत. जसे तेराव्या अध्यायाच्या चौतीसाव्या श्लोकात "**भूतप्रकृतिमोक्षम्**" म्हणण्याचे तात्पर्य भूत आणि प्रकृती अर्थात् कार्य आणि कारण यापासून संबंध-विच्छेद होण्यात आहे. तसेच येथे "जरामरणमोक्षाय" म्हणण्याचे तात्पर्य जरा, मृत्यू इत्यादी शरीराच्या विकारांचा संबंध-विच्छेद होण्याशी आहे.

जसे एखादा तरुण पुरुष आहे, तर त्याची आता यावेळी वृद्धावस्था नाही आणि मृत्यूचा प्रसंगही नाही, म्हणून तो यावेळी जरा-मरणापासून मुक्त आहे. परंतु वास्तविक पाहिले, तर तो जरा-मरणापासून मूक्त नाही. कारण जरा-मरणाचे कारण

* सनमुख होइ जीव मोहि जबहीं। जन्म कोटि अघ नासहिं तबहीं॥ (मानस, सुन्दर० ४४। १)

† या एकोणतीसाव्या-तीसाव्या श्लोकात आलेले "मामाश्रित्य" पदात "मदाश्रय:" चा "यतन्ति " पदात "योग युञ्जन्" चा आणि "युक्तचेतस:" पदात "मय्यासक्तमना:" चा उपसंहार केला गेला आहे. याच अध्यायाच्या आरंभी जे "समग्रम्" पद आले होते, त्याला येथे ब्रह्म, आध्यात्म, कर्म, आधिभूत, आधिदैव आणि आधियज्ञ म्हटले गेले आहे.

असलेल्या शरीराशी जोपर्यंत संबंध आहे तोपर्यंत जरा-मरणापासून रहित असूनही तो त्यापासून मुक्त नसतो. परंतु जे जीवन्मुक्त महापुरुष आहेत, त्यांच्या शरीराला जरा-मरण असूनही ते त्यांच्यापासून मुक्त असतात. म्हणून जरा-मरणापासून मुक्त होण्याचे तात्पर्य, ज्याचे ठिकाणी जरा-मरण होतात अशा प्रकृतीचे कार्य शरीराशी संपूर्णपणे संबंध-विच्छेद होणे, हे आहे. जेव्हा मनुष्य शरीराशी तादाम्य ("मी हाच आहे") मानतो तेव्हा शरीर वृद्ध झाल्यावर "मी वृद्ध झालो" आणि शरीराच्या मरण्याच्या अनुषंगाने "मी मरून जाईन" असे मानतो. ही मान्यता "शरीर मी आहे आणि शरीर माझे आहे" यावरच आधारलेली आहे. म्हणून तेराव्या अध्यायाच्या आठव्या श्लोकात म्हटले आहे "**जन्ममृत्युजराव्याधिदुःखदोषानुदर्शनम्**" अर्थात् जन्म, मृत्यू, जरा आणि व्याधी यात दुःखरूपी दोषांना पाहणे. याचे तात्पर्य, शरीराशी "मी" आणि "माझेपणा" चा संबंध राहू नये. जेव्हा मनुष्य "मी" आणि "माझे" पणापासून मुक्त होईल तेव्हा तो जरा, मरण इत्यादी पासूनही मुक्त होईल. कारण शरीराशी मानलेला संबंधच वास्तविक जन्माचे कारण आहे—"**कारणं गुणसङ्गोऽस्य सदसद्योनिजन्मसु**" (१३।२१) वास्तविक याचा शरीराशी संबंध नाही. म्हणूनच संबंध-विच्छेद होतो. तेच समाप्त होते जे वास्तविक खरे नसते.

याठिकाणी "**मामाश्रित्य यतन्ति ये**" पदांत आश्रय घेणे आणि प्रयत्न करणे या दोन गोष्टी सांगण्याचे तात्पर्य असे आहे की, मनुष्य जर स्वतः प्रयत्न करत असेल तर अभिमान येतो की, "मी असे केले ज्यामुळे असे झाले" जर स्वतः प्रयत्न न करता "भगवंताच्या आश्रयाने सर्व काही होईल" असे मानत असेल तर तो आळस आणि प्रमाद करील तसेच संग्रह आणि भोगामध्ये व्यस्त होईल. म्हणून या ठिकाणी दोन गोष्टी सांगितल्या की, शास्त्राच्या आज्ञेनुसार स्वतः तत्परतेने प्रयत्न करावा आणि ते कार्य होण्यात तसेच प्रयत्नाच्या सफलतेत कारण भगवंताला मानावे.

जे नित्य निरंतर वियुक्त होत आहे अशा शरीर-संसाराला मनुष्य प्राप्त आणि स्थायी मानतो. जोपर्यंत तो शरीर आणि संसाराला स्थायी मानून त्याला महत्त्व देत राहतो, तो-पर्यंत साधन करूनही त्याला भगवत्प्राप्ती होत नाही. जर त्याने शरीर-संसाराला स्थायी मानले नाही आणि त्याला महत्त्व दिले नाही तर भगवत्प्राप्तीत उशीर होणार नाही. म्हणून या दोन्ही बाधांना अर्थात् शरीर-संसाराची स्वतंत्र सत्ता आणि महत्ता यांना विचारपूर्वक समाप्त करणे हाच प्रयत्न करणे आहे. परंतु जे भगवंताचा आश्रय घेऊन प्रयत्न करत असतात ते श्रेष्ठ आहेत. त्यांचा तर हाच भाव असतो की, त्या भगवंताच्या कृपेनेच साधन-भजन होत आहे. भगवंताच्या कृपेचा आश्रय घेतल्याने आणि आपल्या बलाचा अभिमान न करण्याने ते भगवंताच्या समग्ररूपाला जाणून घेतात.

जे भगवंताचा आश्रय न घेता आपल्या कल्याणाच्या इच्छेने प्रयत्न करतात त्यांना आपापल्या साधनेनुसार भगवंताच्या स्वरूपाचा बोध तर होतो परंतु त्यांना भगवंताच्या समग्ररूपाचा बोध होत नाही. जसे एखादा प्राणायाम इत्यादीद्वारा योगाचा अभ्यास करतो तर त्याला अणिमा, महिमा इत्यादी सिद्धी प्राप्त होतात आणि त्याहीपेक्षा उच्च अवस्थेत गेल्यावर त्यांना परमात्म्याच्या निराकार स्वरूपाचा बोध होत असतो अथवा आपल्या स्वरूपात स्थिती होत असते. तसेच बौद्ध, जैन इत्यादी संप्रदायानुरूप साधन करणारी जितकी माणसे आहेत, जी ईश्वराला मानत नाहीत, तीही आपापल्या संप्रदायाच्या सिद्धांतानुसार साधन करून असत्-जडरूपी संसाराशी संबंध विच्छेद करून मुक्त होतात. परंतु जे संसाराला विमुख होऊन भगवंताचा आश्रय घेऊन प्रयत्न करतात त्यांना भगवंताच्या समग्ररूपाचा बोध होऊन भगवत्प्रेमाची प्राप्ती होते. ही बिलक्षणता दाखविण्यासाठीच भगवंताने येथे "**मामाश्रित्य यतन्ति ये**" म्हटले आहे.

**ते ब्रह्म तत् ( विदुः )**—अशा प्रकारे प्रयत्न (साधन) केल्यावर ते माझ्या स्वरूपाला* अर्थात् ज्या मज निर्गुण-निराकार असलेल्या, मन, बुद्धी इंद्रियादिकांचा विषय नसलेल्या, प्रत्यक्ष नसलेल्या, शास्त्र ज्याचे परोक्षरूपाने वर्णन करते अशा त्या सच्चिदानंदघन ब्रह्माला जाणून घेतात.

"**ब्रह्म**" या शब्दाबरोबर "**तत्**" देण्याचे तात्पर्य बहुतेक सर्वच "**तत्**" शब्दाने म्हटल्या जाणाऱ्या ज्या परमात्म्याला परोक्षरूपानेच पाहतात अशा परमात्म्याचाही ते साक्षात् अपरोक्षरूपाने अनुभव करून घेतात.

त्या परमात्म्याची सत्ता प्राणीमात्रात स्वतःसिद्ध असते. कारण तो परमात्मा कोणत्या देशात नाही, कोणत्या काळात नाही, कोणत्या वस्तूत नाही आणि कोणत्या व्यक्तीत नाही, असे नाही तर सर्व देशात, सर्व काळात, सर्व वस्तूत आहे आणि सर्व व्यक्तीत आहे. असे असूनही तो अप्राप्त का वाटतो? जो पूर्वी नव्हता नंतर राहणार नाही, आत्ताही असताना प्रत्येक क्षणाला वियुक्त होत आहे, अभावात जात आहे, अशा शरीर-संसाराची सत्ता आणि महत्ता स्वीकारली

* येथे अठ्ठावीसाव्या, एकोणतीसाव्या आणि तीसाव्या श्लोकात भगवंतांनी अस्मत् शब्द "माम्" चा प्रयोग केला आहे म्हणून येथे व्याख्येत "माझे स्वरूप" असा अर्थ घेतला आहे.

आहे त्यामुळे नित्यप्राप्त परमात्मतत्त्व अप्राप्त वाटू लागले.

**कृत्स्नमध्यात्मम् ( विदुः )**—ते संपूर्ण अध्यात्माला जाणून घेतात अर्थात् संपूर्ण जीव तत्त्वदृष्टीने काय आहेत या गोष्टीला ते जाणून घेतात. पंधराव्या अध्यायाच्या दहाव्या श्लोकात म्हटले आहे की, ''जीवाचे एका शरीराचा त्याग करून दुसऱ्या शरीराला ग्रहण करणे विमूढ पुरुष जाणत नाहीत आणि ज्ञानचक्षू असणारे जाणतात'' याला जाणण्याचे तात्पर्य हे नाही की, ''जीव किती आहेत ते काय काय करत असतात आणि त्यांची कोण कोणती गती होत आहे'' याला जाणतात, तर आत्मा शरीराहून वेगळा आहे, ह्याला तत्त्व-दृष्टीने जाणतात अर्थात् अनुभव करतात.

भगवंताच्या आश्रयाने साधकाचा जेव्हा क्रिया आणि पदार्थ यांच्याशी संबंध-विच्छेद होतो, तेव्हा तो अध्यात्मतत्त्वाला—आपल्या स्वरूपाला जाणून घेतो. केवळ आपल्या स्वरूपालाच नव्हे तर तिन्ही लोकांत आणि चौदा भुवनांत जितके काही स्थावर जंगम प्राणी आहेत, त्या सर्वांचे स्वरूप शुद्ध आहे, निर्मळ आहे, प्रकृतीशी असंबंध आहे असे जाणतो. अनंत जन्मापर्यंत अनंत क्रिया आणि शरीराशी ऐक्य मानल्यावरसुद्धा त्यांचे ऐक्य कधी होऊच शकत नाही आणि अनंत जन्मापर्यंत आपल्या स्वरूपाचा बोध झाला नाही तरीसुद्धा ते आपल्या स्वरूपापासून कधी वेगळे होऊच शकत नाहीत—असे जाणणे संपूर्ण अध्यात्मतत्त्वाला जाणणे आहे.

**कर्म चाखिलं विदुः**—ते संपूर्ण कर्मांच्या वास्तविक तत्त्वाला जाणून घेतात. अर्थात् सृष्टीची रचना का होत असते? कशी होत असते? आणि भगवान् कशी करतात? यालाही ते जाणून घेतात.

जसे भगवंतांनी चारही वर्णांची रचना केली. या रचनेत जीवाचे जे गुण आणि कर्म आहेत अर्थात् त्यांचे जसे भाव आहेत आणि त्यांनी जसे कर्म केले आहेत त्यानुसारच शरीराची रचना केली गेली आहे. त्या वर्णांत जन्म होण्या-बाबतीत भगवंताचा कोणताच संबंध नसतो म्हणून भगवंताकडे कर्तृत्व येत नाही आणि फलेच्छाही येत नाही. (४।१३-१४) तात्पर्य सृष्टीची रचना करत असूनही भगवान् कर्तृत्व आणि फलासक्तीपासून संपूर्णपणे निर्लिप्त असतात. तसेच मनुष्यमात्राने देश, काल, परिस्तिथीनुरूप जे काही कर्तव्य समोर येईल त्याला कर्तृत्व आणि फलासक्तिरहित होऊन केल्याने ते कर्म मनुष्याला बंधनकारक होत नाही, अर्थात् ते कर्म फलजनक होत नाही. तात्पर्य कर्माशी आपला कोणताही संबंध नाही, अशा प्रकारे त्यांच्याशी निर्लिप्ततेचा अनुभव करणे हेच संपूर्ण कर्मांना जाणणे आहे.

जो अनन्यभावाने केवळ भगवंताचा आश्रय घेतो, त्याचा प्राकृत क्रिया आणि पदार्थांचा आश्रय सुटून जातो. या कारणाने त्याला ही गोष्ट योग्य रीतीने समजून येते की, ह्या सर्व क्रिया आणि पदार्थ परिवर्तनशील आणि नाशवान आहेत. अर्थात् क्रियांचाही आरंभ आणि अंत होत असतो, तसेच पदार्थांचीही उत्पत्ती आणि विनाश, संयोग आणि वियोग होत असतो. ब्रह्मलोकापर्यंतच्या कोणत्याही क्रिया आणि पदार्थ नित्य राहणाऱ्या नाहीत. म्हणून कर्माशी माझा किंचित्मात्रही संबंध नाही—असे जाणणेच अखिल कर्माला जाणून घेणे आहे.

तात्पर्य, भगवंताचा आश्रय घेऊन साधना करणारे ब्रह्म, अध्यात्म आणि कर्माच्या वास्तविक तत्त्वाला जाणून घेतात. अर्थात् भगवंतांनी जसे म्हटले आहे की, हा संपूर्ण संसार ''माझ्या ठिकाणीच ओतप्रोत आहे'' (७।७) आणि ''सर्व काही वासुदेवच आहे'' (७।१९) तसेच ते भगवंताच्या समग्ररूपाला जाणून घेतात की, ब्रह्म, अध्यात्म आणि कर्म हे सर्व भगवत्स्वरूपच आहेत, भगवंताशिवाय यांच्या ठिकाणी दुसरी कोणतीच सत्ता नाही.

## साधिभूताधिदैवं मां साधियज्ञं च ये विदुः।
## प्रयाणकालेऽपि च मां ते विदुर्युक्तचेतसः॥ ३०॥

**ये** = जी माणसे
**साधिभूताधिदैवम्** = आधिभूत व आधिदैवासहित
**च** = आणि
**साधियज्ञम्** = आधियज्ञासहित
**माम्** = मला
**विदुः** = जाणतात,
**ते** = ती
**युक्तचेतसः** = माझ्यात तल्लीन झालेल्या चित्ताची माणसे
**प्रयाणकाले अपि** = अंतकाळीही
**माम् च** = मलाच
**विदुः** = जाणतात अर्थात् प्राप्त होतात.

*व्याख्या*— **साधिभूताधिदैवं मां साधियज्ञं च ये विदुः**—[ पूर्व श्लोकात निर्गुण-निराकाराला जाणून घेण्याचे वर्णन करून आता सगुण-साकारला जाणून घेण्याविषयी सांगत आहेत]

येथे ''अधिभूत'' नाव भौतिक स्थूल सृष्टीचे आहे ज्यात तमोगुणाची प्रधानता असते. जितकी काही भौतिक सृष्टी आहे, त्याची स्वतंत्र सत्ता नसते. त्याचे क्षणमात्रही स्थायित्व नसते. तरीपण ही भौतिक सृष्टी सत्य दिसत असते अर्थात् यात सत्यता, स्थिरता, सुखरूपता, श्रेष्ठता आणि आकर्षण दिसत असते. ही सत्यता इत्यादी सर्वची सर्व वास्तविक भगवंताचीच आहे, क्षणभंगुर संसाराची नव्हे. तात्पर्य बर्फाची सत्ता पाण्याशिवाय असू शकत नाही. तसेच भौतिक स्थूल सृष्टी अर्थात् आधिभूताची सत्ता भगवंताशिवाय असू शकत नाही. अशा प्रकारे तत्त्वदृष्टीने हा संसार भगवत्स्वरूपच आहे असे जाणणेच आधिभूतसहित भगवंताला जाणणे आहे.

''आधिदैव'' नाव सृष्टीची रचना करणाऱ्या हिरण्यगर्भ ब्रह्मदेवाचे आहे, ज्यांचे ठिकाणी रजोगुणाची प्रधानता आहे. भगवंतच ब्रह्मदेवाच्या रूपात प्रगट होत असतात अर्थात् तत्त्वदृष्टीने ब्रह्मदेव भगवत्स्वरूपच आहेत. असे जाणणेच आधिदैवासह भगवंताला जाणणे आहे.

''आधियज्ञ'' नाव भगवान् विष्णूचे आहे, जे अंतर्यामीरूपाने सर्वांत व्यापून असतात आणि ज्यांचे ठिकाणी सत्त्वगुणाची प्रधानता आहे. तत्त्वदृष्टीने भगवंतच अंतर्यामीरूपाने सर्वात परिपूर्ण आहेत—असे जाणणेच आधियज्ञासह भगवंताला जाणणे आहे.

आधिभूत, आधिदैव, आधियज्ञासहित भगवंताला जाणण्याचे तात्पर्य भगवान् श्रीकृष्णाच्या शरीराच्या कोण्या एका अंशात विराटरूप आहे. (१०।४२, ११।७) आणि त्या विराटरूपात आधिभूत (अनंत ब्रह्मांड) आधिदैव (ब्रह्मदेव) आणि आधियज्ञ (विष्णू) इत्यादी सर्व आहेत. जसे अर्जुनाने म्हटले आहे. हे देवा, मी आपल्या शरीरात संपूर्ण प्राण्यांना, ज्यांच्या नाभीपासून कमळ निघाले आहे, त्या विष्णूला, कमळावर विद्यमान असलेल्या ब्रह्मदेवाला आणि शंकर इत्यादींना पाहत आहे. (११।१५) म्हणून तत्त्वदृष्टीने आधिभूत, आधिदैव आणि आधियज्ञ भगवान् श्रीकृष्णच आहेत. श्रीकृष्णच समग्र भगवान् आहेत.

**प्रयाणकालेऽपि च मां ते विदुर्युक्तचेतसः**—जे संसाराच्या भोग आणि संग्रहाच्या प्राप्ती-अप्राप्तीत समान राहणारे आहेत, तसेच संसारापासून संपूर्णपणे उपरत होऊन भगवंताकडे वळलेले आहेत. ते पुरुष युक्तचेता (विरक्त) आहेत. अशी विरक्त माणसे अंतकाळीही मलाच जाणतात अर्थात् अंतकाळात होणाऱ्या दु:ख इत्यादीतही ती माझ्या ठिकाणीच अटळभावाने स्थित राहत असतात. त्यांची अशी दृढ स्थिती असते की, ती स्थूल आणि सूक्ष्म शरीरात कितीही खळबळ झाली तरी कधीही किंचिन्मात्रही विचलित होत नाहीत.

## भगवंताच्या समग्ररूपासंबंधी विशेष संकेत

(१) प्रकृती आणि प्रकृतीचे कार्य—क्रिया, पदार्थ इत्यादीशी आपला संबंध मानल्यानेच सर्व विकार उत्पन्न होतात आणि त्या क्रिया, पदार्थ इत्यादीची प्रगटरूपाने सत्ता दिसू लागते. परंतु प्रकृती आणि प्रकृतीच्या कार्याशी संपूर्णपणे संबंध-विच्छेद करून भगवत्स्वरूपात स्थित झाल्याने त्यांची स्वतंत्र सत्ता त्या भगवत्तत्त्वामध्येच विलीन होऊन जाते. मग त्यांची कोणती स्वतंत्र सत्ता दिसत नसते.

जसे एखाद्या व्यक्तीच्या विषयात आपली जी चांगुलपणाची-वाईटपणाची मान्यता असते ती मान्यता आपणच केलेली असते. तत्त्वदृष्टीने तर ती व्यक्ती भगवंताचे स्वरूप आहे अर्थात् त्या व्यक्तीत तत्त्वाशिवाय दुसरे कोणते स्वतंत्र व्यक्तित्व नसते. तसेच संसारात ''हे योग्य आहे हे अयोग्य आहे'' अशा प्रकारे योग्यतेची आणि अयोग्यतेची मान्यता आपलीच केलेली आहे. तत्त्वदृष्टीने तर संसार भगवंताचे स्वरूपच आहे. मात्र संसारात जी वर्ण-आश्रमाची मर्यादा आहे—''असे काम करावे आणि असे करू नये'' ही जी विधी-निषेधाची मर्यादा आहे याला महापुरुषांनी, जीवाच्या कल्याणार्थ व्यवहार करण्यासाठी मान्यता दिली आहे.

जेव्हा ही भौतिक सृष्टी नव्हती तेव्हाही भगवंत होते आणि ही लीन झाल्यावरही भगवंत राहतील—अशा रीतीने जेव्हा वास्तविक भगवत्तत्त्वाचा बोध होत असतो, तेव्हा भौतिक सृष्टीची सत्ता भगवंतातच लीन होत असते अर्थात् या सृष्टीची स्वतंत्र सत्ता राहत नसते. याचे तात्पर्य असे नाही की, संसाराची स्वतंत्र सत्ता न राहिल्यास संसार नष्ट होतो, त्याचा अभाव होतो. तर अंत:करणात जी सत्यत्वाने संसाराची सत्ता आणि महत्ता पक्की बसली होती, जी जीवाच्या कल्याणात बाधक होती, ती राहत नाही. जसे सोन्याच्या अलंकाराच्या अनेक आकृती आणि वेगवेगळे उपयोग होत असूनही या सर्वात एक सोनेच आहे. तसेच भगवद्भक्ताकडून अनेक प्रकारचा यथायोग्य सांसारिक व्यवहार झाला तरी, सर्वांत एकच भगवत्तत्त्व आहे—अशी त्यांची अटळ बुद्धी (निश्चय) असते. या तत्त्वाला समजून घेण्यासाठीच एकोणतीसाव्या आणि तीसाव्या श्लोकात समग्ररूपाचे वर्णन झाले आहे.

(२) उपासनेच्या दृष्टीने भगवंताच्या रूपाचे विशेष वर्णन दोन प्रकाराने येते. एक सगुण आणि दुसरे निर्गुण. यात

सगुणाचे दोन भेद होतात. एक सगुण-साकार आणि दुसरे सगुण-निराकार. परंतु निर्गुणाचे दोन भेद होत नाहीत, निर्गुण-निराकारच असते. मात्र निराकाराचे दोन भेद होतात. एक सगुण-निराकार आणि दुसरे निर्गुण-निराकार.

उपासक दोन रुचीचे असतात. एक सगुण विषयक रुची असणारा असतो आणि दुसरा निर्गुण विषयक रुची असणारा असतो. परंतु या दोघांची उपासना भगवंताच्या "सगुण-निराकार" रूपापासूनच आरंभ होते. जसे परमात्मप्राप्तीसाठी कोणताही साधक वाटचाल करतो तेव्हा तो प्रथम "परमात्मा आहे" अशा प्रकारे परमात्म्याची सत्ता मानतो आणि "ते परमात्मा सर्वांपेक्षा श्रेष्ठ आहेत, सर्वांपेक्षा दयाळू आहेत, त्यांच्यापेक्षा श्रेष्ठ कोणी नाहीच". त्याच्या अंत:करणात अशा भावना राहत असतात. तर उपासना सगुण निराकारापासूनच आरंभ झाली. याचे कारण असे आहे की, बुद्धी प्रकृतीचे कार्य (सगुण) असल्याने निर्गुणाला ग्रहण करू शकत नाही. म्हणून निर्गुणाच्या उपासकाचे ध्येय तर निर्गुण-निराकार असते परंतु बुद्धीने तो सगुण-निराकाराचेच चिंतन करत असतो.*

सगुण उपासक प्रथम सगुण-साकार मानून उपासना करतात. परंतु मनात जोपर्यंत साकाररूप दृढ होत नाही. तोपर्यंत "भगवंत आहेत आणि ते माझ्यासमोर आहेत" अशी मान्यता मुख्य असते. या मान्यतेत सगुण भगवंताची अभिव्यक्ती जितकी अधिक होत असते, तितकीच ती उपासना श्रेष्ठ मानली जाते. शेवटी जेव्हा तो सगुण-साकार-रूपाने भगवंताचे दर्शन, भाषण, स्पर्श आणि प्रसाद प्राप्त करून घेतो, तेव्हा त्याच्या उपासनेची पूर्णता होते.

निर्गुण उपासक परमात्म्याला संपूर्ण संसारात व्यापक समजून चिंतन करतात. त्यांची वृत्ती जितकी सूक्ष्म होत जाते, तितकीच त्यांची उपासना श्रेष्ठ मानली जाते. शेवटी सांसारिक आसक्ती आणि गुणांचा संपूर्णपणे त्याग झाल्यावर जेव्हा "मी" "तू" इत्यादी काहीही राहत नाही, केवळ चिन्मय तत्त्व शिल्लक राहत असते, तेव्हा त्याच्या उपासनेची पूर्णता होत असते.

अशा प्रकारे दोघांची आपापली उपासनेची पूर्णता झाल्यावर दोघांची एकता होते. अर्थात् दोन्ही एकाच तत्त्वाला प्राप्त होत असतात.† सगुण साकाराच्या उपासकांना तर भगवत्कृपेने निर्गुण-निराकाराचाही बोध होत असतो—

**मम दरसन फल परम अनूपा। जीव पाव निज सहज सरूपा॥**

(मानस ३।३६।५)

निर्गुण-निराकाराच्या उपासकात जर भक्तीचे संस्कार असतील आणि भगवंताच्या दर्शनाची अभिलाषा असेल तर त्याला भगवंताचे दर्शन होते अथवा भगवंताला त्याच्याकडून काही काम घ्यावयाचे असेल तर भगवान् आपल्याकडूनही त्याला दर्शन देऊ शकतात. जसे निर्गुण-निराकाराचे उपासक मधुसूदनाचार्यजी यांना भगवंतांनी आपल्याकडून दर्शन दिले होते.‡

(३) वास्तविक परमात्मा सगुण-निर्गुण, साकार-निराकार सर्व काही आहेत. सगुण-निर्गुण ही तर त्यांची विशेषणे आहेत, नावे आहेत. साधक जर परमात्म्याला गुणांसहित मानत असेल तर ते त्याच्यासाठी सगुण असतात आणि साधक त्यांना गुणरहित मानत असेल तर त्याच्यासाठी ते निर्गुण आहेत. वास्तविक पाहिले तर परमात्मा सगुण तसेच निर्गुण दोन्ही आहेत आणि दोन्हींच्या पलीकडेही आहेत. परंतु या वास्तविकतेचा पत्ता तेव्हाच लागतो जेव्हा बोध होत असतो.

भगवंताचे सौन्दर्य, माधुर्य, ऐश्वर्य, औदार्य इत्यादी जे दिव्य गुण आहेत, त्या गुणांसह सर्वत्र व्यापक असलेल्या परमात्म्याला "सगुण" म्हणतात या सगुणाचे दोन भेद होतात—

**(१) सगुण-निराकार**—जसे आकाशाचा गुण "शब्द" आहे, परंतु आकाशाला कोणताही आकार (आकृती) नाही, म्हणून आकाश सगुण-निराकार झाले तसेच प्रकृती आणि प्रकृतीचे कार्य संसारात परिपूर्णरूपाने व्यापून असलेल्या

* उपासना सगुण-निराकारापासून आरंभ होते. म्हणूनच भगवंतांनी या सातव्या अध्यायाच्या अठ्ठावीसाव्या श्लोकात "सगुण-निराकार" चे वर्णन केले आहे. नतंर एकोणतीसाव्या श्लोकात 'निर्गुण निराकार' चे आणि तीसाव्या श्लोकात "सगुण-साकाराचे" चे वर्णन केले आहे. अशा प्रकारे येथे तर तिन्ही स्वरूपाचे एका एका श्लोकात वर्णन केले गेले आहे. परंतु पुढे आठव्या अध्यायात या तिन्हीचे तीन तीन श्लोकांत वर्णन केले गेले आहे. जसे आठव्या अध्यायाच्या आठव्या, नवव्या आणि दहाव्या श्लोकात "सगुण-निराकार" च्या उपासनेचे, अकराव्या, बाराव्या आणि तेराव्या श्लोकात निर्गुण-निराकाराच्या उपासनेचे तसेच चौदाव्या, पंधराव्या आणि सोळाव्या श्लोकात "सगुण-साकार" च्या उपासनेचे विशद वर्णन केले गेले आहे.

† सगुण-निर्गुणाचा भेद तर उपासनेच्या दृष्टीने असतो वास्तविक या दोन्ही उपासनेत उपास्य तत्त्व एकच असते. उपासना साधकाची रुची, विश्वास आणि योग्यता यानुसार केली जात असते. म्हणून साधकांची भिन्न भिन्न रुची, विश्वास आणि योग्यता असल्याकारणाने उपासनाही भिन्न भिन्न केल्या जातात. परंतु शेवटी संपूर्ण उपासनांनी एकाच उपास्य तत्त्वाची प्राप्ती होत असते. त्या उपास्य तत्त्वालाच "समग्र ब्रह्म" म्हणतात.

‡ अद्वैतवीथीपथिकैरुपास्याः स्वाराज्यसिंहासनलब्धदीक्षाः। शठेन केनापि वयं हठेन दासीकृता गोपवधूविटेन॥

'अद्वैतमार्ग अनुयायांच्याद्वारा पूज्य तसेच स्वाराज्य सिंहासनारूढ होण्याचा अधिकार प्राप्त झालेल्या, आम्हांला गोपींच्या मागे फिरणाऱ्या कोण्या धूर्तने हट्टाने आपल्या चरणांचे गुलाम बनविले!'

परमात्म्याचे नाव सगुण-निराकार आहे.

**( २ ) सगुण-साकार—** तेच सगुण-निराकार परमात्मा जेव्हा आपल्या दिव्य प्रकृतीला अधिष्ठित करून आपल्या योगमायेने लोकांच्या समोर प्रगट होतात, त्यांच्या इंद्रियांचे विषय होतात, तेव्हा त्या परमात्म्याला सगुण-साकार म्हणतात. सगुण तर ते होतेच, आकृतियुक्त प्रगट झाल्याने ते साकार म्हणविले जातात.

जेव्हा साधक परमात्म्याला दिव्य, अलौकिक गुणांपासून-ही रहित मानतो, अर्थात् साधकाची दृष्टी केवळ निर्गुण परमात्म्याकडे राहत असते तेव्हा परमात्म्याचे ते स्वरूप ''निर्गुण-निराकार'' म्हटले जाते.

गुणांचेही दोन भेद असतात (१) परमात्म्याचे स्वरूपभूत सौंदर्य, माधुर्य, ऐश्वर्य इत्यादी दिव्य, अलौकिक, अप्राकृत गुण आणि (२) प्रकृतीचे सत्त्व, रज, आणि तम गुण. परमात्मा मग सगुण-निराकार असोत, अथवा सगुण-साकार असोत, ते प्रकृतीच्या सत्त्व, रज आणि तम ह्या तिन्ही गुणांपासून रहित असतात, अतीत असतात. ते जरी प्रकृतीच्या गुणांना स्वीकार करून सृष्टीची उत्पत्ती, स्थिती आणि प्रलय यांची लीला करतात, तरीपण ते प्रकृतीच्या गुणांपासून संपूर्णपणे रहितच असतात (७।१३)

जे परमात्मा गुणांनी कधी बांधले जात नाहीत, ज्यांचा गुणांवर पूर्ण अधिकार असतो तेच परमात्मा निर्गुण असतात. जर परमात्मा गुणांनी बांधले गेले आणि गुणांच्या अधीन झाले, तर ते कधी निर्गुण होऊ शकले नसते. निर्गुण तर तेच होऊ शकतात, जे गुणांपासून संपूर्णपणे अतीत आहेत. अशा परमात्म्यातच संपूर्ण गुण राहू शकतात. म्हणून परमात्म्याला सगुण-निर्गुण, साकार-निराकार इत्यादी सर्व काही म्हणता येऊ शकते. अशा परमात्म्याचेच वर्णन एकोणतीसाव्या-तीसाव्या श्लोकांत समग्ररूपाने केले गेले आहे.

## अध्यायासंबंधी विशेष गोष्ट

भगवंतांनी या अध्यायामध्ये प्रथम परिवर्तनशीलला ''अपरा'' आणि अपरिवर्तनशीलला ''परा'' नावाने म्हटले (७।४-५) मग या दोन्हींच्या संयोगाने संपूर्ण प्राण्यांची उत्पत्ती सांगितली आणि स्वतः ला संपूर्ण संसाराचा प्रभव आणि प्रलय म्हटले. अर्थात् संसाराच्या आरंभी आणि शेवटी ''केवळ मीच राहत असतो'' हे सांगितले (७।६-७). त्याच प्रसंगात भगवंतांनी सतरा विभूतींच्या रूपात कारणरूपाने आपली व्यापकता दाखविली. (७।८-१२) मग भगवंतांनी म्हटले की, जो तिन्ही गुणांनी मोहित असतो अर्थात् ज्याने निरंतर परिवर्तनशील प्रकृतीशी आपला संबंध मानून घेतला आहे तो गुणांहून पलीकडे असलेल्या मला जाणू शकत नाही. (७।१३) ही गुणमयी माया तरून जाण्यास अत्यंत दुस्तर आहे. जे मला शरण येतात ते या मायेला तरून जातात. (७।१४). परंतु जे मला विमुख होऊन निषिद्ध आचरणाकडे वळतात ती दुष्कृती माणसे मला शरण होत नाहीत. (७।१५). आता येथे चौदाव्या श्लोकानंतरच सोळावा श्लोक सांगितला असता तर फार योग्य झाले असते, अर्थात् चौदाव्या श्लोकात शरण होण्याविषयी म्हटले. तेव्हा आता शरण होणारे चार प्रकारचे असतात. असे म्हटले असते तर संदर्भाच्या दृष्टीने विचारांची साखळी योग्य रीतीने जोडली गेली असती. परंतु पंधरावा श्लोक मध्येच आल्यामुळे प्रकरणात खंड पडला. म्हणून हा श्लोक प्रकरणाच्या विरुद्ध अर्थात् प्रकरणाला बाधा करणारा वाटतो. परंतु वास्तविक हा श्लोक प्रकरणाच्या विरुद्ध नाही. कारण हा श्लोक आला नसता, तर ''पापी मला शरण येत नाहीत'' हे म्हणणे शिल्लक राहिले असते. म्हणून पंधराव्या श्लोकात ''दुष्कृती (पापी) मला शरण होतच नाहीत'' ही गोष्ट सांगितली आणि सोळाव्या श्लोकात शरण होणाऱ्यांचे चार प्रकार सांगितले.

आता जे शरण येतात त्यांचेही दोन प्रकार आहेत एक तर भगवंताना भगवान् समजून अर्थात् भगवंताची महत्ता समजून भगवंताला शरण होतात. (७।१६-१९) आणि दुसरे भगवंताला साधारण मनुष्य मानून देवतांना सर्वात श्रेष्ठ मानतात. म्हणून भगवंताचा आश्रय न घेता कामनापूर्तीसाठी देवतांना शरण जातात (७।२०-२३)

देवतांना शरण जाण्यातही दोन हेतू असतात. कामनेची वृद्धी आणि भगवंताच्या महत्तेला न जाणणे. यापैकी पहिल्या हेतूचे वर्णन तर वीसाव्यापासून तेवीसाव्या श्लोकांपर्यंत करण्यात आले आणि दुसऱ्या हेतूचे वर्णन चोवीसाव्या श्लोकात करण्यात आले. जे भगवंताला सामान्य मनुष्य मानतात त्यांच्यासमोर भगवान् प्रगट होत नाहीत ही गोष्ट पंचवीसाव्या श्लोकात सांगितली.

आता असे वाटण्याचा संभव आहे की, भगवंतही मायेने झाकले गेले असतील. म्हणून भगवान् म्हणतात की, ''माझे ज्ञान झाकलेले नाही'' (७।२६) मला न जाणण्यात राग-द्वेष हेच मुख्य कारण आहेत (७।२७) जे या द्वन्द्वरूपी मोहाने रहित असतात ते दृढव्रती होऊन माझे भजन करत असतात (७।२८) जे माझा आश्रय घेऊन प्रयत्न करतात ते माझ्या समग्ररूपाला जाणत असतात आणि शेवटी अंतसमयी मलाच प्राप्त होतात. (७।२९-३०)

या अध्यायाचा साद्यंत विचार करून पाहिला तर

भगवंताला विमुख आणि सम्मुख होण्याचेच यात वर्णन आहे. तात्पर्य जडतेकडे वृत्ती राहिल्याने माणसे वारंवार जन्मत-मरत राहतात. जर ते जडतेशी विन्मुख होऊन भगवंताला सम्मुख झाले, तर ते सगुण-निराकार, निर्गुण-निराकार आणि सगुण-साकार—अशा भगवंताच्या समग्ररूपाला जाणून अंतकाळी भगवंतालाच प्राप्त होतात.

**परिशिष्ट भाव**—या अध्यायाच्या आरंभी भगवंताने अर्जुनाला म्हटले होते की, मी ते विज्ञानासहित ज्ञान सांगतो ज्यामुळे तू माझ्या समग्ररूपाला जाणशील आणि जे जाणल्यावर मग काहीही जाणणे शिल्लक राहणार नाही. पुढे एकोणीसाव्या श्लोकात भगवंताने '**वासुदेवः सर्वम्**' सांगून आपल्या समग्ररूपाचे संक्षेपाने वर्णन केले. आता अध्यायाच्या शेवटी भगवान् त्याचे स्पष्टीकरण करतात.

साधकाचा जन्म तर झालेला आहे आणि व्याधी अवश्यंभावी नाही. परंतु वृद्धावस्था आणि मृत्यू—हे दोन्ही अवश्यंभावी आहेत आणि यापासून मनुष्याला अधिक दुःख होते. म्हणून येथे 'जरामरणमोक्षाय' सांगण्याचे तात्पर्य हे आहे की, भगवंताचा आश्रय घेणारे भक्त वृद्धावस्था आणि मृत्यू—दोन्हीपासून मुक्त होतात अर्थात् त्यांना शरीर राहूनसुद्धा वृद्धावस्थेचेही दुःख होत नाही आणि गतीच्या विषयातही चिंता राहत नाही की, मृत्यूनंतर आपली कोणती गती होईल? ते भगवंताचा आश्रय घेऊन भक्ती करतात. म्हणून ते परा-अपरासहित भगवंताच्या समग्ररूपाला जाणतात अर्थात् विज्ञानासहित ज्ञानाला जाणतात.

जरी कर्मयोगी आणि ज्ञानयोगी दोघेही जन्म-मरणापासून मुक्त होतात. परंतु भक्त जरा-मरणापासून मुक्त होण्याबरोबर भगवंताच्या समग्ररूपालाही जाणतात. कारण कर्मयोगी आणि ज्ञानयोगी यांची तर आरंभापासूनच आपल्या साधनेची निष्ठा असते (गीता ३।३), परंतु भक्त आरंभापासूनच भगवन्निष्ठ अर्थात् भगवत् परायण असतो. भगवन्निष्ठ झाल्यामुळे भगवान् कृपा करून त्याला आपल्या समग्ररूपाचे ज्ञान करवितात.

याच अध्यायाच्या तीसऱ्या श्लोकात भगवंताने म्हटले होते की, कोणी एखादाच (विरळा) मनुष्य माझ्या समग्ररूपाला जाणतो—'**कश्चिन्मां वेत्ति तत्त्वतः**'। येथे सांगतात की, जो मला शरण होतो तो माझ्या समग्ररूपाला जाणतो. म्हणून भगवंताच्या समग्ररूपाला (विज्ञानासहित ज्ञानाला) जाणण्याची मुख्य साधना आहे—शरणागती (**मामाश्रित्य**). कारण समग्राचे ज्ञान विवेकाने होत नाही, तर श्रद्धा-विश्वासपूर्वक शरणागत झाल्यावर भगवत्कृपेनेच होते. म्हणून भगवंताने सातव्या अध्यायाच्या आरंभी '**मदाश्रयः**' सांगून शेवटी '**मामाश्रित्य**' पदाने त्याचा उपसंहार केला आहे.

**ब्रह्म** (निर्गुण-निराकार), **कृत्स्न अध्यात्म** (अनंत योनींचे अनंत जीव) आणि **अखिल कर्म** (उत्पत्ती-स्थिती-प्रलय इत्यादींच्या संपूर्ण क्रिया)—हा 'ज्ञान' विभाग आहे. या विभागात निर्गुणाची मुख्यता आहे.

**आधिभूत** (आपल्या शरीरासह संपूर्ण पंचभौतिक जगत्), **आधिदैव** (मन-इंद्रिये यांच्या अधिष्ठातृ देवतासह ब्रह्माजी इत्यादी सर्वच देवता) आणि **आधियज्ञ** (अंतर्यामी विष्णू आणि त्यांची सर्वच रूपे)—हा '**विज्ञान**' विभाग आहे. या विभागात सगुणाची मुख्यता आहे.

आधिभूत, आधिदैव आणि आधियज्ञ यांच्या '**सहित**' म्हणण्याचे तात्पर्य हे आहे की, सत्-असत्, परा-अपरा सर्व काही भगवंतच आहेत. भगवंताशिवाय किंचिन्मात्रही काही नाही. सत्-असत्‌ला वेग-वेगळे करण्याने ज्ञानमार्ग होतो—'**नासतो विद्यते भावो नाभावो विद्यते सतः**'। **उभयोरपि**............' (गीता २।१६) आणि एक करण्याने भक्तिमार्ग होतो—'**सदसच्चाहमर्जुन**'. (गीता ९।१९)

'ब्रह्म' चा विषय पूर्वी पाचव्या अध्यायात तेराव्यापासून सव्वीसाव्या श्लोकापर्यंत सांगितला गेला आहे. 'कृत्स्न अध्यात्म' याचा विषय पूर्वी सहाव्या अध्यायाच्या एकोणतीसाव्या श्लोकात '**सर्वभूतस्थमात्मानम्**' पदाने सांगितला गेला आहे. 'अखिल कर्म' याचा विषय पूर्वी चौथ्या अध्यायाच्या अठराव्या, तेवीसाव्या आणि तेहतीसाव्या श्लोकात क्रमाने '**कृत्स्नकर्मकृत्**', '**कर्म समग्रम्**' आणि '**सर्वं कर्माखिलम्**' पदाने सांगितला गेला आहे.

'कर्म' सीमित आहे, कर्मापेक्षा व्यापक 'अध्यात्म' आहे आणि अध्यात्मापेक्षा व्यापक 'ब्रह्म' आहे. परंतु '**माम्**' (समग्र) त्या ब्रह्मापेक्षाही श्रेष्ठ आहे. कारण ब्रह्माच्या अंतर्गत तर समग्र येत नाही परंतु समग्राच्या अंतर्गत ब्रह्म येते.

'अध्यात्म' या बरोबर 'कृत्स्न' शब्द देण्याचे तात्पर्य आहे—ज्यांना भगवंताने आपली परा-प्रकृती सांगितली आहे, ते अनेकरूपाने दिसणारे संपूर्ण जीव. 'कर्मा' बरोबर 'अखिल' शब्द देण्याचे तात्पर्य आहे—ज्यांच्या फलरूपात जीव अनेक योनीत आणि अनेक लोकात जातो आणि शुभ-अशुभ संपूर्ण कर्मांचे फल भोगतो. परंतु 'ब्रह्म' बरोबर 'कृत्स्न' अथवा 'अखिल' शब्द न देण्याचे तात्पर्य हे आहे की, ब्रह्म अनेक नाही तर एकच आहे.

गीतेत भगवंताने दोन निष्ठा सांगितल्या आहेत—कर्मयोग आणि ज्ञानयोग. ज्या दोन्ही निष्ठा लौकिक आहेत—**'लोकेऽस्मिन्द्विविधा निष्ठा'** (गीता ३। ३), परंतु भक्तियोग अलौकिक निष्ठा आहे. कारण कर्मयोगात 'क्षराची' (संसाराची) प्रधानता आहे आणि ज्ञानयोगात 'अक्षराची' (जीवात्म्याची) प्रधानता आहे. क्षर आणि अक्षर—दोन्हीही लोकात आहेत—**'द्वाविमौ पुरुषौ लोके क्षरश्चाक्षर एव च'** (गीता १५। १६) म्हणून कर्मयोग आणि ज्ञानयोग—दोन्ही लौकिक निष्ठा आहेत. परंतु भक्तियोगात 'परमात्म्याची' प्रधानता आहे, जे क्षराहून अतीत आणि अक्षरापेक्षा उत्तम आहे. (१५। १७-१८) म्हणून भक्तियोग अलौकिक निष्ठा आहे. भगवंताच्या समग्ररूपात ब्रह्म, अध्यात्म आणि कर्म—यात लौकिक निष्ठेची (कर्मयोग आणि ज्ञानयोगाची) गोष्ट आली आहे.* (५। ४-५) आणि आधिभूत, आधिदैव आणि आधियज्ञ—यात अलौकिक निष्ठेची (भक्तियोगाची) गोष्ट आली आहे. 'ज्ञान' लौकिक आहे—**'न हि ज्ञानेन सदृशं पवित्रमिह † विद्यते'** (गीता ४। ३८) आणि विज्ञान अलौकिक आहे. लौकिक आणि अलौकिक—दोन्हीही समग्र भगवंताची रूपे आहेत—**'वासुदेवः सर्वम्'**

'लोक' शब्दात जडही आहे आणि चेतनही आहे. केवळ जड अथवा केवळ चेतन याचा वाचक 'लोक' शब्द होऊ शकत नाही. म्हणून 'लौकिकात' जड आणि चेतन दोन्हीही येतात. परंतु 'अलौकिकात' केवळ चेतनच येते, कारण अलौकिक सदा चिन्मयच असते. परंतु 'समग्र' यात लौकिक आणि अलौकिक—दोन्ही येतात.

येथे एक विशेष लक्षात घेण्याची गोष्ट आहे की, निर्गुण-निराकार 'ब्रह्माचे' नाव भगवंताच्या समग्ररूपाच्या अंतर्गत आले आहे. लोकात बहुधा या गोष्टीची प्रसिद्धी आहे की, 'निर्गुण-निराकार ब्रह्माच्या अंतर्गतच सगुण ईश्वर आहे. ब्रह्म मायारहित आहे आणि ईश्वर मायासहित आहे. म्हणून ब्रह्माच्या एका अंशात ईश्वर आहे.' वास्तविक असे मानणे शास्त्र संमत आणि युक्तिसंगत नाही. कारण जर ब्रह्मात माया नाहीच तर मग मायासहित ईश्वर ब्रह्माच्या अंतर्गत कसे झाले? ब्रह्मात माया कोठून आली? परंतु गीतेत भगवान् सांगत आहेत की, माझ्या समग्ररूपाच्या एका अंशात ब्रह्म आहे! म्हणून भगवंताने आपल्याला ब्रह्माचा आधार सांगितले आहे—**'ब्रह्मणो हि प्रतिष्ठाहम्'** (गीता १४। २७) 'मी ब्रह्माची प्रतिष्ठा आहे' आणि **'मया ततमिदं सर्वं जगदव्यक्तमूर्तिना'** (गीता ९। ४) 'हा सर्व संसार माझ्या अव्यक्त स्वरूपाने व्याप्त आहे'. भगवंताच्या या कथनाचे तात्पर्य हे आहे की, ब्रह्माचा अंश मी नाही, तर माझा अंश ब्रह्म आहे. म्हणून निष्पक्ष विचार केल्यावर असे दिसून येते की, गीतेत ब्रह्माची मुख्यता नाही तर ईश्वराची मुख्यता आहे. पूर्ण तत्त्व समग्रच आहे. समग्रात सगुण-निर्गुण, साकार-निराकार सर्व येतात.

वास्तविक पाहिले तर समग्ररूप सगुणाचेच होऊ शकते, कारण सगुण शब्दाच्या अंतर्गत तर निर्गुण येऊ शकते. परंतु निर्गुण शब्दाच्या अंतर्गत सगुण येऊ शकत नाही. कारण सगुणात निर्गुणाचा निषेध नाही. परंतु निर्गुणात गुणांचा निषेध आहे. म्हणून निर्गुणात समग्र शब्द लागूच शकत नाही. म्हणून येथे 'आध्यात्म' आणि 'कर्म' यांच्याबरोबर तर क्रमाने 'कृत्स्न' आणि 'अखिल' शब्द आले आहेत जे समग्रतेचे वाचक आहेत. परंतु 'ब्रह्म' बरोबर समग्रतेचा वाचक कोणताही शब्द कुठेही आला नाही. म्हणून समग्रता सगुणातच आहे, निर्गुणात नाही.

**प्रश्न**—ब्रह्म, आध्यात्म आणि कर्म—हे तिन्ही लौकिक कसे आहेत?

**उत्तर**—भगवंताने ब्रह्माला 'अक्षर' म्हटले आहे—**'अक्षरं ब्रह्म परमम्'** (गीता ८। ३) आणि जीवालाही 'अक्षर' म्हटले आहे—**'द्वाविमौ पुरुषौ लोके क्षरश्चाक्षर एव च'** (गीता १५। १६). जीव आणि ब्रह्म—दोन्ही एक आहेत—**'अयमात्मा ब्रह्म'** (माण्डूक्य० १) प्रकृतीशी (शरीराशी) संबंध झाल्याने जो 'जीव' (आध्यात्म) आहे.‡ तोच प्रकृतीशी संबंध न झाल्याने सामान्य 'ब्रह्म' आहे. म्हणून गीतेनुसार जसा जीव लोकात आहे तसेच ब्रह्मही लोकात आहे अर्थात् ब्रह्म लौकिक निष्ठेने (कर्मयोगाने आणि ज्ञानयोगाने) प्रापणीय तत्त्व आहे.

'आध्यात्म' अर्थात् जीवाने जगताला धारण केले आहे—**'ययेदं धार्यते जगत्'** (गीता ७। ५) जीवाची स्वतःची स्वतंत्र सत्ता नाही. म्हणून जगताच्या संगाने जीवही जगत् अर्थात् लौकिक होतो. (गीता ७। १३) लोकात असल्यामुळेच जीव लौकिक आहे—**'ममैवांशो जीवलोके'** (गीता १५। ७), **'द्वाविमौ पुरुषौ लोके क्षरश्चाक्षर एव च'** (गीता १५। १६)

---

* 'आध्यात्म' यापासून ज्ञानयोग आणि 'कर्म' यापासून कर्मयोग घ्यावा. ज्ञानयोग आणि कर्मयोग—दोन्हीपासून ब्रह्माची प्राप्ती होते—भक्तीचा प्रसंग असल्याने येथे भगवंताने ज्ञानयोग आणि कर्मयोग यांचे विस्ताराने वर्णन केले नाही. यांचे विस्ताराने वर्णन मागील (दुसऱ्यापासून सहाव्या) अध्यायात केले आहे.

† येथे 'पवित्रमिह' च्या अंतर्गत आलेला 'इह' शब्द लोकाचा वाचक आहे.

‡ बँध्यो बिषय सनेह ते, ताते कहियै जीव।
अलख अजोणी आप है, हरिया न्यारौ थीव॥

कर्म दोन रीतीने होतात—सकामभावाने आणि निष्कामभावाने. ही दोन्हीही रीतीने होणारी कर्म लोकात असल्याने लौकिक आहेत. *

**प्रश्न**—'आधिभूत' आधिदैव आणि आधियज्ञ—हे तिन्ही अलौकिक कसे आहेत?

**उत्तर**—'आधिभूत' अर्थात् संपूर्ण पंचभौतिक जगत् तत्त्वाने भगवंताचेच स्वरूप असल्याने अलौकिक आहे—**'अमृतं चैव मृत्युश्च सदसच्चाहमर्जुन'** (गीता ९।१९) 'अमृत आणि मृत्यू तसेच सत् आणि असत्‌ही मीच आहे'.† भगवंताने अर्जुनाला जे विराटरूप दाखविले होते, ते देखील दिव्य अर्थात् अलौकिक होते.‡ ते दिव्य विराटरूप भगवंताने स्वतःच्याच दिव्य शरीराच्या एका अंशात दाखविले होते.$ म्हणून भगवंताचेच विराटरूप असल्यामुळे हे पंचभौतिक जगतही अलौकिकच आहे.+ भगवंताने संसारात आपल्या विभूतींनाही दिव्य अर्थात् अलौकिक म्हटले आहे—**'दिव्या ह्यात्मविभूतयः'** (गीता १०।१९), **'मम दिव्यानां विभूतीनाम्'** (गीता १०।४०)卐. परंतु जीवाला अज्ञानवश झाल्यामुळे (राग-द्वेषामुळे) हे जगत् लौकिक दिसते. म्हणून अज्ञान नाहीसे झाल्यावर जडता राहतच नाही, केवळ चिन्मयता राहते.

'आधिदैव' अर्थात् ब्रह्माजी इत्यादी सर्व देवता अलौकिक आहेत.

'आधियज्ञ' अर्थात् अंतर्यामी भगवान् सर्वांच्या हृदयात राहत असूनही निर्लिप्त असल्यामुळे अलौकिक आहेत.'#

भगवंताने **'साधि भूताधिदैवं मां साधियज्ञम्'** पदांमध्ये स्वतःला आधिभूत, आधिदैव आणि आधियज्ञ यांच्यासह जाणण्याबाबत सांगितले आहे. यावरुन सिद्ध होते की, परमात्म्यासह असल्यानेच ते तिन्ही अलौकिक आहेत, अन्यथा लौकिकच आहेत. जोपर्यंत भगवंताशी संबंध होत नाही तोपर्यंत सर्व लौकिकच असते. परंतु भगवंताशी संबंध झाल्याने सर्व अलौकिक होते. म्हणून आपला प्रयत्न मुख्य असल्यामुळे कर्मयोग आणि ज्ञानयोग **'लौकिक निष्ठा'** आहेत आणि भगवंताचा आश्रय मुख्य

---

* लोकात होणारे सकाम कर्म—'यज्ञार्थात्कर्मणोऽन्यत्र लोकोऽयं कर्मबन्धनः।' (गीता ३।९), 'क्षिप्रं हि मानुषे लोके सिद्धिर्भवति कर्मणा॥' (गीता ४।१२), 'कर्मानुबन्धीनि मनुष्यलोके' (गीता १५।२).

लोकात होणारे निष्काम कर्म—'लोकेऽस्मिन्द्विविधा.........योगिनाम्॥'

वास्तविक कर्म सकाम अथवा निष्काम होत नाहीत, तर कर्ता सकाम अथवा निष्काम असतो. म्हणून सकाम-निष्काम हे भाव कर्त्यात राहतात.

† मनसा वचसा दृष्ट्या गृह्यतेऽन्यैरपीन्द्रियैः।
अहमेव न मत्तोऽन्यदिति बुध्यध्व मञ्जसा॥ (श्रीमद्भा० ११।१३।२४)

'मनाने, वाणीने, दृष्टीने आणि अन्य इंद्रियांनेही जे काही ग्रहण केले जाते ते सर्व मीच आहे. म्हणून माझ्याशिवाय दुसरे काहीही नाही—हा सिद्धान्त तुम्हीलोक विचारपूर्वक लवकर समजून घ्या, स्वीकार करा.'

‡ 'नानाविधानि दिव्यानि' (गीता ११।५), 'अनेकदिव्याभरणं दिव्यानेकोद्यतायुधम्' (गीता ११।१०), 'दिव्यमाल्याम्बरधरं दिव्यगन्धानुलेपनम्' (गीता ११।११), 'पश्यामि देवांस्तव देव देहे...........सर्वानुरगांश्च दिव्यान्' (गीता ११।१५).

$ भगवंताचे वचन आहे—'इहैकस्थं जगत्कृत्स्नं.........मम देहे' (गीता ११।७)
संजयाचे वचन आहे—'तत्रैकस्थं जगत्कृत्स्नं..........अपश्यद्देवदेवस्य शरीरे' (गीता ११।१३)
अर्जुनाचे वचन आहे—'पश्यामि देवांस्तव देव देहे' (गीता ११।१५)

**+ खं वायुमग्निं सलिलं महीं च**
**ज्योतींषि सत्त्वानि दिशो द्रुमादीन्।**
**सरित्समुद्रांश्च हरेः शरीरं**
**यत् किञ्च भूतं प्रणमेदनन्यः॥** (श्रीमद्भा० ११।२।४१)

'आकाश, वायू, अग्नी, जल, पृथ्वी, ग्रह-नक्षत्र, जीव-जन्तू, दिशा, वृक्ष, नद्या, समुद्र—सर्वची सर्व भगवंताचीच शरीरे आहेत—असे मानून भक्त सर्वांनाच अनन्यभावाने प्रणाम करतो.'

**भूद्वीपवर्षसरिदद्रिनभः समुद्र पाताल दिङ्नरकभागणलोकसंस्था।**
**गीता मया तव नृपाद्भुतमीश्वरस्य स्थूलं वपुः सकलजीवनिकायधाम॥**

(श्रीमद्भा० ५।२६।४०)

'परिक्षित्! मी तुला पृथ्वी, तिच्या अंतर्गत द्वीप, वर्ष, नदी, पर्वत, आकाश, समुद्र, पाताल, दिशा, नरक, ज्योतिर्गण आणि लोकांच्या स्थितीचे वर्णन केले. हेच भगवंताचे अती अद्भुत स्थूल रूप आहे, जे समस्त जीवसमुदायाचा आश्रय आहे.'

卐 अर्जुनानेही विभूतींना दिव्य म्हटले आहे—'वक्तुमर्हस्यशेषेण दिव्या ह्यात्मविभूतयः' (गीता १०।१६).

**# द्वा सुपर्णा सयुजा सखाया समानं वृक्षं परिषस्वजाते।**
**तयोरन्यः पिप्पलं स्वाद्वत्त्यनश्नन्नन्यो अभिचाकशीति॥** (मुण्डक ३।१।१, श्वेताश्वतर० ४।६)

बरोबर राहणारे तसेच परस्परामध्ये सखाभाव ठेवणारे दोन पक्षी जीवात्मा आणि परमात्मा एकाच वृक्षाचा-शरीराचा आश्रय घेऊन राहतात त्या दोन्हीपैकी एक (जीवात्मा) त्या वृक्षाच्या कर्मफलांचा आस्वाद घेत घेत उपभोग करतो परंतु दुसरा (परमात्मा) उपभोग न करता केवळ त्याला प्रकाशित करतो.

असल्यामुळे भक्तियोग 'अलौकिक निष्ठा' आहे.

वास्तविक लौकिक हे काही तत्त्व नाही. वास्तविक तत्त्व तर अलौकिकच आहे. परंतु साधकाच्या दृष्टीने लौकिक आणि अलौकिक—हे दोन भेद सांगितले गेले आहेत. तात्पर्य हे आहे की, लौकिक-अलौकिकाचा विभाग अज्ञानवश झालेल्या राग-द्वेषामुळेच आहे. राग-द्वेष नसतील तर सर्व काही अलौकिक, चिन्मय, दिव्यच आहे—**'वासुदेवः सर्वम्'**। कारण लौकिकाची स्वतंत्र सत्ता नाहीच. राग-द्वेषामुळेच लौकिकाची सत्ता आणि महत्ता दिसते. राग-द्वेषामुळेच जीवाने भगवत्स्वरूप संसाराला लौकिक बनविले आणि स्वतःही लौकिक बनला.

विज्ञानासहित ज्ञानाचे अर्थात् भगवंताच्या समग्ररूपाचे वर्णन करण्याचे तात्पर्य हे आहे की, जड-चेतन, सत्-असत्, परा-अपरा, क्षेत्र-क्षेत्रज्ञ इत्यादी जे काही आहे ते सर्व भगवंताचे स्वरूप आहे. म्हणून भगवंताने येथे समग्ररूप वर्णनाच्या आदी आणि अंती **'माम्'** पद दिले आहे, जे समग्राचे वाचक आहे—**'मामाश्रित्य'** (७। २९) आणि **'मां ते विदुः'** (७। ३०).

भगवंताने कर्माच्या गतीला दुर्गम म्हटले आहे—**'गहना कर्मणो गतिः'** (गीता ४। १७), परंतु भक्त त्यालाही जाणतो. कर्मात अकर्म आणि अकर्मात कर्म (४। १८)—दोन्हीला भक्त जाणतो. तात्पर्य हे आहे की, तो कर्मालाही जाणतो आणि कर्मयोगालाही जाणतो. कर्मयोगी तर कर्मयोगालाच जाणतो आणि ज्ञानयोगी ज्ञानयोगालाच जाणतो. परंतु भक्त भगवत्कृपेने कर्मयोग आणि ज्ञानयोग—दोन्हीलाही जाणतो.

याच अध्यायाच्या पहिल्या श्लोकात आलेल्या **'योगं युञ्जन्मदाश्रयः'** ला येथे **'मामाश्रित्य यतन्ति ये'** पदांनी आणि **'मय्यासक्तमनाः'** ला येथे **'युक्तचेतसः'** पदाने म्हटले गेले आहे. तात्पर्य हे आहे की, माझा आश्रय घेतल्यामुळे भक्ताला कर्मयोग आणि ज्ञानयोग या दोन्हींची सिद्धी होते अर्थात् ते दोन्हींच्या फलरूप (लक्ष्यरूप) ब्रह्मालाही जाणतात—**'ते ब्रह्म तद्विदुः'** आणि माझ्या समग्ररूपालाही जाणतात—**'मां ते विदुः'**

**'प्रयाण कालेऽपि'** यात **'अपि'** पद देण्याचे तात्पर्य हे आहे की, ते भक्त मला अगोदरही जाणतात आणि अंतकाळीही जाणतात अर्थात् त्यांचे ज्ञान कधी लुप्त होत नाही. असे भक्त 'युक्तचेता' होतात अर्थात् त्यांच्या मनाची स्वतंत्र सत्ता राहत नाही, तर केवळ भगवंतच राहतात. भगवंताशी त्यांची अभिन्नता (नित्ययोग) असल्यामुळे ते भगवंतापासूनही वियुक्त होत नाहीत आणि भगवान्ही त्यांच्यापासून वियुक्त होत नाहीत. असे युक्तचेता भक्त अंतकाळात काहीही चिंतन झाले तरी योगभ्रष्ट होत नाहीत तर भगवंतालाच प्राप्त होतात—**'प्रयाणकालेऽपि च मां ते विदुर्युक्तचेतसः'**. कारण त्या भक्तांच्या दृष्टीत जर भगवंताशिवाय किंचिन्मात्रही काही नाही तर मग त्यांचे मन भगवंताला सोडून कुठे जाईल? का जाईल? कसे जाईल? त्यांच्या मनात कोणतेही चिंतन होईल तर भगवंताचेच चिंतन होईल. मग त्यांचे मन विचलित कसे होईल आणि मन विचलित झाल्याविना ते योगभ्रष्ट कसे होतील? कारण करणसापेक्ष साधनेत योगापासून मन विचलित झाल्यावरच मनुष्य योगभ्रष्ट होतो—**'योगाच्चलितमानसः'** (गीता ६। ३७). परंतु सर्व ठिकाणी भगवंताला पाहणाऱ्यांचा भगवंताशी नित्ययोग राहतो.

भगवंताचे काही भक्त तर मुक्ती इच्छितात—**'जरामरणमोक्षाय'** आणि काही भक्त प्रेम इच्छितात—**'मां ते विदुर्युक्तचेतसः'**. मुक्ती इच्छिणारे भक्त कर्मयोग आणि ज्ञानयोग यांना (ब्रह्म, आध्यात्म आणि कर्म यांना) जाणतात. परंतु प्रेम इच्छिणारे भक्त स्वतः समग्र भगवंताला जाणतात—**'मां विदुः'**. भगवान् आपल्या प्रेमी भक्तांना कर्मयोग (बुद्धियोग) आणि ज्ञानयोग—दोन्ही प्रदान करतात (गीता १०। १०-११). जरा-मरणरूप बन्धन आणि मुक्ती—दोन्हीही लौकिक आहेत. परंतु प्रेम अलौकिक आहे. जरी साधनभक्तीही लौकिक आहे, तरी उद्देश्य अलौकिक असल्याने ती अलौकिक साध्यभक्तीत परिणत होते—**'भक्त्या सञ्जातया भक्त्या'** (श्रीमद्भा० ११। ३। ३१).

***ॐ तत्सदिति श्रीमद्भगवद्गीतासूपनिषत्सु ब्रह्मविद्यायां योगशास्त्रे श्रीकृष्णार्जुनसंवादे ज्ञानविज्ञानयोगो नाम सप्तमोऽध्यायः॥ ७॥***

**अशा प्रकारे ॐ तत् सत् ह्या भगवन्नामाच्या उच्चारणपूर्वक, ब्रह्मविद्या व योगशास्त्रमय श्रीमद्भगवद्गीतो-पनिषद्रूपी श्रीकृष्णार्जुनसंवादात ''ज्ञानविज्ञानयोग'' नावाचा सातवा अध्याय पूर्ण झाला ॥ ७॥**

या सातव्या अध्यायात ज्ञान आणि विज्ञानाचे वर्णन केले गेले आहे. भगवंत या संपूर्ण जगाचे महाकारण आहेत असे दृढतापूर्वक मानणे ''ज्ञान'' आहे. तसेच भगवंताशिवाय काहीही नाही—असा अनुभव होणे ''विज्ञान'' आहे. ज्ञान आणि विज्ञानाने परमात्म्याशी नित्ययोगाचा अनुभव होत असतो अर्थात् ''मी भगवंताचा आहे आणि भगवंत माझे आहेत'' या परमप्रेमरूपी नित्यसंबंधाची जागृती होते. म्हणून या सातव्या अध्यायाचे नाव ''ज्ञानविज्ञानयोग'' ठेवले गेले आहे.

## सातव्या अध्यायाची पदे, अक्षरे आणि उवाच—

(१) या अध्यायात "**अथ सप्तमोऽध्यायः**" चे तीन, "**श्रीभगवानुवाच**" ची दोन, श्लोकांचो चारशे सहा आणि पुष्पिकेची तेरा पदे आहेत अशा प्रकारे संपूर्ण पदांचा योग चारशे चोवीस आहे.

(२) "**अथसप्तमोऽध्यायः**" ची सात, "**श्रीभगवानुवाच**" ची सात, श्लोकांची नऊशे साठ आणि पुष्पिकेची अठ्ठेचाळीस अक्षरे आहेत. अशा प्रकारे संपूर्ण अक्षरांचा योग एक हजार बावीस आहे. या अध्यायाचे सर्व श्लोक बत्तीस अक्षरांचे आहेत.

(३) या अध्यायामध्ये एक उवाच आहे—"**श्रीभगवानुवाच**"

## सातव्या अध्यायात प्रयुक्त छंद

या अध्यायाच्या तीस श्लोकांपैकी सहाव्या श्लोकाच्या तृतीय चरणामध्ये आणि चौदाव्या श्लोकाच्या प्रथम चरणामध्ये "नगण" प्रयुक्त असल्याने "**न विपुला**", अकराव्या श्लोकाच्या तृतीय चरणात आणि पंचवीसाव्या श्लोकाच्या प्रथम चरणात "मगण" प्रयुक्त असल्याने "**म-विपुला**", सतराव्या श्लोकाच्या प्रथम चरणात "रगण" प्रयुक्त असल्याने "**र-विपुला**", तसेच एकोणीसाव्या आणि वीसाव्या श्लोकाच्या तृतीय चरणात "भगण" प्रयुक्त असल्याने "**भ-विपुला**" संज्ञा असणारे छंद आहेत शेष तेवीस श्लोक ठीक "**पथ्यावक्त्र**" अनुष्टुप् छंदाच्या लक्षणांनी युक्त आहेत.

# सातव्या अध्यायाचा सार

भगवंताच्या दोन प्रकृती आहेत—अपरा आणि परा. संसार 'अपरा' प्रकृती आहे आणि जीव 'परा' प्रकृती आहे. अपरा-प्रकृती जड व निरंतर परिवर्तनशील आहे आणि परा-प्रकृती चेतन व नित्य अपरिवर्तनशील आहे. भगवंताने परा आणि अपरा—दोन्हींना आपलीच प्रकृती अर्थात् स्वभाव सांगितला आहे—'**इतीयं मे**' (७।४), '**मे पराम्**' (७।५). भगवंताचा स्वभाव असल्यामुळे अपरा-प्रकृतीची स्वतंत्र (भगवंताहून वेगळी) सत्ता नाही. परंतु जीव (परा-प्रकृती) अपरा ला सत्ता आणि महत्ता देऊन तिच्याशी आपला संबंध जोडतो. हा संबंध जीव दोन रीतीने मानतो—(१) अहंतापूर्वक, जसे—मी शरीर आहे आणि (२) ममतापूर्वक, जसे—शरीर माझे आहे. हा मानलेला संबंधच संपूर्ण प्राण्यांच्या उत्पन्न होण्यात कारण आहे—'**कारणं गुणसङ्गोऽस्य सदसद्योनिजन्मसु**' (गीता १३।२१).

वास्तविक संपूर्ण जगताचे कर्ता, कारण आणि कार्य एक भगवानच आहेत. भगवंताशिवाय दुसरा कोणी नाहीच—'**मत्तः परतरं नान्यत्किञ्चिदस्ति**' (७।७). हा सिद्धांत आहे की, सत्ता एकच असते, दोन नसते. म्हणून एक भगवान्च अनेक रूपात प्रकट झाले आहेत. आकाश, वायू, तेज, जल आणि पृथ्वी—ही पाच महाभूते आणि त्यांचे कार्य शब्द, स्पर्श, रूप, रस आणि गंध—हे पाच विषय—या सर्वांचे मूळ कारण भगवान्च आहेत. भगवान्च संपूर्ण प्राण्यांचे अनादी आणि अविनाशी बीज आहेत. तात्पर्य हे आहे की, सृष्टीत ज्या काही क्रिया, पदार्थ, भाव इत्यादी पाहण्यात, ऐकण्यात आणि समजण्यात येतात, त्या सर्वांचे बीज (मूळ कारण) एकमात्र भगवान्च आहेत. कारणच कार्यरूपात परिणत होते.* म्हणून कारणाची तर स्वतंत्र सत्ता असते परंतु कार्याची स्वतंत्र सत्ता नसते. म्हणून जर कोणी साधक कार्यात भगवंताला प्राप्त करू इच्छिल तर त्याला भगवान् प्राप्त होणार नाहीत—'**न त्वहं तेषु ते मयि**' (७।१२). जे सर्वांचे कारण असलेल्या भगवंताला शरण होतात, त्यांनाच भगवान् प्राप्त होतात. परंतु जे कारणरूप भगवंताला शरण न होता कार्यरूप सत्त्वादी गुणात फसतात, ते जन्म-मरणाच्या चक्रात सापडतात. अशी माणसे कार्यरूप शरीर-संसाराच्या संबंधाने होणाऱ्या कामनांच्या पूर्तीसाठी देवतांना शरण जातात. कारण ते अलौकिक भगवंताला साधारण मनुष्याप्रमाणे लौकिक मानतात. परंतु जी माणसे तिन्ही गुणांनी मोहित होत नाहीत, ते भगवंताला शरण होतात. अशा भक्तांचे चार भेद होतात—अर्थार्थी, आर्त, जिज्ञासू आणि ज्ञानी. या शरणागत भक्तातही जे 'सर्व काही भगवान्च आहेत—' अशाप्रकारे भगवंताला शरण होतात, ते महात्मा भक्त मुक्त पुरुषापेक्षाही श्रेष्ठ असल्यामुळे अत्यंत दुर्लभ आहेत. ते महात्मा भक्त भगवंताच्या कृपेने परा-अपरासहित भगवंताच्या समग्ररूपाला जाणतात, जे जाणल्यानंतर मग काहीही जाणणे शिल्लक राहत नाही. कारण त्याशिवाय दुसरी कोणती वस्तू नाहीच. त्यांचा भगवंताशी आत्मीयसंबंध होतो, ज्यामुळे प्रतिक्षण वर्धमान प्रेमाची प्राप्ती (जागृती) होते. या प्रेमाच्या जागृतीतच मनुष्यजन्माची पूर्णता आहे.

× × × ×

एक अपरा प्रकृती आहे, एक परा प्रकृती आहे आणि एक परा-अपरा यांचे मालक परमात्मा आहेत. संपूर्ण शरीर-संसार

---

* भगवान् कार्यरूपात परिणत होत नाहीत तर कार्यरूपाने प्रकट होतात.

(आधिभूत) अपरा प्रकृतीच्या अंतर्गत आणि संपूर्ण शरीरी (कृत्स्न आध्यात्म) परा-प्रकृतीच्या अंतर्गत येतात. याचे तात्पर्य हे झाले की, सर्व शरीरेही (संसारही) एक आहेत आणि सर्व शरीरीही (जीवही) एक आहेत. तसेच अपरा आणि परा—ही दोन्ही ज्याच्या शक्ती आहेत, ते परमात्माही एक आहेत. म्हणून शरीरांच्या दृष्टीने, आत्म्याच्या दृष्टीने आणि परमात्म्याच्या दृष्टीने—तिन्हीही दृष्टींनी आपण सर्व एक आहोत, अनेक नाहीत—**'नेह नानास्ति किञ्चन'** (कठ० २। १। ११, बृहदा० ४। ४। १९).

संपूर्ण शरीरात एकता स्वीकार केल्यावर कोणत्याही प्राण्याशी राग (आसक्ती) अथवा द्वेष होणार नाही आणि संपूर्ण प्राण्यांच्या हिताचा भाव जागृत होईल. असे झाल्याने 'कर्मयोग' सुगमतापूर्वक आपोआप सिद्ध होईल. कारण जर आपल्याहून भिन्न दुसरा कोणी नाहीच आणि व्यक्तिगत आपले काही नाहीच तर मग आपल्याजवळ जी काही वस्तू आहे तिच्यात ममता होणार नाही आणि जी वस्तू नाही तिची कामना होणार नाही. ममता आणि कामना राहिली नाही तर आपल्याजवळ जी काही वस्तू आहे, ती आपोआप दुसऱ्यांच्या सेवेत लागेल.

संपूर्ण जीवात एकता स्वीकार केल्यावर सर्वत्र आत्मभाव अथवा ब्रह्मभाव होईल—**'सर्वं खल्विदं ब्रह्म'** (छान्दोग्य० ३। १४। १), **'आत्मैवेदं सर्वम्'** (छान्दोग्य० ७। २५। २). असे झाल्यास 'ज्ञानयोग' सुगमतापूर्वक आपोआप सिद्ध होईल. कारण अनेक रूपाने जे जीव आहेत, तेच एकारूपाने ब्रह्म आहेत अर्थात् जीव आणि ब्रह्म एकच आहेत—**'अयमात्मा ब्रह्म'** (माण्डुक्य० १)

अपरा आणि परा—या दोन्ही प्रकृतींची स्वतंत्र सत्ता नाही. कारण या दोन्ही भगवंताच्या शक्ती, स्वभाव असल्यामुळे भगवत्स्वरूपच आहेत. असे स्वीकार केल्यास सर्वत्र भगवद्भाव होईल—**'वासुदेवः सर्वम्'** (७। १९) असे झाल्यावर भक्तियोग सुगमतापूर्वक आपोआप सिद्ध होईल. कारण 'सर्व काही भगवानच आहेत'—हीच वास्तविक शरणागती आहे.

तात्पर्य हे निघाले की, जगत्, जीव आणि परमात्मा—तिन्हींच्या दृष्टीने आपण सर्व समान आहोत. या समतेला गीतेने योग म्हटले आहे—**'समत्त्वं योग उच्यते'** (गीता २। ४८). भेद (विषमता) केवळ व्यवहारासाठी आहे, जी अनिवार्य आहे. कारण व्यवहारात समता संभवतच नाही. म्हणून साधकाची दृष्टी (भावना) सम असावी—**'सर्वत्र समदर्शनः'** (गीता ६। २९), **'पण्डिताः समदर्शिनः'** (गीता ५। १८), **'समबुद्धिर्विशिष्यते'** (गीता ६। ९), **'सर्वत्र समबुद्धयः'** (गीता १२। ४). व्यवहारात वेगळेपणा स्वाभाविक आहे परंतु भावात भेद तर मनुष्याने आपल्या राग-द्वेषाने उत्पन्न केला आहे. राग-द्वेषामुळेच मनुष्याने जगत्, जीव आणि परमात्मा—तिन्हीत अनेक भेद निर्माण केले आहेत, जे त्याच्या जन्म-मरणाचे कारण आहे—**'मृत्योः स मृत्युं गच्छति य इह नानेव पश्यति'** (कठ० २। १। ११) जो कोणालाही परका मानतो, कोणाचेही वाईट इच्छितो, पाहतो व करतो आणि संसारापासून काहीही इच्छितो, तो कर्मयोगीही होऊ शकत नाही, ज्ञानयोगीही होऊ शकत नाही आणि भक्तियोगीही होऊ शकत नाही.

जगत्, जीव आणि परमात्मा—या तिन्हीवर विचार केला तर स्वतंत्र सत्ता एका परमात्म्याचीच आहे. जगत् आणि जीवाची स्वतंत्र सत्ता नाही. जगताला जीवानेच धारण केले आहे—**'ययेदं धार्यते जगत्'** (७। ५) अर्थात् जगताला सत्ता जीवानेच दिली आहे. म्हणून जगताची स्वतंत्र सत्ता नाही. जीव परमात्म्याचा अंश आहे—**'ममैवांशो जीवलोके'** (गीता १५। ७) म्हणून स्वतः जीवाचीही स्वतंत्र सत्ता नाही. तात्पर्य हे आहे की, जगताची सत्ता जीवाच्या अधीन आहे आणि जीवाची सत्ता परमात्म्याच्या अधीन आहे. म्हणून एका परमात्म्याशिवा दुसरे काही नाही.

**'सदसच्चाहमर्जुन'** (गीता ९। १९). जगत आणि जीव—दोन्ही परमात्म्यातच भासत आहेत.

